

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

दि

# ओरिएंट पेपर मिल्स लिमिटेड

( भारतांतील कागदाची सर्वांत मोठी सिंगलयुनिट गिरणी )

## ब्रजराज नगर

- र्‍हिनो ब्रँड क्राफ्ट पेपर
- व्हाइट प्रिंटिंग
- क्रीमलेड
- ओरिएंट पोस्टर
- ओरिएंट बँक
- ओरिएंट बाँड

त्याचप्रमाणें

- इतर उच्च प्रतीच्या कागदाचे

आणि

- ट्रिप्लेक्स, डुप्लेक्स, सिंप्लेक्स व करड्या रंगाच्या ( ग्रे ) खडर्यांचे निर्माते.

**एजण्टस् ( अभिकर्ते ) व डिस्ट्रिब्यूटर्स ( वितरक ) भारतांत सर्वत्र**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### प्राज्ञपाठशाळा ग्रंथमाला वाई

| | | |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश – व्यवहारकांड ३ भाग ... ... | ५२ |
| | कापडी बाइंडिंग ... ... | ६४ |
| (२) | धर्मकोश – उपनिषत्कांड ४ भाग ... ... | ११० |
| | कापडी बाइंडिंग ... ... | १२६ |
| (३) | मीमांसा दर्शन ... ... ... ... | ३० |
| (४) | मीमांसाकोश भाग १ व २ ... ... ... | ६५ |

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सातवें | नवभारत | एप्रिल
अंक सातवा | | १९५४

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ
आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक

# 'नवभारत' मासिक, एप्रिल १९५४

## 'मानवेन्द्रनाथ रॉय' विशेषांक

### — लेखक-परिचय —

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय, या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे — का. सं. ]

**श्री. फिलिप स्प्रॅट**– मिरत कटांतील आरोपी– 'Beyond Communism', 'Communism in India', 'Constitution of India', 'Gandhism' वगैरे ग्रंथांचे कर्ते. मार्क्सवादाचे व्यासंगी. बंगलोर येथील Myseindia चे संपादक.

**श्री. द्वा. भ. कर्णिक**– प्रसिद्ध मराठी पत्रकार. संपादक 'संग्राम'. सांप्रत 'केसरी'चे दिल्लीतील प्रतिनिधि. 'संपादकाचीं सुखस्वप्नें' या ग्रंथाचे लेखक.

**श्री. मा. पं. शिखरे**– 'संग्राम'चे सहसंपादक. मुंबई येथील वकील.

**बॅ. व्ही. एम्. तारकुंडे**– अ. भा. कॉं. क. चे भूतपूर्व सभासद्. समाजवादी पक्षाचे संस्थापनसभासद्. रॅडिकल पक्षाचे सरचिटणीस. मुंबई हायकोर्टांतील नाणावलेले वकील.

**श्रीमती मणिबेन कारा**– मुंबईतील सुप्रसिद्ध कामगार नेत्या. 'इंडियन फेडरेशन ऑफ लेबर' व नंतर 'हिंद-मजदूर सभा' यांच्या भूतपूर्व अध्यक्ष. मध्यवर्ती असेंब्लीच्या सभासद.

**श्री. भि. वि. मराठे**– मुंबई येथील मरिटाइम युनियनचे कार्यकर्ते – कामगार चळवळींत महत्त्वाचे कार्य. विज्ञान आणि त्याचे तत्त्वज्ञानावरील परिणाम या संबंधीं सखोल अभ्यासक.

**कै. राजेंद्रदत्त निगम**– काकोरी कटांतील प्रमुख आरोपी. संयुक्त प्रांतांतील प्रसिद्ध राजकीय कार्यकर्ते.

**श्री. आर्. एल्. निगम**– डेहराडून येथील डी. ए. व्ही. कॉलेजांतील इंग्रजीचे प्राध्यापक.

**श्री. सुशांत दास**– दिल्ली येथील 'स्टेट्समन' पत्राचे उपसंपादक. जागतिक मानवतावादी आंदोलनाचे सूक्ष्म अभ्यासक व निरीक्षक

**प्राचार्य ग. रा. दळवी**– मुंबईतील 'सिद्धार्थ कॉमर्स कॉलेज'चे प्राचार्य.

**श्री. ह. रा. महाजनी**– महाराष्ट्रांतील प्रसिद्ध पत्रकार व राजकीय कार्यकर्ते - संपादक - लोकसत्ता (मुंबई)

**श्री. पु. मा. मुजुमदार बी. ए. एल्एल्. बी.** – बऱ्हाणपूर येथें वकील.

---


**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून प्रा. **वि. म. बेडेकर** यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत मासिक', ९०६ शिवाजी-नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

# संपादकीय

स्वतंत्र विचारांचें सामर्थ्य लोकांमध्यें यावें म्हणून सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता बाळगून उच्च पातळीवर विविध मतांची व विचारसरणींची मांडणी करणें हा या मासिकाचा एक उद्देश आहे. विचारस्वातंत्र्य हें लोकशाहीचें अधिष्ठान आहे. विचारसमर्थ माणसें ही लोकशाहीची मुख्य गरज आहे. स्वतंत्र रीतीनें विचार करण्यास समर्थ असलेलीं माणसेंच खरखुरी लोकशाही संस्कृति निर्माण करूं शकतात. म्हणून स्वतंत्र रीतीनें विचार निर्माण करण्यांत विलक्षण यश मिळविणाऱ्या व्यक्तींचीं उदाहरणें लोकांच्या पुढें ठेवणें हेंहि या उद्देशाच्या साफल्याचें एक साधन आहे. म्हणून **मानवेंद्रनाथ रॉय** यांच्या स्मरणार्थ हा विशेषांक प्रसिद्ध करीत आहोंत. स्वतंत्रपणें विचार करणें, हें रॉय यांचें एक ठळक वैशिष्ट्य होतें; एवढेंच नव्हें तर त्यांच्या व्यक्तित्वांतील तो एक अत्यंत उन्नत अंश होता. त्यांची विचारसरणी कोणास मान्य होवो अथवा न होवो; परंतु त्यांची विचारसरणी मननीय आहे, याबद्दल विचारवंतांत दुमत होण्याचें कारण नाहीं.

मानवाच्या व मानवी समाजाच्या उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें हें या मासिकाचें मुख्य उद्दिष्ट आहे. या उद्दिष्टास अत्यंत संवादी अशा एकात्मक मानवसंस्कृतीचा निरपवाद अंगीकार व पुरस्कार करणारे मानवेंद्रनाथ रॉय होते. त्यांचें जीवनच या उद्दिष्टास वाहिलेलें होतें. म्हणून अशा जीवनाची व अशा विचारसरणीची उत्कट जिज्ञासा त्यांच्या निधनाच्या विषादकारक वार्तेनें अनेक विचारवंतांच्या ठिकाणीं उत्पन्न होणें हें स्वाभाविक आहे. मृत्यूनंतरचें मानवी आत्म्याचें जीवन वा अस्तित्व त्याच्या विचारांत भागीदार होणाऱ्या पुढील पिढींत व्यक्त होत असतें. त्या विचारांच्या परिशीलनानें कृतज्ञताहि व्यक्त होते. **मानवेन्द्रनाथ रॉय** यांचें जीवन व विचार यांचें सम्यक् व समग्र परिशीलन करण्यास उपयुक्त असें संक्षिप्त समालोचन वाचकांच्या हातीं या विशेषांकाच्या रूपानें आम्ही देत आहोंत. तें वाचकांस स्वागतार्ह व उद्बोधक वाटेल अशी आशा आहे.

प्रस्तुत रॉय–विशेषांकाची योजना, आंखणी व संपादन या सर्व कार्यात संपादकमंडळाचे एक सभासद प्रा. गोवर्धन पारीख व 'नवभारता'चे सक्रिय हितचिंतक तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं संपूर्णपणें साहाय्य केलें आहे. रॉय यांच्याबरोबर प्रत्यक्ष सहकार्य ज्यांनीं दीर्घकालपर्यंत केलें अशा मंडळीचें लेखनसहकार्यहि या बाबतींत आवश्यक होतें. तें त्यांच्याकडून वेळेवर मिळालें, ही गोष्ट या अंकावरून वाचकांच्या निदर्शनास येईलच. या सर्वांचें आम्ही अत्यंत आभारी आहोंत. मुखपृष्ठावरील रेखाचित्र मुंबईचे उदयोन्मुख चित्रकार श्री. बाळ ठाकूर यांनीं काढलें आहे, त्यांचें आम्ही आभार मानतों. प्रस्तुत विशेषांकाचें छपाईचें काम वाई येथील प्राज्ञ प्रेसचे व्यवस्थापक श्री. म. शं. साठे व त्यांचे सहकारी यांनीं नेहमींप्रमाणेंच सुबक व व्यवस्थित, आणि अंक नेहमीपेक्षां मोठा असतांहि वेळेवर करून दिलें याबद्दल त्यांचेहि आभार.

— कार्यकारी संपादक



अनुक्रमणिका

# "त्यांचें सुसंवादी आणि संपूर्ण जीवन"



श्रीमती एलन रॉय

त्यांचें जीवन आणि त्यांच्या जीवनाचें ध्येय हीं एकरूप झालीं होतीं. त्यांचें जीवन हें संपूर्ण (Complete) जीवन होतें. त्यांच्या जीवनाशीं समरसून गेलेलें माझें जीवन त्यामुळें अधिक विशाल, उन्नत आणि अत्यंत समाधानपूर्ण झालें. त्यांचें जीवन आणि त्यांचें जीवनध्येय यांत कधीं विसंवाद नव्हता. जरा थोडा देखील विसंवाद किंवा बदसूर उत्पन्न झाला कीं त्यांना आपलें कांहींतरी कोठेंतरी चुकलें याची जाणीव होई. काय व कोठें चुकलें हें त्यांना तावडतोब कळून येत असे आणि चुकलेलें बरोबर करण्याच्या मागे लगेच ते लागत. कांहीं लोकांना त्यांच्या जीवनांत ज्या कांहीं विसंगती वाटत, त्या विसंगतींचा अर्थ त्यांच्या या वृत्तीमुळें लागूं शकतो. तसेंच, जगाच्या व्यवहाराच्या दृष्टीनें सत्ता व यश हीं प्राप्त करून घेण्यांत त्यांना तथाकथित 'यश' असें कां मिळालें नाहीं, याचाहि उलगडा त्यांच्या या वृत्तीमुळेंच लागूं शकतो. जगांतील सत्ता व यश दोन्हींहि त्यांना सहज आणि कितीतरी वेळां मिळूं शकलीं असतीं ! आणि तींहि इतक्या अल्प किंमतींत कीं पुष्कळांना हा सवदा अत्यंत स्वस्ताचा वाटला असता !

सुमारें २५ वर्षांपूर्वीं, त्यांनीं स्टॅलिनला जें शेवटचें पत्र लिहिलें, तें मी वाचलें, तेव्हां मला त्यांच्या या वृत्तीचें प्रथम दर्शन झालें. स्टॅलिनला त्यांनीं लिहिलेल्या पत्राचा शेवट असा होता : "बोल्शेव्हिकांच्या सद्गुणांच्या यादींत सभ्यता, निष्ठा आणि सचोटी या गुणांना स्थानच असूं नये ही कल्पनाच मला कशी-शीच वाटते. मला ती पटत नाहीं." ("I cannot reconcile myself to the idea that decency, loyalty and honesty should have no place in the catalogue of Bolshevik virtues"). जगाचें राज्य त्यांच्यापाशीं चालत येईल असें आम्हांला वाटलें होतें. पण त्यांनीं ते अशा साध्या गोष्टीकरितां झुगारून दिलें ! त्यांच्यासारख्या **मानवेन्द्रांना** या जगांत स्थान करून द्यायचें असेल तर या जगाची हल्लींची घडी निराळयाच रीतीनें बदलली पाहिजे असें मला तेव्हां-पासून वाटत आलें आहे.

आपल्या 'नवभारता'चा हा '**मानवेन्द्रनाथ रॉय विशेषांक**' महाराष्ट्रीय वाचकांना रॉय यांच्या जीवनाच्या उपरिनिर्दिष्ट रहस्याचें दर्शन करून देईल अशी मला आशा आहे. रॉय यांना महाराष्ट्रीयांच्या बुद्धिवादी परंपरेबद्दल नेहमींच फार आदर वाटत असे. आपल्या सबंध जीवनभर रॉय यांनीं ज्या ध्येयांवर सतत निष्ठा ठेविली, त्यांबद्दल सदैव चाड बाळगून तीं ध्येयें सत्यसृष्टींत आणण्याच्या प्रयत्नांत महाराष्ट्रीय वाचक सहभागी होतील असा मला विश्वास वाटतो. — **एलन रॉय**

---

'नवभारता'च्या विनंतीवरून या 'रॉय विशेषांका'करितां श्रीमती **एलन रॉय** यांनीं मूळ इंग्रजींतून पाठविलेल्या संदेशाचा हा अनुवाद आहे. — का. सं.

श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# मानवेंद्रनाथ रॉय

जे जे लहान थोर स्त्रीपुरुष **मानवेंद्रनाथ रॉय** यांच्या निकटच्या परिचयांत आले ते ते त्यांच्या निधनानें अत्यंत हलहळले; आपला एक दिलदार जिवलग मित्रच मृत्यूनें कायम नेला, म्हणून त्यांच्या जीवाला धक्का बसला.

त्यांची बुद्धि समुद्राप्रमाणें गंभीर व स्थिर होती. त्यांच्या वयाच्या १२ व्या वर्षापासून बलाढ्य ब्रिटिश राज्याचे कुटिल गुप्तचर कचाट्यांत पकडून त्यांना चिरडण्याचा २० वर्षे प्रयत्न करीत होते, देशोदेशींच्या राज्यसत्तांचा ससेमिरा त्यांच्या पाठीशीं लागला होता, तरी मार्दव, उत्साह, स्थैर्य व समता या गुणांची त्यांच्या चित्ताची घडण यत्किंचित्हि बिघडली नाहीं. याची खूण कधीहि पटल्याशिवाय रहात नसे. प्रस्थापित राज्यसत्तांशीं विरोध व संग्राम अनेक वर्षे केला, असंभवनीय वाटणाऱ्या अद्भुत कल्पनारम्य ध्येयांची प्रखर साधना सतत केली, तरी मन शिणलें नाहीं, चित्तप्रसाद मंदावला नाहीं. भौतिकवाद व बुद्धिवाद यांच्या उंच चिरंतन हिमप्रदेशांत त्यांची विचारपद्धति स्थिरावली होती तरी मानव्याच्या मधुर व नाजूक प्रीतीचें पुष्प त्यांतहि विकास पावून डोलत होतें. ते जेथें जेथें गेले तेथें तेथें जिवाभावाचे मित्र व मैत्रिणी यांचा त्यांना अखेरपर्यंत लाभ झाला.

हा माणूस लाखांत उठून वेगळा दिसत होता. आजानुबाहू, रुंद छाती, उंच व भव्य शरीरबांधा, विचक्षण चक्षू, विस्मयजनक स्मरणशक्ति, विशाल प्रज्ञा, विनयी वृत्ति व शूराचा जीवनक्रम यांचा प्रभाव अनेकांवर पडत असे.

**विवेक, प्रज्ञा व मानवी प्रेम**

भारताच्या स्वातंत्र्याची चळवळ व सामाजिक दास्याचा अंत करण्याच्या उद्देशानें निर्माण झालेली समाजवादी चळवळ यांत त्यांच्या आयुष्याचा मुख्य भाग गेला. त्याकरितां त्यांना सर्व पृथ्वीचा प्रवास करावा लागला. दीर्घकालपर्यंत अज्ञातवास, देशत्याग व कारागृहवासहि त्यांनीं सहन केला. अशा धकाधकीचें आयुष्य होतें तरी स्थिरबुद्धीची जन्मसिद्ध प्राप्ति झाली असल्यामुळें विद्याव्यासंग करून विद्यापीठालाहि धन्यता वाटावी अशी विद्वत्ता संपादन केली. युरोपांतील मुख्य पांच भाषांमध्यें–इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश व रशियन – त्यांनीं अप्रतिहत गति प्राप्त करून घेतली. मानवी स्वातंत्र्याचा एकमेव प्रश्न दृष्टीसमोर ठेवून तो सोडविण्याकरितां विद्याव्यासंग केला. मन अनुभवानें समृद्ध झालें. इतकें करून अखेर काय साधलें ? विवेक, **प्रज्ञा व शुद्ध मानवी प्रेम.**

त्यांची वैचारिक प्रतिभा सतत उन्मेषशालिनी राहिली. त्यांच्या जे सहवासांत आले त्यांना ते एका थोर प्राज्ञ आचार्यासमान दिसले. त्यांच्यापुढें सतत नम्र व्हावें, असा भाव निर्माण होई. वैचारिक जीवनाचा अखंड पुरवठा करणारा चैतन्यनिधीच त्यांच्या मृत्यूनें हिरावून नेला, म्हणून कित्येकांना दुःख झालें. कित्येकांनीं त्यांचें मानसिक पितृत्व स्मरून त्यांना श्रद्धांजलि वाहिली.

परंतु गुरूचें वा नेत्याचें जें आदरपूर्ण अंतर असतें तें त्यांनीं कधींच ठेवलें नाहीं. ही व्यक्ति ऋजु स्वभावाची होती. चार माणसांसारखे ते वागत. संबंध सलगीचे व खेळीमेळीचे ठेवीत. बैठकींत, सुपरिचयाच्या गांठीभेटींत, पान, भोजन इत्यादि प्रसंगीं विनोद, थट्टा, कुचेष्टा, स्वैर कथालाप यांनाहि प्रसंगानुरूप भरती येई. कोणत्याहि विचाराचे, व्यवसायाचे, पक्षाचे वा धर्माचे लोक स्नेही मंडळींत होते. अपरिचित माणसांचा भरणा असलेल्या वातावरणांत मात्र ते फार संकोचानें बोलत व वागत.

त्यांना लेखनाचा हव्यास होता, भाषणाचा नव्हे. त्यांच्यांत सार्वजनिक प्रसंगीं वक्तृत्व फारसें कधीं दिसलें नाहीं. फार जबाबदारीनें भावना आवरून व शब्द मोजून बोलत. त्यामुळें भाषण करीत असतां मध्यें मध्यें थांबण्याची सवय त्यांना लागली होती. परिचित








समुदायांत कित्येकदां ७०–८० मिनिटें त्यांचें अखंड प्रवाही वक्तृत्व ऐकण्यास मिळालें आहे. भाषण केव्हांहि व कोठेंहि केलें तरी तें साधकबाधक चर्चेनें भरलेलें व तत्त्वचिंतनानें भारावलेलें असल्यामुळें विचारप्रवर्तक होत असे. सुदैवानें त्यांचीं गेल्या १६ वर्षांतील व्याख्यानें त्यांच्या साक्षेपी पत्नीनें लघुलिपींत उतरून घेतलीं असल्यामुळें आणि त्यांतील बरींचशीं प्रसिद्ध झालीं असल्यामुळें त्यांच्या वैचारिक जीवनाचें चित्र त्यांत उमटलेलें सांपडेल.

त्यांनीं जें जें लेखन केलें तें तें सर्व विशिष्ट चळवळींतील वैचारिक प्रश्नांची चर्चा करण्याकरितां केलें. तेथें जीवन व ज्ञान यांचा सांधा एकजीव होता. कर्तव्याच्या प्रश्नांतून विचार निर्माण होत, शुद्ध विद्योपासना म्हणून नव्हे. शुद्ध विद्योपासनेचा महिमा त्यांना मान्य होता. परंतु त्यांच्या जीविताची मांडणी तशी झाली नव्हती. भाषणेंहि त्याच दृष्टीनें त्यांनीं केलीं. सौजन्यानें व विचारांच्या प्रभावानें राजकारणांत त्यांना मित्र मिळाले. ते मित्र त्यांनीं राजकीय पक्षाचे विसर्जन केल्यानंतरहि टिकले. हे संबंध टिकले एवढेंच नव्हे तर ते अधिक शुद्ध व निरुपाधिक झाले. त्यांना अगदीं वैयक्तिक स्वरूप प्राप्त झालें. त्यांच्या मित्रांचा परिवार मोजका आहे. परंतु तो थोडा थोडा मुंबई, पुणें, सोलापूर, सातारा, दिल्ली, बरेली, लखनौ, कानपूर, पाटणा, कलकत्ता, मद्रास, बंगलोर, विजयवाडा इत्यादि भागांत पसरला आहे. त्यांतील कित्येकांना आपल्या कुटुंबांतील जिवलगालाच काळानें नेलें असें वाटून त्यांचें मन उदास व विषण्ण झालें, घरांत अंधार भरलासें वाटलें.

ते १८ महिन्यांपूर्वी हिमालयांत मसूरी येथें कांहीं दिवसांपुरते रहावयास गेले होते. तेथें नित्याप्रमाणें फिरून परततांना चढणीवर तोल जाऊन पन्नास फुटांवरून खालीं कोसळले. पायांचीं हाडें मोडलीं. त्यांतून बरे होत असतां मेंदूत रक्तकण गोठून आजार आला. ह्या आजारांतून दोनदा उठले, बरे झाले. कित्येक महिने मृत्यु व जीवन यांच्यांतील सूक्ष्म सीमारेषेवर जीव होता. त्यांत एकदां म्हणाले कीं "मला मृत्यूचीं भयें मुळींच भेडसावीत नाहींत. परंतु यांतील पराधीनता व शरीरयातना मात्र सोसवत नाहींत." अशाहि स्थितींत विनोदवृत्तीला खळ पडली नाहीं. पत्नी एलन् परिचर्येंत अहोरात्र गर्क होत्या. रॉय यांचे स्नायू अन्तर्बाह्य अर्धांगानें जखडले गेले होते. त्यांना घास भरवावे लागत, गिळण्यास फार प्रयास पडत. तेव्हां या अनुव्रत व दक्ष पत्नीला म्हणाले : "तुला लहान मूल नाहीं, घे, आतां लहान मूल मिळालें !"

त्यांची मृत्यूशीं सलगी फार जुनी होती. वयाच्या बाराव्या वर्षापासून तो त्यांच्या आसपास वावरत होता. जीवन व मरण यांच्या सीमेच्या क्षुरधारेवरच ऐन उमेदीचीं २० वर्षें त्यांनीं लीलेनें काढलीं होतीं. भारतांत परतल्यावर, सहा वर्षांचा कारागृहवास संपविल्यावर, कांहींशी स्वस्थता आली होती. या शेवटच्या आजारांतूनहि ते नुकतेच उठले होते. अखेरच्या दोन आठवड्यांत प्रकृति चांगली सुधारली होती. अमेरिकेंतील अनेक विद्यापीठांनीं त्यांना 'पूर्व दिशेंतील राजकारण' या विषयावर संशोधनात्मक व्याख्यानें देण्याकरितां व ग्रंथलेखनार्थ निमंत्रणें दिलीं होतीं. समुद्रपर्यटनाची तयारी सुरू झाली. परवाना मिळाला. स्टॅन्फोर्ड व हार्वर्ड विद्यापीठांना आगमनाच्या तयारींत असल्याची वार्ताहि मिळाली. मुंबईस निरोप देण्याकरितां मानवतावाद्यांचें संमेलनहि भरविण्याचें ठरलें.

परंतु परलोक-पर्यटनाची वार्ताच आकस्मिक रीतीनें विद्युत्पाताप्रमाणें आली. २५ जानेवारीच्या रात्रीं ११ वाजून ५० मिनिटांनीं स्वस्थ बेशुद्धींत मृत्यु त्यांस अलगदपणें घेऊन गेला. माणसास जेव्हां न कळत मृत्यु नेतो, तेव्हां ही त्याची मोठीच कृपा समजली पाहिजे. तो त्यांचा अखेरचा स्नेही होता. त्यांच्या मुखावर शेवटीं स्मित प्रकट झालें होतें.

### पायाशुद्ध अध्ययन

मानवेंद्रनाथ रॉय यांचें मूळ नांव नरेंद्रनाथ भट्टाचार्य. वडिलांचें नांव दीनबंधु भट्टाचार्य. भट्टाचार्यांचें घराणें पूर्वबंगालमधील मिदनापूर जिल्ह्यांतील खेपूत किंवा घताल ह्या गांवचें. हें तीर्थक्षेत्र आहे. तेथील कालीमंदिराच्या पूजेचें पूर्वापार वतन यांच्या घराण्यांत आहे. दीनबंधु भट्टाचार्यांनीं गांव सोडलें. ते चोवीस परगणा जिल्ह्यांतील अरबालिया गांवीं येऊन राहिले. तेथें ते हायस्कूलमध्यें संस्कृत-शिक्षक होते. नंतर त्यांनीं कलकत्त्याजवळ बारा मैलावर पूर्वबंगाल रेल्वेच्या फाट्यावरील कोदालिया गांवीं घर केलें. नरेंद्राचा जन्म ६ फेब्रुवारी १८९३ला झाला. वनश्रीच्या अंकावरच कोदालिया हा गांव वसला










आहे. फुलांचा व फळांचा प्रदेश. कमलिनींनीं भरलेलीं तळीं दृष्टीला शांत व मनाला प्रसन्न करतात. आंबे, माड, खजूर इत्यादि वृक्षांनीं गांव झाकोळला आहे. भातशेतीनें संपन्न मुलुख. बाराहि महिने दुधाळ व पुष्ट जनावरांचे कळप सकाळसंध्याकाळ गांवाच्या सीमेवरून जातांना व परततांना दृष्टीस पडतात. संदेश, रसगुल्ला, खिरमोन, मीठा दही इत्यादि दुधाच्या शुद्ध मिठाईनें तेथें पाहुण्यांचें आदरातिथ्य होतें. निदान उसाच्या रसापेक्षांहि अधिक मधुर अशी खजूरीची शीत नीरा तरी पुढें येतेच.

नरेंद्राचें शिक्षण या गांवांत झालें. बंगाली, संस्कृत व इंग्लिश यांचें पायाशुद्ध अध्ययन झालें. पायाशुद्ध म्हणजे व्याकरण व वाक्यमीमांसा झक्क तयार. या पायाशुद्धीमुळेंच पुढील आयुष्यांत देशोदेशींच्या युरोपियन भाषांत झपाट्यानें ते व्युत्पन्न बनले. अलीकडच्या एम्. ए. व पीएच्. डी. ची इंग्रजीची तयारी पाहून खेदानें ते म्हणत कीं, चाळीस वर्षांपूर्वीचें मॅट्रिकचें इंग्लिश व्याकरण यांच्यापेक्षां अधिक पक्कें होतें. संस्कृत स्तोत्रें व सुभाषितें यांचें लहानपणींच घरच्या घरीं सहज पाठांतर झालें होतें. शंकराचार्यांची चर्पटपंजरी त्यांना आवडत असे. एखाद्या गर्विष्ठ पुढाऱ्याशीं लहानशा बैठकींत चर्चा चालत असतां तो शेखी मिरवूं लागला कीं " मा कुरु जनधनयौवनगर्वं हरति निमेषात् कालः सर्वम् " ही ओळ शेजारीं बसलेल्या मित्राच्या कानांत ते हळूंच पुटपुटत. गणिताचीहि तयारी प्रशंसनीय होती. त्याचा उपयोग १९१८ ते १९२९ पर्यंतच्या काळांत जर्मनींत रहाण्याचा अनेक वेळां योग आला तेव्हां झाला. उच्च पदार्थविज्ञानांत आइन्स्टाइनलाहि कौतुक वाटावें असें प्रावीण्य त्यांनीं मिळविलें. १७ व्या शतकांत तर्कशास्त्राच्या संबंधांत भट्टाचार्यांच्या घराण्यानें अप्रतिम यश मिळविल्याची गोष्ट रॉय अनेक वेळां सांगत. भारतीय तर्कशास्त्रास शिखरास नेणारे गदाधर, धर्मशास्त्रांत बंगालमध्यें अग्रपूजेचा मान मिळविलेले रघुनन्दन व अद्वैतसिद्धिकार मधुसूदनसरस्वती हीं नांवें सर्व भारतांत प्रख्यात आहेत.

भट्टाचार्य-कुलांतील नरेंद्र विसाव्या शतकांतील आशियाच्या जागृतीचा प्रतिनिधि बनला. त्या जागृत जाणीवांनीं वयाच्या १२ व्या वर्षीच घेरला गेला. मध्ययुगीन भावनांच्या बंधनांत सांपडणारें नरेंद्राचें मन नव्हतें. आधुनिक युरोपनें आशियाला १९ व्या शतकांत पूर्ण वेढून बंदिवान् केलें होतें. त्या बंधनांच्या बाहेर पाडणारी चेतना आशियांत विसाव्या शतकाच्या पहिल्याच दशकांत प्रकट झाली. या चेतनेचें एक महत्त्वाचें केंद्र बंगाल व विशेषतः कलकत्ता शहर बनलें होतें. भारतांतील ब्रिटिश राज्याची नैतिक महती संपुष्टांत आल्याचें हें गमक होतें.

## राजकीय चेतनेला आध्यात्मिक प्रतिष्ठेची जोड

ब्रिटिशांनीं भारतांतील दीर्घकालीन राजकीय यादवीच्या परिस्थितीचा फायदा घेऊन आपली राज्यसत्ता येथें स्थापन केली. कोणत्याहि मोठ्या सामाजिक घटनेस व संस्थेस नैतिक अधिष्ठान लाभल्याशिवाय ती स्थिरावत नाहीं. ब्रिटिशांना आपल्या सत्तेच्या नैतिक समर्थनास भारताला डबघाईस आणणारा जातिभेद, धर्मभेद आणि सामाजिक मागासलेपणा उपयोगी पडला. राजकीय बेबंदशाहीची भीति हें कायमचें समर्थन हातीं आलें. जुनीं कारणें अपूर्ण वाटून त्या बेबंदशाहीच्या कारणांत ब्रिटिश धूर्त मुत्सद्दी स्वतः कांहीं भर टाकत. विशेषतः मागासलेल्या जगाला सुधारणें ही पाश्चात्त्यांवर इतिहासानें सोपविलेली जबाबदारी आहे हें त्यांतील सर्वांत महत्त्वाचें कारण सांगण्यांत येई.

या सर्वांची प्रचंड प्रतिक्रिया भारतांत हळूं हळूं निर्माण होऊं लागली. नवजागृति उत्पन्न झाली. १९ व्या शतकांत ही जागृति मुख्यतः अंतर्मुख होती. तिला आक्रमक चेतनेचें रूप २० व्या शतकाच्या प्रारंभीं प्राप्त झालें.

ब्रिटिशांना दीर्घकालीन शांतता स्थापन करण्यांत यश आलें होतें. परंतु सामाजिक स्वास्थ्य निर्मितां आलें नाहीं. आर्थिक दृष्ट्या भारतास अधिक नष्टचर्याच प्राप्त झाली. त्यामुळें सामाजिक अवनति अधिक झाली. या अवनतीस ब्रिटिश सत्ताच कारण आहे, अशी जाणीव समंजस सुशिक्षितांना झाली. त्यामुळें पाश्चात्यांच्या विशेषतः ब्रिटिशांच्या राजकीय वर्चस्वाचें नैतिक अधिष्ठानच नष्ट झालें.

प्रतिक्रिया अत्यंत खोल गेली; संस्कृतीच्या अंतरंगाच्या तळांतून तिला प्रेरणा मिळाली. 'भारतावरील परकीय राजकीय सत्ताच भारताच्या वर्तमान अवनतीला जबाबदार आहे; ती नष्ट करणें व स्वतः भारतानें स्वकीय राज्य स्थापन करणें हें उच्चतम नैतिक कर्तव्य आहे ' अशा प्रकारच्या नैतिक जाणीवेला मोठ्या








आध्यात्मिक प्रतिष्ठेचें अधिष्ठान लाभलं. भारत हा आध्यात्मिक दृष्ट्या जगाचा प्राचीन गुरु आहे व हें त्याचें गुरुपद अढळ आहे, अशी गंभीर आत्मनिष्ठ प्रज्ञा दशदिशा उजळून बाहेर आली. विवेकानंद व अरविंद हे या प्रज्ञेचें केंद्रस्थान बनले. राजकीय चेतना या प्रज्ञेमुळें प्रखर व अदम्य झाली, अनंत श्रद्धा निपजली, अलौकिक शौर्य चमकूं लागलें.

या चेतनेस राज्यशास्त्र, समाजरचनेची एतिहासिक उपपत्ति वा नवे राजकीय ध्येयवाद यासंबंधींच्या वैचारिक पद्धतीची पार्श्वभूमि मात्र प्राप्त झाली नाहीं. अखेरपर्यंत त्या बाबतींत वैगुण्य कायम राहिलें.

या श्रद्धेला जुना व रूढ प्रतिकारमार्गच माहीत होता. तो तिनें अनुसरला. ताज्या रक्तांत ती वाढीस लागली. कोवळ्या तारुण्यांत प्रवेश केलेलीं माणसें या श्रद्धेचें आश्रयस्थान झालीं. घर दारांचा त्याग करून हीं माणसें बाहेर पडत. हीं थोडीं होतीं. गीतेचें पुस्तक घेऊन आत्म्याच्या अमरत्वाचें व मातृभूमीचें गाणें गात फांशीच्या तक्त्यावर प्रातःकालीं चढत; किंवा भूमिगत होत; किंवा देशांतर करीत; किंवा काळ्या पाण्याच्या शिक्षेवर जात.

१९०५ सालीं बंगालची फाळणी झाली. हा ब्रिटिशांच्या भेदनीतीचाच एक भाग होता. वरील श्रद्धेनें देशभर क्षोभ निर्मिला. बंगालमध्यें क्रांतिकारक संघटना अस्तित्वांत आल्या. त्यांचीं अनुशीलनसमिति व युगांतर-समिति हीं नांवें प्रसिद्धच आहेत.

या समितींचे नेते प्रथम तरुणांचा लक्ष्यवेध करीत. जतीन मुखर्जी या नेत्यांतीलच एक होत. ते शौर्यानें अजरामर झाले आहेत. नरेंद्र हा कोवळ्या वयांतला मुलगा त्यांच्या ध्यानांत भरला. त्या क्रांतिकारकांपैकीं कांहीं मंडळी अजून हयात आहेत : विवेकानंदांचे बंधु डॉ. भूपेंद्रनाथ दत्त, हरींद्र चक्रवर्ती, बारिन घोष, जीवन चटर्जी, मधु घोष, धीरेन मुजुमदार, अमरेंद्र चट्टोपाध्याय वगैरे. अमरेंद्रनाथ चट्टोपाध्याय लिहितात कीं " आमचा नेता जतीन मुखर्जी. १२ वर्षांच्या नरेंद्राची व आमची गांठ त्यानें प्रथम श्रमजीवी समावाय स्टोअर्स, कलकत्ता, या ठिकाणीं घालून दिली. क्रांतिकारकांच्या हालचालीचें हें एक ठिकाण. या वयांत क्रांतिकार्यांत सामील झालेला व इतकी विलक्षण कामगिरी केलेला माणूस माणसाच्या इतिहासास माहित असेलसें वाटत नाहीं " ! या दोन समितींच्या द्वैतांत नरेंद्र कधींच सांपडला नाहीं. दोन्ही समितींच्या सभासदांस त्याच्या उमद्या स्वभावाचा वेध लागे.

सरकारी व निमसरकारी खजिने लुटून व शस्त्रास्त्रें जमवून बंड उभारावयाचें म्हणून त्याकरितां कांहीं काळ ( १९०३ ते १९१४ ) अगदीं प्राथमिक प्रयोगावस्थेंत गेला. जपान, चीन, इंडोचायना, युरोप व अमेरिका इतक्या प्रदेशांत या काळांत या चळवळीचें क्षेत्र पसरलें. स्वदेशांतहि खोल मुळें धरूं लागलीं. ब्रिटिश सरकार अस्वस्थ झालें. परंतु सावधपणानें हें बंडाचें मूळ व बीज उपटून व ठेंचून थंड करूं असा त्याचा आत्मविश्वास १९४० पर्यंत कायम होता.

सरकार नरेंद्रावर करडी नजर ठेवूं लागलें. १९०६ व १९१४ सालीं नरेंद्रास दरवड्याच्या बाबतींत अटक झाली. परंतु नंतर आरोप शाबीत न होतां सुटकाहि झाली. १९०८ सालच्या हौरा कटाच्या खटल्यांतहि नरेंद्र गोंवला गेला होता. परंतु त्यांतूनहि बचावला.

### शत्रूचा शत्रु तो आपला मित्र

१९१४ सालापर्यंत क्रांतिकारकांजवळचें धनभांडार चांगलें आत्मविश्वास उत्पन्न होण्याइतकें वाढलें. पहिल्या महायुद्धाची संधि प्राप्त झाली. क्रांतिकारक गटांनीं ही संधी गमवावयाची नाहीं, असा पण केला. चीन, जपान व जर्मनी यांच्याशीं संधान बांधण्यास सुरवात केली.

पहिल्या जागतिक महायुद्धाच्या कालखंडांतील भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या पर्वावर नरेंद्राच्या कामगिरीचा ठसा सर्वोत्कृष्ट रीतीनें उमटला आहे. शत्रूचा शत्रु हा आपला मित्र, हें राजनीतीचें पुराण-प्रसिद्ध धोरण लक्षांत ठेवून या वेळच्या लढ्याची आंखणी झाली. यांत केवळ आत्यंतिक साहसाचेंच प्रदर्शन झालें नाहीं; परिस्थितीच्या आकलनाचाहि भाग महत्त्वाचा होता. सामान्य जनता व शिक्षित मत इंग्रजी राज्याच्या विरुद्ध आहे, ही गोष्ट जर्मनीबद्दलच्या सार्वत्रिक सहानुभूतीनें व्यक्त होत होती. जर्मनीची प्रत्येक यशस्वी हालचाल येथें आनंदाचें आंदोलन निर्माण करी. परंतु ब्रिटिशांचीहि विलक्षण हिकमत यावेळीं प्रत्ययास आली. शंभर वर्षे राज्य करून मिळालेला जनमनाचा आवांका उपयोगी पडला. ब्रिटिशांचा आब व दरारा मोठा होता; त्यांचें राजकीय शहाणपण










बिनतोड म्हणून सर्व मानीत. त्यांनीं याचा भरपूर फायदा, धोका पतकरूनहि करून घेतला. लष्करी शक्ति नांवापुरती येथें राखून, बाकी सर्व युरोपच्या रणांगणावरील कामगिरीकरितां रवाना केली. ह्या गोष्टीचा पक्का कयास नरेंद्र-प्रभृति क्रांतिवीरांना आला. त्यांनीं चीनशीं व जपानशीं संधान बांधण्याचे यत्न केल. जर्मनीशीं संधान बांधण्यांत बरेंच यश आलें. येथें असलेल्या ब्रिटिशांच्या सैन्यशक्तीचा व शस्त्रशक्तीचा ठीक अंदाज करून शस्त्रास्त्रांचे द्विगुण संभार भारताच्या किनाऱ्यावर उतरविण्याच। उद्योग आरंभिला. भोलानाथ चतर्जीनें लक्षावधि रुपये येथल्या येथें आपल्या बाहुबलावर उभारले होते. जतीन लाहिरीनें युरोपांत प्रथम संधान बांधून जर्मनीचें मनोगत जाणून मदत करण्याचें आश्वासन आणलें. पुढील सर्व योजनांचीं सूत्रें नरेंद्राच्या हातीं दिलीं. नरेंद्राच्या बटेव्हिया व शांघाय ते सुंदरबनच्या दरम्यान अनेक खेपा झाल्या. हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील बंदरें व महत्त्वाचीं रेल्वेकेंद्रें कशीं व कोणीं काबीज करावयाचीं याची आंखणी केली.

परंतु हिंदुस्थानांतील व समुद्रावरील या संकेतित उठावाशीं संबद्ध महत्त्वाच्या व्यक्ती पकडल्या गेल्या वा मारल्या गेल्या; अनेक शस्त्रास्त्रांनीं भरलेलीं जहाजें पकडलीं गेलीं. सगळीं सूत्रें नीट रीतीनें हलविणें मुष्किलीचें झालें. शेवटीं नरेंद्राला १९१६ च्या प्रारंभीं पुनः हिंदुस्थान सोडणें भाग पडलें. चीन, जपान, इंडोनेशिया, फिलिपाईन्स, अमेरिका इत्यादि देशांत त्याच प्रकारचे यत्न केले. परंतु अडचणींचे पर्वत उभे रहात.

फार प्रयासानें अमेरिकेचा किनारा गांठला. पकडलें जाऊन ब्रिटिशांच्या हातीं लागण्याचे अनेक प्रसंग येऊन गेले. त्या त्या वेळीं बुद्धि सावध राहिली म्हणून युक्त्या सुचत गेल्या.

## नरेन्द्राचे मानवेन्द्र !

नरेंद्र अमेरिकेच्या किनाऱ्यावर गुप्त रीतीनें पोंचले. परंतु तिसऱ्या दिवशीं अमेरिकन वृत्तपत्रांत ‘ जर्मन गुप्त हेराचे काम करणारा एक भारतीय माणूस ’ देशांत आला आहे, अशी बातमी प्रसिद्ध झाली. अमेरिकेंत राहणें धोक्याचें झालें. युगांतरसमितीचे नेते जे यदुगोपाल मुखर्जी त्यांचे बंधु प्रसिद्ध साहित्यिक ननुगोपाल मुखर्जी त्यावेळीं अमेरिकेंत होते. त्यांनीं नरेंद्रांना नांव बदलून राहण्याचा सल्ला दिला. **नरेंद्रनाथ भट्टाचार्यांचे मानवेंद्रनाथ रॉय** बनले. हिंदुस्थानांत सशस्त्र क्रांतीचा उठाव करण्याच्या योजनेंत गदर पार्टीचा फार मोठा भाग होता. पहिल्यांदा यत्न फसला तरी पुनः यत्न करून पहावा, म्हणून मानवेंद्रनाथ रॉय यांनीं गदर पार्टीच्या अमेरिकेंतील सदस्यांशीं गांठीभेटी घेण्याचा उद्योग आरंभिला. परंतु त्यांच्यांत आपसांत फार बेबनाव झालेला आढळला. रॉय यांनीं तो मार्ग सोडला व श्री. लाला लजपतराय अमेरिकेंत अडकून पडले होते, त्यांच्याबरोबर काम करण्याचें ठरविलें.

जर्मनीशीं बांधलेल्या संधानास यश आलें असतें तर काय झालें असतें असा पुनर्विचार सुरू झाला : झालें तें एका अर्थीं फार वाईट झालें नाहीं, असें ध्यानांत आलें. “ जर्मनीनें कांहीं विशिष्ट अटींवर मदत करण्याचा करार केला होता. त्या म्हणजे व्यापाराच्या पूर्ण सवलती त्यांतून दुसरें पारतंत्र्य जन्मलें नसतें कशावरून ? ” अशा चिंतनास व विचाराधनेस येथें प्रथम अवसर मिळाला. लजपतराय या वेळीं उतारवयाचे झाले होते. त्यांच विचारहि कांहींसे सौम्य झाले होते. त्यांचें लेखन व वाचन सुरू होतें. समान ध्येयाचे, शूर, चिकित्सक व शालीन तरुण सहकारी म्हणून रॉय त्यांना फार आवडले. दोघांची आपसांत राजकारणचर्चा होई. अन्यत्रहि वादविवादाचे विविध प्रसंग येत. भारतापेक्षां निराळयाच जगांत आल्याची साक्ष रॉय यांना पटूं लागली. राजकारण, धर्म, संस्कृति, विज्ञान, तत्त्वज्ञान, कला, वाङ्मय इत्यादि विषयांची वैचारिक भूमिका तेथें त्यांना कांहीं निराळी दिसली.

लजपतरायांच्या एका सभेत एका पाश्चात्त्य गृहस्थानें प्रश्न विचारला कीं, “समजा, इंग्लिशांचें हिंदुस्थानातलें राज्य गेलें व आज आहे अशीच विषम समाजरचना राहिली, जमीनदार व वरिष्ठ वर्ग संपन्न व इतर लोक आजच्या सारखेच विपन्न राहिले तर तुम्हास चालेल काय ?” लजपतरायांनीं उत्तर दिलें कीं, “ भावानें लाथ मारली व परक्यानें लाथ मारली तर त्यांत जें अंतर तेंच परक्याचें राज्य व स्वकीय राज्य यांत अंतर कायम असणार – स्वकीयांचें राज्य कसेंहि असलें तरी तें स्वकीयांचेंच ! ”

## मार्क्सवादाची नवी दृष्टि

राजकारण व सामाजिक न्याय यांचा संबंधहि,








स्वकीय राज्य कीं परकीय राज्य या प्रश्नाइतकाच मूलभूत आहे राजकीय स्वातंत्र्यांतील सामाजिक गर्भितार्थ विचारांत घेतला पाहिजे – असा विचार अशा प्रकारच्या चर्चेतून रॉय यांच्या मनांत उद्‌भवला. स्टॅन्फर्ड विद्यापीठांत रॉय येऊं जाऊं लागले, त्यामुळें राजकीय भावुक प्रेरणेला शास्त्रीय बैठकीची आवश्यकता अत्यंत पटूं लागली. लजपतराय यांच्याशीं मतभेद होऊं लागला. परंतु लजपतराय दिलदार स्वभावाचे; त्यामुळें संबंध बिघडले नाहींत.

जे ल्व्हस्टोन इत्यादि अमेरिकन मार्क्सवाद्यांच्या सहवासांत रॉय यांचा मार्क्सवादाचा व्यासंग वाढीस लागला. त्यांना नवी दृष्टि लाभली. सामाजिक-ऐतिहासिक स्थित्यंतरांचें रहस्य उलगडण्याचें उच्च दर्जाचें साधन हस्तगत झाल्यासारखें वाटलें. हाच हात प्रथम भारताच्या मानसिक क्षेत्रांत मार्क्सवादी दृष्टिकोण निर्माण करूं शकला !

रॉय यांची पंचविशी नुकतीच उलटली होती. स्टॅन्फर्ड येथील विश्वविद्यालयांतील विद्यार्थिनी कुमारी ट्रेन्ड हिच्याशीं त्यांचा विवाह झाला. थोड्याच दिवसांत तिच्या लक्षांत आलें कीं फार निराळ्या प्रकारचें धामधुमीचें व धोक्यांतील आयुष्य जगणाऱ्या अज्ञातवासी पुरुषाशीं आपण विवाहबद्ध झालों आहोंत ! रॉय यांना १९१७ च्या मध्यांत अमेरिकेस रामराम ठोकणें भाग पडलें. नंतर या बाईनीं ठरविलें कीं, " या पुरुषाबरोबर शांतीचा व सुखासमाधानाचा संसार होणें अशक्य. संबंध सोडणें बरें." तिच्या मनांतील आदर मात्र कधींच कमी झाला नाहीं. दीर्घकाल पत्रव्यवहार सुरूं होता. अडीअडचणींत त्या उपयोगीहि पडल्या.

पहिल्या महायुद्धांत अमेरिकेचा दोस्तांकडेच पहिल्यापासून कल होता. म्हणून जर्मनीच्या हालचालीवर अमेरिकन सरकारची कडक नजर होती. " हा माणूस जर्मनीच्या तर्फे येथें काम करीत असून याच्यापासून धोका आहे " असा वहीम येऊन अमेरिकन पोलीसांनीं रॉयना अटक केली. परंतु अटक करण्यास पाहिजे तितका पुरावा नव्हता. मॅजिस्ट्रेटनें रॉयनीं जामीन मिळवावा, म्हणून मुदत देऊन त्यांना मोकळें केलें. पोलीसनें नजर ठेवली. परंतु रॉय ह्यांनीं मेक्सिकोची सरहद्द गांठली.

## जागतिक क्रान्तीच्या चळवळींत प्रवेश

१९१७ सालीं मेक्सिकोंत शेतकरी क्रान्ति सफल होण्याच्या मार्गावर होती. रॉय यांनीं तेथील नेत्यांच्या बरोबर चळवळींत भाग घेण्यास प्रारंभ केला. डाव्या गटाचे ऑब्रेगॉन व कॅले हे नेते होते. मार्क्सवादी क्रांतीचा कार्यक्रम व लोकशाही राज्यघटना अमलांत आणण्याचें ठरलें व त्यांत यशहि आलें. कम्युनिस्ट पक्षाची स्थापना झाली. रॉय हे त्याचे चिटणीस बनले. त्यांनीं राजकारणपटुत्व, वादकुशलता व लेखनसामर्थ्य यांच्या योगानें उत्तम छाप बसविली.

पहिल्या महायुद्धानें पाश्चात्त्य राष्ट्रांतील विचारवंत मानवी सुधारणेबद्दल साशंक झाले. गंभीर विचारांनीं त्यांचीं मनें ग्रस्त झालीं. देशोदेशीं विचारवंतांना मानवी शांततेचा प्रश्न कसा सोडवावा याची चिंता पडली. रॉय यांनीं याच प्रश्नाच्या अनुरोधानें " विश्वशांतीचा राजमार्ग " म्हणून एक निबंध अमेरिकेंत प्रसिद्ध केला. तेथें मार्क्सवाद्यांत या निबंधाचें चांगलें स्वागत झालें.

जागतिक क्रांतीच्या चळवळींत रॉय यांचा साक्षात् प्रथम प्रवेश मेक्सिकोद्वारा झाला. नुकत्याच घडलेल्या रशियन राज्यक्रांतीचा एक सोव्हिएट प्रतिनिधि बोरोडिन ( Borodin ) नामक येथें भेटला. त्यालाहि अमेरिकेंतून पळ काढावा लागला होता. त्यानें मेक्सिकोंत आश्रय घेतला. तो चांगला कसलेला विचारवंत होता. रॉय यांच्याशीं त्याची मैत्री जमली. या मैत्रींत रॉय यांच्या मार्क्सवादी पांडित्यास सूक्ष्म धार मिळाली.

रॉय यांचे स्पॅनिश व इंग्लिशमध्यें प्रसिद्ध होणारे लेख वाचून बोरोडिनला रॉय यांच्या सूक्ष्म अवगाहनशीलतेचा प्रत्यय आला. बोरोडिननें रशियन क्रांतिनेते व विशेषतः लेनिन यांना रॉय यांच्या विशेष व्यक्तिमत्त्वाची माहिती दिली.

रॉय यांना लेनिनचें मॉस्कोस भेट देण्यासंबंधीं आमंत्रण मिळालें. कम्युनिस्ट चळवळ जगांत सर्वत्र फैलाविण्याकरितां ' थर्ड इंटरनॅशनल 'ची संघटना उभारावी असें लेनिननें ठरविलें. रॉय यासंबंधांत फार उपयुक्त ठरतील, असें लेनिननें मनांत घेतलें. मेक्सिकोच्या राष्ट्रपतींची रॉयशीं चांगली मैत्री होती. त्यांना रॉय यांनीं मेक्सिको सोडावें, ही कल्पना आवडली








नाहीं. ब्रिटन व अमेरिका यांचा मेक्सिकन सरकारला तगादा होता कीं रॉय यांना आश्रय देऊं नका. पण मेक्सिकोच्या राष्ट्रपतींनीं ही गोष्ट मानली नाहीं.

रॉय यांच्या आग्रहावरून मेक्सिकन राष्ट्रपतींनीं त्यांना जाण्याची अनुमति दिली. राष्ट्रपतींनीं स्वतःचा खास पासपोर्ट दिला. रॉय यांना अत्यंत सावधगिरी ठेवून अनेक धोक्याच्या जागा चुकवून स्पेनच्या किनाऱ्यावर कसेंबसें पोंचतां आलें. स्पेनमधील समाजवादी व कम्युनिस्ट रॉय यांची वाट पहात होते. कारण बोरोडिन अगोदर पोंचला होता; त्यानें सर्व तजवीज केली होती. रॉयनीं कांहीं महिने स्पेनमध्यें काढले; आंतरराष्ट्रीय क्रांतिकारक पक्षाची संघटना करण्यास आवश्यक असलेलीं सूत्रें जुळविलीं.

रॉयना स्पेनमध्यें काबारेल्लोसारखे स्नेही मिळाले. १९३७ मध्यें फ्रँकोनें जें प्रतिक्रांतीचें बंड चालविलें त्यांत क्रांतिकारक आघाडीवर रॉयचे बहुतेक स्पॅनिश स्नेही कामास आले.

## ' थर्ड इंटरनॅशनल ' व लेनिनशीं मतभेद

बोरोडिनच्या पाठीमागून रॉय स्वित्झर्लंडच्या वाटेनें जर्मनींत जाऊन पोंचले. यावेळीं पहिलें महायुद्ध नुकतेंच संपलें होतें. जर्मन भूमि राजनैतिक भूकंपांनीं सारखी हादरत होती. जनता आर्थिक दुरवस्थेनें हैराण झाली होती. कामगारवर्ग बेचैन झाला होता; सैन्य विथरलें होतें. सोशल डेमोक्रॅटिक पक्षाच्या हातीं सरकार आलें. या पक्षांतील कम्युनिस्ट गट म्हणजे स्पार्टाकस बंड; या गटानें सार्वत्रिक संपाची चिथावणी दिली. बर्लिन शहरांत सार्वत्रिक संपाची धुमश्चक्री सुरू झाली. त्या दिवसाचें दृश्य रॉय यांनीं एका हॉटेलमधील खिडकींतून पाहिलें. परंतु त्या संपातून राज्यक्रांति जन्मूं शकली नाहीं. कारण योग्य नेतृत्व लाभूं शकलें नाहीं. कांहीं महिने रॉय जर्मनींत राहिले. थेलमान, ब्रँडलर, ऑगस्ट थलायमार इत्यादि कम्युनिस्टांचा दृढपरिचय झाला. १९१९ ते १९२९ च्या दरम्यानच्या काळांत जर्मनींत रॉय यांचा अनेक वेळां अल्प वा दीर्घ काल मुक्काम झाला; त्यांत या स्नेही मंडळींचें चांगलें साहाय्य झालें.

रॉय हे ' थर्ड इंटरनॅशनल'च्या दुसऱ्या ( १९२० च्या ) अधिवेशनास उपस्थित राहिले. लेनिननें त्यांच्याशीं दीर्घकाल चर्चा व वाटाघाटी केल्या. भारतीय व पौर्वात्य देशी क्रांतिकार्याचा मार्गदर्शक या नात्यानें रॉय यांची योग्यता त्यांना पटली. लेनिन, ट्रॉट्स्की, बुखारिन इत्यादि मंडळींच्या बरोबरीचें स्थान 'थर्ड इंटरनॅशनल' मध्यें रॉय यांना मिळालें. अध्यक्षमंडळां-( presidium ) मध्यें त्यांचा समावेश झाला. जागतिक राजकारणाचें हें उच्चतम समरकेंद्र होतें.

यावेळीं १६ वर्षे ब्रिटिशविरोधी कारस्थानांत घालवून मिळविलेल्या अनुभवाची समीक्षा करून कारस्थानी राजकारणाला रॉय यांनीं मनानें पूर्णपणें रजा दिली. मार्क्सवादांतील सामाजिक विकासतत्त्वानें पूर्वानुभवाचें सार काढण्यास त्यांना मदत केली. बंडें उठवून क्रांति निर्माण करण्याच्या कल्पनेवरचा विश्वास उडाला. समाजविषयक व इतिहासविषयक विचारांच्या दृष्टीनें राजकारणाचा व परिस्थितीचा अर्थ समजून घ्यावा व समाजांतच बंदिस्त असलेल्या प्रगतिक्षम शक्तींना वैचारिक नेतृत्वाच्या द्वारें, संघटना करून, कार्यप्रवृत्त करावें, या निर्णयाप्रत ते आले.

कम्युनिस्ट राज्याचे वरिष्ठ अधिकारी व नेते एका बाजूला, दुसऱ्या बाजूला एक विचारसंपन्न श्रद्धाशील विवेकी रॉयसारखा माणूस – असें चित्र १९२० सालीं भरलेल्या जागतिक कॉंग्रेसमध्यें दिसलें. तोपर्यंत सत्तेचा मद सत्ताधीशांना चढला नव्हता. म्हणून विवेकाची वाणी तेथें प्रभाव करूं शकली. सत्यापुढें नमावयाचें, सत्तेपुढें नव्हें - हेंच व्रत जीवनभर पाळायचें रॉय यांचें ठरलें होतें.

थर्ड इंटरनॅशनलच्या जागतिक कॉंग्रेसमध्यें लेनिननें साम्राज्यशाहीच्या अंमलाखालील देशांतील क्रांतीच्या मीमांसेचा व धोरणाचा मुद्दा मांडला. रॉय यांचा संपूर्ण मतभेद होता. लेनिननें रॉय यांचाहि मुद्दा विचारणीय बाजू म्हणून मान्य करून घेतला.

रॉय यांच्या मुद्याचा सारांश असा कीं, हिंदुस्थानसारख्या साम्राज्याची वसाहत बनलेल्या देशांतील भांडवलदार किंवा अन्य वरिष्ठ वर्ग लोकशाही क्रांतीस व साम्राज्यविरोधी क्रांतिकारक लक्ष्यास संपूर्ण अनुकूल असणें शक्य नाहीं. भांडवलदारवर्गाच्या पाठिंब्यावांचूनच येथें लोकशाहीक्रांति करावी लागेल. जमीनीची मालकी कसणाऱ्याच्या संपूर्ण मालकीची करणें ही या क्रांतीची आर्थिक बाजू होय. बुद्धिजीवी मध्यमवर्ग, शेतकरी व कामकरी हेच वर्ग क्रांतीची खरी शक्ति होय.












लेनिनचें मत होतें कीं, साम्राज्यशाहीच्या वसाहतींतला राष्ट्रवाद क्रांतिकारक आहे व त्याला भांडवलदाराचाहि पूर्ण पाठिंबा आहे, म्हणून भांडवलदार वर्गहि क्रांतिकारक शक्तीचा भाग आहे, असें मानलें पाहिजे.

हे दोन्ही मुद्दे विचारार्थ स्वीकारावे व अनुभव जसा जसा अधिक यईल त्याप्रमाणें कोणतातरी एक मुद्दा निश्चितपणें स्वीकारतां येईल, असें म्हणून लेनिननें रॉयच्या बाजूस एकापरी मान्यता दिली

लेनिननें थर्ड इंटरनॅशनलच्या पौर्वात्यदेशांतील क्रांतीच्या कार्याची धुरा रॉयवर ठेवली; एवढेंच नव्हे तर १९२० सालापर्यंत मध्य आशियांत बोल्शेविक क्रांति स्थिरावली नव्हती, त्याकरितां रॉयच्या अध्यक्षतेखालीं समिति नेमून तिच्यावर तो कार्यभाग सोंपविला.

१९२० च्या सुमारास हिंदुस्थानांत खिलाफतचळवळ मुसलमानांत सुरू झाली. ब्रिटिशांनीं खिलाफतविरोधी व मुस्लिम धर्मक्षेत्रांच्या स्थानांत ढवळाढवळ करणारें धोरण धरलें होतें. त्याच्या निषेधार्थ भारतीय मुसलमानांनीं हिजरत म्हणजे देशत्याग मोठ्या प्रमाणांत आरंभिला. अफगाणिस्थानांत व रशियन तुर्कस्थानांत हिंदी मुसलमानांच्या टोळ्या आश्रयार्थ येऊं लागल्या. या संधीचा फायदा घेऊन त्यांच्यापैकीं कांहींना कम्युनिझमची दीक्षा देऊन हिंदुस्थानांत परत पाठविण्याकरितां मध्यंतरींचें एक आश्रयस्थान व शिवाय लष्करीशिक्षणाचें विद्यालय ताश्कंद येथें रॉय यांच्या संचालकत्वाखालीं स्थापलें गेलें. ही हिजरतची चळवळ थोड्याच दिवसांत थांबली. त्यामुळें रॉय मास्कोला परतले.

रॉय यांचा भारतीय राजकीय चळवळींचा व ब्रिटिश साम्राज्याच्या समग्र इतिहासाचा व्यासंग अधिक व्यापक स्वरूपांत सुरूं झाला. त्यांचा वैचारिक अधिकार अधिक मोठा दिसूं लागला. थर्ड इंटरनॅशनलतर्फे १९२२ सालीं 'व्हॅंगार्ड' ('Vanguard') व 'मासेस' ('Masses') ही साप्ताहिकें रॉय यांच्या संपादकत्वाखालीं हिंदुस्थानांत समाजवाद व कम्युनिस्ट-क्रांति यांच्या प्रचाराकरितां सुरूं झालीं. 'व्हॅंगार्ड' बर्लिनहून प्रथम निघे. ब्रिटिश सरकारच्या दडपणामुळें जर्मन सरकारनें तें बंद पाडलें. नंतर स्वित्झर्लंडहून प्रसिद्ध व्हावयास लागलें. तेथेंहि तीच अडचण आली. नंतर त्याचें पॅरिसला स्थलांतर झालें. १९२४ सालीं फ्रान्समध्यें पोलिसनें अटकहि केली. त्यांतून रॉय यांची सुटकाहि झाली. १९२२ ते १९२८ पर्यंत रॉय हे या साप्ताहिकाचे संपादक होते. त्या काळांत त्यांनीं भारताच्या राजकारणावर व राजकीय, आर्थिक व सामाजिक परिस्थितीवर अनेक निबंध, पुस्तिका, पुस्तकें व ग्रंथ लिहिले. विशेषतः त्यांचें ('India in Transition') 'संक्रमणावस्थेंतील भारत' हें पुस्तक भारत व युरोपमध्यें अत्यंत नांवाजलें. हें पुस्तक प्रथम जर्मन भाषेंत प्रसिद्ध झालें. नंतर इंग्लिशमध्यें त्याचा अनुवाद झाला.

अखंड लेखन व निरंतर विद्याभ्यासंग यांची जोड त्यांच्या क्रांतिकार्याला सतत राहिली. म्हणून वैचारिक गतिशीलता व प्रभाव हीं सतत टिकलीं व वाढत गेलीं. युरोपियन कम्युनिस्ट चळवळीशींहि त्यांनीं आपला संबंध दृढ राखला. पूर्व, मध्य व पश्चिम युरोपांतील व विशेषतः जर्मनींतील कम्युनिस्ट पक्षांचे अन्तर्गत व्यवहार, उलाढाली व व्यक्तिविशेष यांचें सूक्ष्म निरीक्षण ते त्यामुळें करूं शकले. त्यांनीं चीनशींहि संबंध सारखा ठेवला होता.

### साम्राज्यशाह्यांनीं घेरलेला चीन

पाश्चात्य साम्राज्यशाहीनें एकुणविसाव्या शतकांत चीनला घेरून टाकलें. फ्रेंच, ब्रिटिश, रशियन व जपानी अशा चार साम्राज्यशाह्यांनीं चार दिशांनीं चीनला वेढलें होतें. प्रत्येकीनें चीनच्या अतिविस्तृत पसरलेल्या महान् राष्ट्राचे बाजूबाजूचे प्रदेश व समुद्रालगतचे भाग ग्रासले. पैकीं कोणीहि एक अधिक बलिष्ठ होऊन इतरांस मागें टाकूं शकली नाहीं. त्यामुळें चीन त्यांचें आर्थिक व राजकीय स्पर्धेचें क्रीडांगण बनलें. त्यामुळें चीनची राज्यसत्ता खिळखिळी झाली. परंतु ती १९११ पर्यंत टिकली.

अठराव्या शतकाच्या मध्यापर्यंत चीन ही सुवर्णभूमि होती. जगाच्या पेठांत चिनी कलाकुसरीचे व चैनीचे पदार्थ भरले जात. सोन्याचा व रुप्याचा प्रवाह चीनकडे वहात होता. त्याची दिशा ब्रिटिशांनीं तलवार व तराजू यांच्या साहाय्यानें उलटी फिरविली. इतर साम्राज्यशाह्यांनीं त्या प्रवृत्तीला बळकट केलें. हिंदुस्थानांत अफू पिकवायची व चिनी बाजारांत विकायची असा सपाटा चालविला. कर्तबगार, वाकबगार व कष्टाळू चिनी माणसास व्यसनाधीन करून त्याची बुद्धि अक्षरशः नष्ट केली. चिनी माणसानें कातलेल्या व विणलेल्या मृदु व तकतकीत रेशमी वस्त्राच्या वेषांत लंडन, न्यूयार्क,










पॅरिस, टोकियो व पेट्रोग्रॉड येथील रमणी झळकूं लागल्या व मँचेस्टरच्या जाड्याभरड्या मळक्या कपड्यांत चिनी ललना संसाराचें जड ओझें वाहूं लागल्या. चिनी मनुष्याच्या मानेचा मणका ढिला झाला. चीन राष्ट्र विनाशार्थ जगूं लागलें.

चिनी समाजसंस्था अंतर्गत सरंजामशाहीच्या ओझ्याखालीं पार तडकून गेली होती. शेतकरी वर्ग हिंदुस्थानइतकाच या समाजाचा मुख्य आधार. त्याच्या श्रमाचा मोठा वांटा जमीनदार घेई व केवळ श्वासोच्छ्‌वासापुरतें त्याच्याजवळ ठेवी.

चिनी राज्यसंस्थेचे १९११ नंतर अनेक तुकडे झाले. लष्करी अंमलदारांच्या व मुत्सद्यांच्या हातांत निरनिराळे प्रांत पडले.

## चीनमध्यें समन्वयवादांतून जन्मलेली हुकूमशाही

एकात्मक व एकछत्री चिनी राष्ट्राची स्थापना व्हावी व त्याला जपान, इंग्लंड व अमेरिकेसारखें नवें रूप यावें अशी आशा प्रदीप्त झालेली राष्ट्रवादी चळवळ निर्माण झाली. "कौमिंटांग" नांवाची राष्ट्रवादी संघटना उत्पन्न झाली. लोकसत्तावादी मध्यमवर्गीय ध्येयवादी सुशिक्षित या संस्थेंत आले. सन्–यत्–सेन हे इ. स. १९२५ पर्यंत या संस्थेचे एक नेते होते.

चीनमध्यें हुकूमशाही, लोकसत्तावादी व कम्युनिझमची स्थापना करूं इच्छिणारे – असें त्रिविध नेतृत्व काम करीत होतें. तिरंगी सामना चालला होता. 'कौमिंटांग' मध्यें तिन्ही प्रवृत्ती एकमेकांत मिसळत होत्या व संघर्षहि करीत होत्या.

सोव्हिएट रशियाच्या स्थापनेनंतर कम्युनिस्ट चळवळीलाहि चीनमध्यें बळ आलें. चीनमधील कारखानदारी व व्यापारी शहरें व विशेषतः दर्याकिनाऱ्यावरील बंदरी नगरें यांच्यांतील कामगारवर्गांत कम्युनिस्टचळवळ अत्यंत जोरदार होती; व खेडोंपाडीं शेतकऱ्यांत शेतकरी-क्रांतीची जागृति होती. इ. स. १९२३ सालीं सोव्हिएट रशिया व थर्ड इंटर नॅशनलनें दोन मुख्य प्रतिनिधि चीनच्या क्रांतीस मार्गदर्शनार्थ पाठविले : बोरोडिन (Borodin) व जनरल ब्लूहार ऊर्फ गॅलनस् (Blucher alias Galans). त्यांनीं मास्को येथील लष्करी विद्यापीठांत लष्करी विद्या शिकलेल्या चँग कैशेकला हातीं घेऊन "कौमिंटांग" ची संघटना नियंत्रित करण्याचे प्रयत्न करून चीनची राज्यसत्ता संघटित करण्याचे यत्न चालविले. सर्व वर्गांचा जास्तींत जास्त पाठिंबा मिळावा या धोरणानें बोरोडिन मार्गदर्शन करीत होता. त्यानें क्रांतीच्या सामाजिक व आर्थिक कार्यक्रमाचा प्रश्न मागें ठेवून राष्ट्रीय एकात्मकतेस प्राधान्य दिलें, राष्ट्रवादी भावनेचा जास्तींत जास्त उपयोग केला. त्यामुळें विविध प्रवृत्तींचा व हेतूंचा गोंधळ झाला. कौमिंटांगमध्यें अनेक सेनापती व मुत्सद्दी विविध व विरुद्ध उद्देशांनीं सामील झाले. प्रत्यक्ष जनतेच्या – बहुजनसमाजाच्या जागृतीचें महत्त्व कमी लेखून चिनी कम्युनिस्ट पक्ष व रशियन मार्गदर्शक वागूं लागले. त्यामुळें क्रांतिवादी राजकारण संधिसाधू डावांच्या भानगडींत गुंतलें.

सर्व प्रकारचें इत्थंभूत वृत्त मास्को येथें सतत पोंचत होतें. थर्ड इंटरनॅशनलमध्यें चीनचें प्रत्यक्ष निरीक्षण केलेले व चिनी समाज, इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान व राजकारण यांचें १० वर्षे अध्ययन केलेले रॉयच्या तोडीचे कोणी नव्हतें.

इ. स. १९२६ च्या नोव्हेंबरमध्यें थर्ड इंटरनॅशनलच्या कार्यकारी समितीनें नवें धोरण रॉय यांच्या सांगण्यावरून ठरविलें : 'शेतकरी क्रांतीचा कार्यक्रम हातीं घेऊनच चिनी राज्यसत्तेचा विस्तार व संघटन करीत जाणें युक्त होय. राजकीय क्रांतीला सामाजिक विस्तारापेक्षां सामाजिक खोली आणणें अधिक जरूर. जेथें जेथें क्रांतिवादी गटाच्या हातीं सत्ता येईल तेथें तेथें प्रथम शेतकरी क्रांतीचा कार्यक्रम अंमलांत आणून पुढें पाऊल टाकावें आणि शहरांतील कामगारांना न्याय मिळेल अशा धोरणाला प्राधान्य द्यावें' स्टालिन प्रथम ही गोष्ट मान्य करीना. परंतु अखेरीस रॉय यांच्या युक्तिवादास मान्यता त्यानेंहि दिली व रॉय यांना १९२७ च्या प्रारंभास चीनमध्यें नवा आदेश देऊन पाठविलें.

वेळ बरीच कठीण होती. १९२६ च्या २० मार्चला चँग कैशेकनें सर्व सूत्रें हातीं घेतलीं होतीं. कँटन हें लाल क्रांतीचें प्रखर केंद्र होतें. तेंच त्यानें आपल्या काबूंत आणलें.

चिनी कम्युनिस्ट पक्षानें व बोरोडिननें रॉयच्या म्हणण्यास नकार दिला. समन्वयवादास सर्वच बळी पडले होते. परंतु वूहानचें सरकार अजून क्रांतिवाद्यांच्या हातीं होतें. चीनच्या किनाऱ्यापासून दूर असलेले

फार मोठे प्रदेश शेतकरी क्रांतीस मोकळे होते. दर्यालगतचीं अनेक शहरें कामगारसंघटनांच्या छापेत होतीं. ' कौमिंगटांग ' कीं क्रांतिकारक जाग्रत जनता - यांच्यापैकीं कोणावर भरंवसा ठेवावयाचा, हाच प्रश्न होता. " कौमिंगटांग "वर चिनी कम्युनिस्ट पक्ष व रशियन नेते यांनीं भिस्त ठेवली. त्याचें पर्यवसान म्हणजे चँग कैशेकनें सर्व सूत्रें हातीं घेऊन व लष्करी कब्जा बळकट करून, फितूर बनून क्रांतिकारकांची कत्तल केली. अखेरीस त्याला पाश्चात्त्य साम्राज्यशाह्यांनीं सर्व प्रकारें आर्थिक साहाय्य केलें. १९२८ सालीं तो हुकूमशहा बनला.

थर्ड इंटरनॅशनलच्या १९३२ सालीं प्रसिद्ध झालेल्या अधिकृत इतिहासांत मिफ् हा जर्मन कम्युनिस्ट लेखक म्हणतो : "चिनी कम्युनिस्ट पक्षाला लेनिनवादी मीमांसा योग्य प्रकारें शिकविणारे रॉय हेच पहिले गृहस्थ होत. या पक्षाला चळवळीचा संपूर्ण दृष्टिकोण व परिस्थितीची मीमांसा रॉयनीं शिकविली. बोल्शेविक विश्वक्रांतीच्या अनुभवाचें सार त्यांनीं शिकविलें. "

रॉय हे, आपलें कोणी ऐकत नाहीं, हें पाहून चीनहून १९२७ च्या अखेरीस मास्कोस परतले. त्या सर्वच मंडळींना पळून यावें लागलें. चीनमधील अतिपरिश्रमानें रॉय आजारी झाले.

१९२८ सालीं रॉय यांना कानाचें दुखणें उद्भवलें. मास्को हॉस्पिटलमध्यें शस्त्रक्रिया झाली. परंतु आराम पडला नाहीं. विमानानें बर्लिनच्या हॉस्पिटलमध्यें आणावें लागलें. तेथें पुनः शस्त्रक्रिया होऊन ते पूर्ण बरे झाले.

## रॉय यांच्यावर विपर्यस्त आरोप

रॉय आजारी असतांना त्यांच्या गैरहजेरींत थर्ड इंटरनॅशनलच्या सहाव्या विश्वकाँग्रेसचें अधिवेशन १९२८ च्या सप्टेंबर मध्यें झालें. १९२० ते १९२७ पर्यंतच्या रॉयच्या पौर्वात्य देशांतील मीमांसेच्या विरोधी निर्णय घेण्यांत आला. कुसेनिन हा फिनिश कम्युनिस्ट रॉयच्या विरुद्ध बाजूचा पुढारी होता. रॉयच्या मताचा विपर्यास करून विरोधी निर्णय घेण्यांत आला. बौद्धिक मीमांसेपेक्षां, बळकट होणाऱ्या बोल्शेविक पक्षाच्या सत्तेचें पाठबळ हेंच निर्णय बदलण्याचें व विचारविरोधाचें साधन बनलें. तत्त्वज्ञानापेक्षां राजकारणीं कारस्थानें वैचारिक निर्णयाचें सुकाणूं बनलीं.

" ब्रिटिश आर्थिक साम्राज्यशाहीला पहिल्या महायुद्धानें उतरती कळा लागली. उदा०, हिंदुस्थानमधील आर्थिक परिवर्तन त्याचें निदर्शक आहे. देशी भांडवल वाढीस लागून देशी यांत्रिक उद्योगधंदे व कारखाने मँचेस्टरचें स्थान घेऊं लागले. साम्राज्यशाही शोषणाचा दुय्यम भागीदार म्हणून देशी भांडवलदार उत्पन्न झाला आहे. म्हणून भारतीय लोकशाही क्रांतीचा तो वर्ग पुरस्कर्ता होणें शक्य नाहीं. " या रॉय यांच्या मीमांसेवरून रॉयवर आरोप केला गेला कीं, ब्रिटिश साम्राज्यशाही स्वतःचें विसर्जन करावयास लागली आहे व ती हिंदुस्थानच्या राजकीय स्वातंत्र्यास अनुकूल झाली आहे, असें रॉय म्हणतात व ते ब्रिटिश साम्राज्यशाहीची तरफदारी करीत आहेत !

असा आरोप केल्यामुळें १९२९ मध्यें रॉय यांचें नांव थर्ड इंटरनॅशनल मधून आपोआप वगळलें गेलें. नंतर १९२८ पासून रॉय हे जर्मनींत बर्लिन येथें वास्तव्य करून राहिले. तेव्हां जर्मन कम्युनिस्ट पक्षांतहि दोन तट झाले होते. कम्युनिस्टांच्या सत्तारूढ झालेल्या गटाच्या विरोधी असलेले कम्युनिस्ट गट युरोपांतील अनेक देशांत याच सुमारास उद्भवले. आतांपर्यंत हे कम्युनिस्ट मास्कोकडे मानवी दास्याचा अंत करण्यास सज्ज असलेलें श्रेष्ठ मोचकशक्तीचें केंद्र या नात्यानें पहात होते. परंतु आतां संदेह बळावूं लागला. सोविएट रशियाच्या नेत्यांनीं स्टालिनच्या नेतृत्वाखालीं तत्त्वच्युत सत्तेचें राजकारण खेळण्यास प्रारंभ केला.

## उच्च पदार्थविज्ञानाचें अध्ययन

रॉय यांच्या बर्लिनमधील या वास्तव्यांत तत्त्वचिंतनास व विद्याव्यासंगास भरपूर अवसर थर्ड इंटरनॅशनलची जबाबदारी कमी झाल्यामुळें लाभला. आइन्स्टाईन, मॅक्स प्लांक व हैसेनबर्ग यांच्या पदार्थविज्ञानांतील क्रांतिकारक शोधांमुळें पाश्चात्त्य भौतिकवादी तत्त्वज्ञानांत मूलगामी फेर करण्याची आवश्यकता वाटावी असें तत्त्वचिंतकांत वैचारिक आंदोलन सुरू होतें. रॉय यांनीं उच्च पदार्थविज्ञानाचें अध्ययन केलें व आइन्स्टाइनसारख्या पंडितांशीं तत्त्वचर्चेचे प्रसंग साधले. उष्णता हळूं हळूं नष्ट होऊन सर्व विश्वच विराम पावेल या कल्पनेचें खंडन करणारी उपपत्ति रॉय यांनीं मांडिली. त्यामुळें जर्मनींतील पदार्थविज्ञानाच्या व्यासंगी पंडितांस एक प्रकारें कौतुक व आदर उत्पन्न झाला.












रॉय यांच्या जीवनाला मुळांतच निराळें वळण लागलेलें. त्यामुळें त्यांनीं चालू राजकारण व चालू ऐतिहासिक घडामोडी यांच्यांतून मन काढलें नाहीं. चीनच्या अनुभवावर आधारलेली चीनविषयक नवी मार्क्सवादी मीमांसा त्यांनीं जर्मन भाषेंत लिहिली. या ग्रंथांत चीनची प्राचीन समाजरचना, चीनचा धर्म व चीनमधील क्रांति-प्रतिक्रांति यांचें साधार मार्क्सवादी विवेचन केलें. युरोप व अमेरिका येथील मार्क्सवादी व समाजवादी यांना फार मोठें वैचारिक खाद्य रॉय यांच्या या सहाशें पृष्ठांच्या ग्रंथानें मिळालें. हा ग्रंथ १९३० सालीं पूर्ण झाला. नंतर त्यांनीं जर्मनीस रामराम ठोकला.

## श्रीमती एलन् रॉय

रॉय यांच्या पत्नी श्रीमती एलन् व रॉय यांची जर्मनींत प्रथम गांठ पडली. युरोपच्या सहा भाषा चांगल्या लिहितां व बोलतां येण्यासारख्या त्यांच्या तयार असल्यामुळें त्या जर्मन कम्युनिस्ट पक्षांत दुभाषी म्हणून काम करीत.

श्रीमती एलन् यांनीं जेम्स फ्रेझर याचा मानवजातिशास्त्रावरील जगत्प्रसिद्ध महाप्रबंध जर्मन भाषेंत भाषान्तरित केला आहे. युरोपियन कम्युनिस्ट व समाजवादी चळवळींच्या मोठ्या कालखंडाच्या ऐतिहासिक घडामोडी त्यांच्या प्रत्यक्ष अवलोकनांत आल्यामुळें त्यांना राजकीय परिपक्वता आलेली आहे. ही मोठी कणखर बाई आहे. " विवाहित होऊन कोणा एका पुरुष व्यक्तीला जीवित समर्पित करून जीवन जगण्याची कल्पना मला आवडत नव्हती. अनेक मित्र भेटले परंतु विवाहबद्ध होण्याची भावना उपजली नाहीं. परंतु रॉय यांचें व्यक्तित्वच सामर्थ्यशाली, त्यामुळें माझें मन दिपून गेलें. विचारमय प्रकाशांचीं नवीं नवीं क्षितिजें नित्य दाखविणारी ही व्यक्ति होती. तें प्रकाशमय जीवित होतें. त्यांच्या सहवासांत वर्षें क्षणाप्रमाणें निघून गेलीं ! " असे उद्गार दीर्घ निःश्वासासह त्यांच्या तोंडांतून परवां बाहेर पडले.

## डॉ. महमूद

रॉय यांनीं १९३० सालीं हिंदुस्थानांत येण्याचा हिय्या केला. जन्मठेप काळ्या पाण्याच्या शिक्षेची तलवार येथें लटकली होती. " या अग्निदिव्यांतून गेलेंच पाहिजे ! घरची क्रांति सोडून कसें चालल ? " असें म्हणून आल्पस् पर्वतांतील Merano येथील एका रम्य निवासमंदिरांत एलनचा निरोप रॉयनीं घेतला व हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर डॉ. महमूद म्हणून पाऊल ठेवलें.

येथें म. गांधींच्या नेतृत्वाखालीं चाललेली कायदेभंगाची चळवळ ओसरत होती. या चळवळीच्या मेघगर्जनेचे पडसाद युरोपच्या नभोमंडळांत उठलेले रॉयनीं ऐकले होते. म्हणून ते इकडे अधिक आकर्षिले गेले.

गांधी–आयर्विन करारानें स्थिरस्थावर होत होती. डॉ. महमूद तडफेनें व अस्वस्थपणें नव्या ध्येयवादाच्या चळवळीस अनुकूल केंद्रस्थानें तपासीत व स्थापीत संचार करूं लागले. रात्रंदिवस अविश्रांतपणें गांठीभेटी व खाजगी सभा यांचा तडाखा त्यांनीं चालविला. त्यांना अनेक वेळां दिवस उपाशीतापाशीपणें काढावे लागत. कित्येक वेळां रात्रीं १ वाजतां मित्राच्या बिऱ्हाडाचें दार ठोठावून क्षमा मागून आंत शिरत. अवशिष्ट असेल त्यावर तहान भागवीत व पुनः अज्ञात स्थळीं निघून जात. कित्येकदां दिवसांत चार ठिकाणीं स्थलांतरें करावीं लागत. मित्र म्हणत " कोठें तरी एकत्र स्वस्थ कांहीं न करतां बसलांत तर बिनधोक राहतां येईल. " " त्यांत काय अर्थ आहे ? स्वस्थ बसणें म्हणजे पराभव. नच जमलें तर परत परदेशीं होईन " असें उत्तर मिळे. माणूस कितीहि चतुर असला तरी जेथें सरकारला माणूस अगदी जरूरीचा वाटतो तेथें तो किती दिवस छपेल ? मुंबईसारख्या ब्रिटिशांच्या बालेकिल्ल्यांत तर सुतरां अशक्य !

२१ जुलई १९३१ ला रात्रीं एका हुषार पोलीस अधिकाऱ्यानें सर्व वाटा रोखून व इमारतीस वेढा देऊन डॉ. महमूदला पकडलें. सर्व जगाच्या काऱ्याकोपऱ्यांत पहाटेस वार्ता दणाणत गेली.

ते कानपूरकटाच्या खटल्यांतील आरोपी नं. १ म्हणून आहेत हें अगोदरच ठरलें होतें. त्यांच्यावर " राजाचें राज्य उलथून टाकण्याचा कट " केल्याचा आरोप होता. खटला जेलमध्येंच चालला. आरोपीला स्वतःचें निवेदन न्यायाधीशानें करूं दिलें नाहीं व निकाल दिला. १२ वर्षें सक्त मजुरी. नंतर अपिलांत ती ६ वर्षांची झाली. अपेक्षेपेक्षां फारच अल्प शिक्षा








म्हणून त्या रात्रीं आरोपीला समाधानानें झोप लागली !

"माझा बचाव" ('My Defence') या नांवाचें न्यायाधीशानें परवानगी न दिलेलें राय यांचें निवेदन पुस्तकरूपानें पांडेचरीहून प्रसिद्ध झालें. त्याला ब्रिटिश हिंदुस्थानांत बंदी होती.

या 'बचावा'चें महत्त्व भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासांत अनन्यसाधारण आहे. राज्यशास्त्र, कायदे-तत्त्व व मानवी स्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान या दृष्टीनें तर त्याची योग्यता मोठी आहेच; परंतु भारतीय स्वातंत्र्या-च्या सर्व प्रकारच्या प्रयत्नांचें नीतिशास्त्रीय महान् समर्थन म्हणून हा पुराव्याचा कागद वरिष्ठ प्रतीचा आहे. सर्व देशभक्तांच्या गंभीर श्रद्धेचें, भावनांचें व यत्नांचें बौद्धिक मूल्यमापन यांत असून त्यांचे आत्मे कृतार्थ होतील, अशी त्याची संपन्नता आहे. त्यांत सांगितलेला मुख्य निर्णय असा आहे कीं, "ब्रिटिश राजा सनदशीर रीतीनें भारताचा राजा नव्हताच. दुसरें असें कीं, ही बेसनदशीर राज्यसत्ता नष्ट करण्याचे सर्व उपाय व प्रयत्न सर्वथैव न्याय्य व कायदेशीर मानले पाहिजेत. तिसरें असें कीं, कोणतेंहि राज्य जनतेस अमान्य असेल तर तें उलथून टाकणें हा जनतेचा न्याय्य व सनदशीर हक्क आहे."

रॉय यांचे वकील (सध्यांचे भारताचे संघराज्य-मंत्री) पं. कटजू यांनीं हा बचाव मांडण्याचें नाकारलें. परंतु त्यांतील सर्व समर्थन लॉक, ह्यूम, बेंथॅम, बेजेहॉट, डिसी, ब्लॅक्स्टोन इत्यादि ब्रिटिश राज्यशास्त्रज्ञांच्या व कायदेशास्त्रज्ञांच्या आधारेंच केलें आहे. वकील म्हणाले : "यानें शिक्षा अधिक दीर्घ मुदतीची होईल; मी तर शिक्षा कमी कशी होईल या पंचायतींत आहे." रॉय यांनीं सांगितलें : "तें कांहीं असो. माझें समाधान मात्र तुमच्या बचावांत नाहीं."

### बंदिवासांतील जीवन

बंदिवानाच्या दीर्घकालीन जीवनास प्रारंभ बरेली सेंट्रल जेलमध्यें झाला. कित्येक वर्षें भोगलेल्या भूमिगत अज्ञातवासापेक्षां बंदिवानाचें दीर्घजीवन अधिक असह्य असतें असा अनुभव येऊं लागला. भूमिगत अज्ञात-वासांत कारागृहापेक्षां जबर कष्ट असतात, हालअपेष्टांना अंत नसतो, परंतु शूराला त्याची क्षिति नसते. कारण त्यांत संकटांशीं झगडण्याचें एक प्रकारचें स्वातंत्र्य असतें; बंध-नांचें स्वरूप बदलत असतें व झगडण्याचें मार्गहि बदलत असतात; धैर्य व बुद्धिचातुर्य यांचा कस लागत असतो. कारागृहांतला बंदिवान् नित्य अन्तर्बाह्य जखडलेला असतो; त्याच एका कंटाळवाण्या चक्रांत रात्र व दिवस यांचें द्वन्द्व फिरत असतें; कधींकाळीं तरी सुटका होईल, ही आशा तेवढी जीवाला आश्वासन देऊन जगवीत असते; जीवनाच्या शक्तींचा प्रतिदिन होणारा ऱ्हास दिसत असतो. 'बंदिवानाचें जीवन मरणप्राय असतें !" असा या संबंधांतला अनुभव रॉय यांनीं आपल्या 'बंदि-वानाची दैनंदिनी' या पुस्तकांत नोंदून ठेवला आहे.

बरेलीचा उन्हाळा व हिंवाळा दोन्ही फार कडक. तेथील जेलचे उंच प्राकार प्रखर उन्हानें तापून जेलचा फर्नेस बनतो. कपडा घामानें ओला चिंब होऊन सारखी चिकचिक होते. तहान न भागल्यामुळें ओठ सुकून कंठ कोरडा पडतो. रॉय यांचीं बरींच वर्षें पश्चिमेंतील शीत प्रदेशांत गेलेलीं. म्हणून येथील उन्हाळा सोसेना. कपडा व पांघरूण-अंथरूणहि जेम-तेमच. म्हणून थंडी कडाक्याची पडली कीं अंथरुणांत हुडहुडी भरायची. उबाऱ्यावांचून रात्र कंठायची. हातपाय थिजून जायचे. यामुळें त्यांच्या हृदयावर परिणाम कायमचा झाला. त्यांना पोटदुखी व आंत्र-विकार जडला. कारण ते पुनः पुनः आजारी पडूं लागले. अन्नहि अत्यंत रूक्ष व अपुरें मिळे. रविवारीं गूळ मिळाला कीं दिवाळीदसरा. त्यांची शक्ति घटत चालली. डोळे मिटून रामराम म्हणत अर्धतंद्रेंत दिवस घालवायची त्यांना संवय नव्हती व त्यास अनुकूल अशी भावनाहि नव्हती. त्याच परिस्थितींत अखंड लेखन व सतत विद्याभ्यासंग हें मानस तप त्यांनीं निरंतर सुरूं ठेवलें. हस्तव्यवसायांतहि त्यांना गंमत वाटायची. ते मधून मधून चरखाहि चालवीत. यामुळें म. गांधींनीं आपणांवर मात केली, अशी कबूलीहि त्यांनीं दिली.

रॉयना पुस्तकें व नियतकालिकें मिळण्याच्या बाबतींत बहुत जिकीर व्हावयाची. त्यांचे मित्र, युरोप-अमेरिका येथूनहि जर्मन, फ्रेंच व स्पॅनिश भाषेतलीं पुस्तकें पाठवीत. तीं येथें आलीं तरी मिळाव-यास महिने निघून जात. कारण तीं कोणत्या विषयाचीं आहेत, याची खात्री करून घेण्यांत अधिकाऱ्यांचा वेळ जाई. रॉयना तर पुस्तकांच्या प्राप्तीविषयीं प्रियतमेसारखी उत्कंठा लागे.

त्यांनीं जेलमधून विस्तृत पत्रें पाठविलीं. त्यांचें

पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. त्याच्या प्रस्तावनेंत मुंबईचे प्रथितयश डॉ. एरुळकर लिहितात कीं "या लेखकाचें मन किती सुसंस्कृत व संपन्न आहे, माणसें, वस्तू, विविध घडामोडी – यांनीं भरलेल्या परिस्थितीच्या चावर्तीत तें किती सूक्ष्म संवेदनशील आहे, व तें किती वैचित्र्यपूर्ण व सामर्थ्यशाली प्रतिक्रियांना प्रसवणारें आहे हें या पत्रांवरून प्रत्ययास येतें. हीं पत्रें म्हणजे एक उत्कृष्ट वैशिष्ट्याचा वाङ्मयप्रकारच होय."

रॉयनीं जेलमध्यें अनेक ग्रंथ लिहिले व अनेक मोठ्या प्रबंधांचीं टिप्पणें लिहिलीं. डॉ. एरुळकर आणखी लिहितात : "इतक्या खडतर जीवनदशेंतहि इतकें उच्च चिंतनपर प्रचंड लेखनकार्य रॉय करूं शकले, ही आशा व इच्छाशक्ति यांची खूण आहे. हजारों मैलां-वरून खटपटीनें पाठविलेलीं पुस्तकें मिळण्याकरितां नित्य खटखट होत होती. लेखनसाहित्यहि देण्यांत कंजूषपणाची कमाल व्हावयाची. कागद अगदी तुटपुंजा मिळायचा. रॉयनीं अशाहि परिस्थितींत प्रचंड लेखन केलें. डोळे फाडून कांहीं ठिकाणीं वाचावें लागतें इतक्या बारक्या अक्षरांत समास न सोडतां लिहिलेलीं हजारों पृष्ठें त्यांच्या संग्रहांत पहायला मिळालीं. रॉयना आणखी वेळ मिळावा व त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध व्हावे अशीं अपेक्षा लिखाणाचे भार पाहिल्यावर अनावर झाली."

जेलमध्यें असतांना रॉय यांचें तीन प्रश्नांवर चित्त एकाग्र झालें होतें : (१) आधुनिक विज्ञानाच्या नव्या शोधांनीं तत्त्वज्ञानांत उत्पन्न झालेल्या मौलिक अडचणीं-तून बाहेर कसें पडावें ? (२) जगांत फासिस्ट हुकूम-शाही वाढीस लागली आहे. त्यामुळें लोकशाही संस्कृति केव्हां विनाशाप्रत जाईल याचा नियम नाहीं, असें भय उत्पन्न झालें आहे. यांतून कोणत्या उपायांनीं जग सुटका करून घेऊं शकेल ? (३) भारताची संस्कृति व समाजसंस्था जीर्णावस्थेंत रुद्ध आहे. वैचारिक नव-जीवनानेंच तिला मरण टाळतां येईल. त्या वैचारिक नवजीवनाच्या प्रथम गरजा कोणत्या ?

रॉय यांनीं कारागृहवासांतील अखेरीचे दिवस डेराडूनच्या जेलमध्यें काढले. जेलमधून २० नोव्हेंबर १९३६ ला सुटका झाली. बाहेरून दिसायला कणखर परंतु आंतून पोखरलेली प्रकृति घेऊन ते बाहेर आले. मित्रमंडळी लांबून रेल्वेप्रवास करून स्वागतास आली. त्यांपैकीं कोणाचीच सांपत्तिक स्थिति फारशी चांगली नव्हती. रॉय यांच्या अकिंचन परंतु स्वतंत्र जीवन-क्रमाचा पुनश्च हरिः ओम् झाला.

### कांग्रेसमधील तीन वर्षें

कोणत्या राजकीय संघटनेंत प्रथम सामील होऊन पहावयाचें हें जेलमध्यें खूप विचार करून अगोदरच ठरलें होतें. कॉंग्रेससमाजवादी गट कॉंग्रेसमध्यें होता. त्याबद्दल खरें प्रेमहि होतें. परंतु संघटनेच्या मुद्द्यावर रॉय यांचा मतभेद होता. मतभेद असा : समाजवादी पक्ष म्हणून कॉंग्रेसमध्यें राहूं नये; पक्षांत दुसरा पक्ष ही विसंगति आहे. दुसरें असें कीं, कॉंग्रेस ज्या ध्येयांकरितां अस्ति-त्वांत आली त्याला लोकशाही क्रांतीचा उत्तम कार्य-क्रमच अधिक समर्थ करील; समाजवादी कार्यक्रम नव्हे. समाजवादी पक्षाशीं या मतभेदामुळें रॉय यांचें शेवटपर्यंत जमलें नाहीं. कम्युनिस्ट पक्षाची वाट दोन्हीं बाजूनीं बंद होती. रॉय व कम्युनिस्ट पक्ष यांचें मार्क्सवाद हें मौलिक साम्य होतें. पण जवळची परंतु परिपक्व विचारसरणीची व्यक्ति किंवा संघटना ही कम्युनिस्टां-च्या दृष्टीनें पहिल्या क्रमांकाचा शत्रु. अर्ध्याकच्च्या विचाराचे व समान ध्येयाचे गट हे कार्यकर्त्यांना जाळ्यांत पकडण्याचें क्षेत्र म्हणून कम्युनिस्ट पक्ष मानतो. अगदीं मूलतःच विरुद्ध असलेल्या विचाराच्या व्यक्ती वा गट ह्यांस प्रसंगानुसार संधिसाधू डाव टाकून जवळ करावयाचें किंवा दूर लोटावयाचें, हें नेहमींचें कम्युनिस्टांचें धोरण होय. कम्युनिस्ट पक्षाच्या या अव्वल सत्तास्पर्धेच्या राजकारणाची पूर्ण माहिती असल्यामुळें रॉय यांनीं तो मार्गच दृष्टीआड केला होता.

कॉंग्रेसमध्यें रॉय यांना खरोखर स्थान नव्हतेंच. रामगड कॉंग्रेसमध्यें अखेर श्री. राजेंद्रप्रसादांनीं उघडच सांगितलें कीं "रॉय यांचा मार्ग व कॉंग्रेसचा मार्ग यांत मौलिक तफावत आहे." पं. नेहरूंनींहि त्यास दुजोरा दिला. रॉय यांनीं दोन गोष्टी कॉंग्रेसपुढें ठेवल्या होत्या : एक, कॉंग्रेसची स्थानिक जनसमित्यांच्या संघटने-वर उभारणी करावी; या स्थानिक, प्रांतीय व राष्ट्रीय जन-समित्यांच्या संघटनेनें आर्थिक व राजकीय ध्येयानें झगडा वाढीस न्यावा; संघटना पूर्णपणें जनताव्यापी होईपर्यंत झगड्याचें स्वरूप आर्थिक मागण्यांवर भर देणारें असावें; आत्मविश्वास आल्यावर घटनासमिति स्थापून लोकशाही क्रांति घडवून आणावी. हिंसा कीं अहिंसा,








हा यामध्यें वादाचा मुद्दा नव्हता. या विचाराचा प्रचार करण्याकरितां रॉयनीं ‘ लीग ऑफ रॅडिकल काँग्रेसमेन ’ स्थापिली आणि ‘ इंडिपेंडंट इंडिया ’ हें साप्ताहिक सुरूं केलें. याच साप्ताहिकास ‘रॅडिकल ह्यूमॅनिस्ट’ असें नवें नामाभिधान अलीकडे देण्यांत आलें आहे. रॉय हे अत्यंत धिम्मेपणानेंच भारतीय राजकारणाकडे बघत. नजीकच्या काळांत अनुकूल असा बदल होईल असें त्यांनीं मनोमनीं कधीं मानलें नव्हतें. लोकशाही राजकारणास आवश्यक अशी वैचारिक क्रांति या देशास आवश्यक आहे, असें रॉय यांनीं ध्यानांत घेतलें होतें. १९२२ सालीं आधुनिक भारताची जी राजकीय मीमांसा त्यांनीं लिहिली, त्यांतील विचारांतून ही कल्पना निघाली. “ येथील पुराणमतवाद व रूढिनिष्ठा लोकशाहीला रुजूं देणार नाहीं. सतत परिवर्तनशील समाजसंस्थेचें लोकशाही हें मुख्य साधन आहे. विचारसमर्थ माणसें ही लोकशाहीची मुख्य गरज आहे. बदलत्या जगांत माणसांस नित्य नवा विचार सुचावा लागतो, नाहींतर माणूस पराभूत होतो; येथील मनावर परंपरेचीं जीं बंधनें आहेत, तीं नवा विचारच निर्माण होऊं देत नाहींत. हें वैचारिक क्लैब्य हरण करणें जरूर आहे. ” अशा संकेतानें त्यांनीं डेराडून येथें ‘ रेनासन्स इन्स्टिट्यूट ’ ( Renaissance Institute ) काढली. चालूं राजकारणांवर प्रत्यक्ष प्रभाव उत्पन्न नाहीं झाला तरी हरकत नाहीं कारण त्यांस मोठ्या अडचणी आहेत; भविष्याचा पायाच घालणें योग्य असें त्यांनीं ठरवून ही संस्था निर्मिली.

काँग्रेसमध्यें रॉय यांनीं तीन वर्षे काढलीं. १९४० सालीं दुसरें महायुद्ध सुरूं झाल्यावर जागतिक राजकारणांत हिंदी राजकारण पूर्णपणें गुंतलें. मूलगामी मतभेदाचा प्रश्न उद्भवला. रॉयना त्यामुळें काँग्रेसमधून बाहेर पडणें भाग पडलें.

## दुसऱ्या महायुद्धाची मीमांसा व लोकनिंदा

“ मानवजातीनें आजपर्यंत जी प्रगति केली, चिरंतन मानवी मूल्यांची साधना केली तीच या संग्रामांत धोक्यांत आहे; हा केवळ राजनैतिक संग्राम नाहीं; त्यांत हुकुमशाही–विरुद्ध लोकशाही–हाच मुद्दा गुंतलेला नाहीं, तर मानवी स्वातंत्र्य विरुद्ध गुलामगिरी हा मुद्दा मुख्यतः गुंतलेला आहे. मानवी स्वातंत्र्याचें जग प्रलयाग्नींत सांपडलें आहे. हुकुमशाहीविरोधी संग्राम जिंकणें म्हणजे भारतीय स्वातंत्र्याचाहि प्रश्न सोडविणें होय ” अशी रॉय यांची धारणा त्या वेळीं होती; त्यांनीं केलेल्या दुसऱ्या महायुद्धाच्या मीमांसेंत ती प्रकट केली आहे. हिंदी राजकारण संकुचित राष्ट्रवादाच्या भावनेस बळी पडलें व त्यानें जागतिक मानवी स्वातंत्र्याला त्याच्या नशीबावर सोपविलें.

रॉयनीं दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीं अशी आपली निराळी राजकीय भूमिका घेतली व त्याकरितां निराळा राजकीय पक्ष (‘रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी ’) काढला. रॉय यांनीं सॉक्रेटिसाप्रमाणें नव्हे तर शंकराप्रमाणें लोकनिंदेचें, भयंकर अपकीर्तीचें हालाहल प्राशन करण्याचें ठरवून फॅसिझमविरोधी राष्ट्रांची बाजू घेतली.

हें “ युद्ध ब्रिटिश साम्राज्यशाहीचा अंत करीलच, त्याबद्दल संदेह बाळगण्याची गरज नाहीं ” असें स्पष्ट भविष्य १९४० सालीं रॉयनीं सांगितलें. “ इंग्लंडची बाजू घेणें म्हणजे ब्रिटिश साम्राज्यशाहीची बाजू घेणें नव्हे. पहिल्या महायुद्धानें ब्रिटिश साम्राज्यास उतरती कळा लागली; या दुसऱ्या महायुद्धानें त्या साम्राज्याचा आर्थिक पायाच नष्ट होईल. इंग्लंडनें हें युद्ध जिंकलें तर साम्राज्याला अधिक आयुष्य लाभेल हें म्हणणें अत्यंत तर्कदुष्ट आहे. साम्राज्य टिकविण्याचा उद्देश साम्राज्य टिकवूं शकत नाहीं. त्या साम्राज्याचा पायाच साम्राज्य टिकवूं शकतो. तो पायाच हें युद्ध नष्ट करीत आहे. ”– अशी साम्राज्यमीमांसा रॉयनीं त्या वेळीं मांडली. मानवेंद्रनाथ रॉय हेच एकटे अशी मीमांसा सांगणारे सगळ्या मानवी जगांत तेव्हां होते.

## मानवी एकतेच्या विशुद्ध सत्याचें दर्शन

१९२० सालापासून रॉय यांना ज्या परमार्थाचा साक्षात्कार झाला, त्यावरच ते शेवटपर्यंत स्थिरावले. ती निष्ठा अधिकाधिक बळावत गेली. मार्क्सवादानें त्यांना त्या निष्ठेवर आणून सोडलें. तिला अव्ययावत् बौद्धिक विचारवैभवानें बळकट करण्याचें कार्य मार्क्सवादानेंच केलें. वस्तुतः, स्वामी विवेकानंदांच्या प्रसन्न अध्यात्मवादाच्या संस्कारांनींच प्रथम कौमारावस्थेंत या निष्ठेचीं बीजें रोवलीं गेलीं. मार्क्सवादानें राष्ट्रवादी अहंकाराचीं शकलें उडविलीं व मानव्याच्या एकतेचें सत्य निरुपाधिक विशुद्ध रूपांत दाखवून दिलें. हें मानवी एकतेचें विशुद्ध सत्य हाच रॉय यांचा परमार्थ होय. याच परमार्थानें सोविएट यूनियन व थर्ड इंटरनॅशनल यांच्या-








कडे ते आकर्षिले गेले; कम्युनिझमूचाच नव्हे तर मार्क्सवादाचाहि अंगीकार केवळ याच निष्ठेचें उपांग म्हणून त्यांनीं केला; त्याच परमार्थाच्या सिद्धीकरितां त्यांनीं वेळोवेळीं निरनिराळ्या मार्गांचा स्वीकार व त्याग केला. कम्युनिझमूच्या पलीकडे त्यांना त्याच निष्ठेनें नेलें. या आपल्या निष्ठेचा अर्थ त्यांनीं **नवमानवतावाद** या बौद्धिक तत्त्वज्ञानाच्या स्वरूपानें अखेरीस १९४७ सालीं मांडला.

'रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी'चें विसर्जन त्यांनीं १९४८ सालाच्या शेवटीं केलें. राष्ट्रवादी राजकारण हें लोकशाहीला मर्यादा घालतें व संकटकाळीं तिचा बळीहि घेतें हें आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या ऐतिहासिक अनुभवांचें रहस्य त्यांनीं दुसऱ्या महायुद्धांत मांडलें. पक्षनिष्ठ राजकारण वा पार्लमेंटरी लोकशाहीसुद्धां अंतिम अर्थानें लोकशाहीला नेहमीं मर्यादा घालते व संकटकाळीं अविवेकी बनून लोकशाहीचीहि पर्वा करीत नाहीं, अशा निर्णयाला ते ते पोंचले. तदर्थ त्यांनीं स्वपक्षाचेंहि विसर्जन केलें.

आधुनिक जगांत मानवी कुलाला विनाशाच्या संकटांतून जी आध्यात्मिकता तारील ती श्रेष्ठ आध्यात्मिकता होय. ती कशांत आहे ? आज सामुदायिक अहंकारदेवतेला मानव्याचा बळी दिला जात आहे. राष्ट्रवाद व कम्युनिझम् ही त्या देवतेचीं दोन रूपें आहेत. मानवी स्वातंत्र्य व सद्गुण यांचें हवन या देवतेच्या स्थंडिलावर चाललें आहे. संकटांतून जी श्रद्धा व निष्ठा माणसाला वांचवील त्या श्रद्धेंतून व निष्ठेंतून प्रकट होणारी या युगाची प्रज्ञा हीच श्रेष्ठ आध्यात्मिकता होय. अशी प्रज्ञा मानवेंद्रनाथ रॉय यांच्या **नवमानवतावादाच्या** रूपानें मूर्त रूपांत आली आहे.

## अनंत श्रद्धा, सत्यनिष्ठा आणि अनासक्ति

आपला ध्येयवाद निरपवादपणें आचरणांत आणणें व आचरणांत आणतांना येणारीं संकटें सोसण्यास व त्याकरितां सर्वस्व गमावण्यास तयार होणें हें अनंत श्रद्धेचें लक्षण होय. त्या श्रद्धेला सत्याचें स्वभावसिद्ध नितांत आकर्षण असतें. परंतु पूर्वपरंपरागत संस्कार व भावना यांचीं बंधनें बुद्धीला सत्याची प्रतीति होण्यास प्रतिबंध करीत असतात. हीं बंधनें श्रद्धेचीं अंगें बनतात. बुद्धिद्वारा प्रमाणांच्या योगांनीं सत्याची समीक्षा निरंतर करीत राहिलें तरच सत्याच्या जवळ मनुष्य जाऊं शकतो. समीक्षेस नित्य तत्पर राहणें हें सत्यनिष्ठेचें लक्षण होय. अशी सत्यनिष्ठा आधुनिक अध्यात्मवाद्याच्या ठिकाणीं सांपडत नाहीं. तिला श्रद्धेपासून वेगळी करण्याच्या मोहांत तथाकथित अध्यात्मवादी सांपडला आहे. वर्तमानकालांतील अध्यात्मवादी परंपरा अवनत झाल्याचें हें मुख्य गमक आहे. पुरातन युगाचा हा हीन वारसा आहे. पुरातन युगांत मानवी ज्ञानाच्या मर्यादा लवकर बदलत नसत. त्यामुळें ज्ञान शब्दप्रामाण्याच्या मर्यादेत बंदिस्थ होतें. त्यामुळें श्रद्धा व सत्यनिष्ठा एकच होत असे. परंतु हें युग ज्ञानाच्या मर्यादा अनन्त अवकाशांत सतत विस्तार पावण्याचें आहे. बाह्य जगाचेंच नव्हें तर अंतरंगाचेंहि ज्ञान विस्तार पावत आहे. याची दखल वर्तमान युगांतहि जुन्या संस्कारांच्या कारागृहांत बद्ध असलेल्या अध्यात्मवाद्यानें घेतलेली नाहीं.

ध्येयवादाप्रमाणें आचरण करणें व त्याच वेळीं त्याची सतत समीक्षा करीत राहणें हें मानवेंद्रनाथ रॉय यांच्या जीवनाचें रहस्य होय. अनंत श्रद्धा व सत्यनिष्ठा यांचा उच्चतम समन्वय त्यांनीं साधला होता. त्याकरितां लागणारी संपूर्ण अनासक्ति त्यांनीं हृदयांत बाणविली होती. पूर्वयुगापेक्षां या विज्ञानयुगाला अनासक्तीची अधिक गरज आहे. तिचा भावार्थ व्यापक बनला आहे. अनासक्तीशिवाय पूर्वसंस्कार व परंपरेच्या भावना यांचीं हृदयावरचीं बंधनें तोडून टाकण्याचें मनःसामर्थ्यच लाभूं शकत नाहीं. सत्याचा व स्वातंत्र्याचा पंथ अनंत आहे, हें प्रत्ययास आल्याशिवाय असें मनःसामर्थ्य लाभूं शकत नाहीं. सत्याचा शोध व स्वातंत्र्याची अन्वेषणा ही मूलभूत मानवी प्रेरणा होय. तिच्यावर आधारलेल्या कर्मयोगशास्त्रावर नवमानवतावादाच्या स्वरूपांत मानवेंद्रनाथ रॉय यांनीं प्रकाश टाकला आहे. नव्या विज्ञानाची पार्श्वभूमि या नवमानवतावादास उजळून टाकीत आहे. ते कर्मयोगी होते, स्वातंत्र्याच्या त्या अनंत मार्गाचे पथिक व मार्गशोधक होते. मार्गदर्शनाच्या चिरंतन खुणा कालपथावर राखून ते कालातीत झाले आहेत.








मानवेन्द्रनाथ रॉय : अनु०-श्री. वि. म. वेडेकर

# जतीन मुखर्जी

आम्हीं त्यांना नुसतें 'दादा' म्हणत असूं; दादांच्या या भूमींत आणि युगांत ते अद्वितीय होते, त्यांना तोड नव्हती ! ते 'बडादादा' हि नव्हते; नुसते 'दादा'च. जसा आधुनिक कलेमध्यें तसाच आपल्या शैशवी ( infantile ) राजकारणांतहि 'दादा पंथ' ( Dadaism ) हा एक निर्बुद्ध, बुद्धिवाद-विरोधी पंथ होता. यांत भक्ति होती पण ती भगतगिरीनें किंवा भोंदूगिरीनें डागळलेली होती, मत्सरावर साधुत्वाचें शर्करावगुंठन केलेलें होतें आणि बनिवेला विभूति-पूजकाच्या अंध भक्तीचा टेंकू होता. परंतु जतीनदा अशा या 'दादा' पंथाचे गुरु होऊन बसणारे नव्हते.

आम्हीं त्या वेळीं एका अस्पष्ट स्वप्नाळु ध्येयवादाच्या वातावरणांत रहात होतों. जीवनाला कांहीं एक दिशा आहे, जीवनाचीहि कांहीं एक पद्धति आहे याची आम्हांला कल्पनाहि नव्हती; मग एखादें तत्त्वज्ञानांतील दर्शन वा पंथ तर दूरच ! एक मात्र इच्छा आमच्या सर्वांच्या जाणिवेंत अत्यंत उत्कटपणें वसत होती. ती म्हणजे पराक्रमी वीर म्हणून आपलें नांव इतिहासांत कायमचें नमूद व्हावें, कालाच्या विशाल पुलिनावर आपलीं पावलें कायमचीं उमटलेलीं रहावी ! साउदी ( Southey )च्या कविता त्यावेळीं कॉलेजच्या पाठयपुस्तकांतून नेमलेल्या असत. बारीन घोष हे अतिचिकित्सकपणानें आमच्या ध्येयवादाचे इन्द्रधनुष्याप्रमाणें रमणीय रंगाचे फुगे निर्दयपणें टोंचून फोडून टाकीत असत. बारीन घोष स्वतःच एक ध्येयवादाचे महान् अध्वर्यु होते. आम्हीं ज्या ध्येयरूपी देवाचें पूजन करीत होतों, त्या देवाचे 'मातीचे पाय' ते उघडे करून दाखवीत असत ! तरी पण त्या वेळीं आमची भक्तिभावना इतकी उत्कट व परमावधीची होती कीं तीमुळें या 'कल्माषपाद' देवाची पूजा चालू ठेवायचें नैष्ठिक आमच्या अंगचें धैर्य कमी झालें नाहीं. बारीन घोष म्हणत असत कीं, भ्याडांतला भ्याड मनुष्य देखील, जर त्याला सर्व देश आपलें कौतुक टाळया वाजवून करीत आहे याची जाणीव असेल तर, फांशीच्या खांबापर्यंत चालत जाऊन खुशाल फांशीं जाईल ! बारीन घोषांच्या या विधानानें माझ्यावर अत्यंत खोल असा परिणाम घडवून आणला. मी जो पुढें माझ्या जीवनाचा मार्ग स्वीकारला त्याची दिशा बारीन घोषांच्या या विधानानेंच बहुधा ठरली असावी. "तर मग आमचा सर्व ध्येयवाद – देशकाजाकरितां प्राणार्पण करायची आमची तळमळ – म्हणजे शेवटीं आमच्या स्वार्थी वासनेचाच आविष्कार होता का ? पुढील पिढ्यांनीं आमचें पुण्यस्मरण व नामसंकीर्तन करावें यासाठींच का हें सगळें ?" – असा प्रश्न माझ्या मनांत सारखा घोळत राहिला. तथापि तारुण्यांतील उत्साह दुर्दम्य असतो; त्यावर असें सहजासहजीं विरजण पडत नाहीं. अर्थात् बारीनना देखील आमच्या तारुण्यसुलभ उत्साहावर विरजण घालायचें होतें, असें मलाहि वाटत नाहीं. बहुधा बारीन यांचा आशय असा असावा कीं, आम्हीं उत्तरोत्तर पराक्रमी वीर तर बनावेंच पण त्यापेक्षांहि आम्हीं अधिकाधिक सज्जन बनलें पाहिजे. असो. आमच्या ध्येयवादी स्वप्नरंजनाचे खरी फुगे बारीन असे भोंक पाडून फोडीत असले तरी ते आम्हीं आपले पुन्हां सांधून घेत असूं. आणि आमचे पाय जमीनीवर चालत असले तरी आमचीं डोकीं अस्मानांत विहार करीत होतीं !

त्या वेळची सर्वच दादा-मंडळी आपल्या भगतगणावर आपल्या मोहनास्त्राचे धंदेवाईक प्रयोग करीत असत. दुसऱ्याला मोहिनी घालण्याइतकें खरें गुणसामर्थ्य त्यांच्यापाशीं नव्हतेंच. जतीन मुखर्जींच्या अंगीं मात्र दुसऱ्याला आकर्षून घेण्याचें लोहचुंबकाचें सामर्थ्य

'Independent India' २७।२।१९४९ च्या अंकांत आलेल्या 'Jatin Mukherji' या मूळ इंग्रजी लेखाचा हा अनुवाद आहे.








(magnetism) होतें. म्हणूनच आपल्या चेल्यांना जाळ्यांत अडकविण्याचा खेळ खेळणाऱ्या दादामंडळींना जतीनबाबू म्हणजे एक गूढ होतें. त्यांच्यापुढें ती मंडळी हात टेंकीत असत. मोहक जाल पसरणें जतीनदादांच्या हातून कधींच झालें नाहीं. असें असूनहि सर्वांची त्यांच्यावर भक्ति होती, अगदीं इतर दादांच्या भक्तगणांची देखील!

एका प्रसंगीं एका संभाषणांतील कांहीं वाक्यें माझ्या कानावर पडलीं. मी अजून जतीनदादांचा अनुयायी झालों नव्हतों, दुसऱ्याच एका दादांच्या परिवारांत होतों. ते आमचे दादा आपल्या एका चेल्याला त्याच्या व्यभिचारी, अस्थिर निष्ठेबद्दल रागें भरत असतांना मला ऐकूं आलें. तो चेला दुसऱ्या एका दादाकडे जाऊं येऊं लागला होता. त्या 'निष्ठाभ्रष्ट' चेल्याची बराच वेळ कानउघाडणी झाली. शेवटीं बिचारा चेला त्या प्रवचनानें अगदीं टेंकीस येऊन मिनतवारीनेंच म्हणाला : "दादा, त्यांना मी भेटूं नये असें आपणांस कां वाटतें? उलट त्यांचें तर मला असें सांगणें आहे कीं मी तुम्हांला अंतर देऊं नये! स्वतःच्या पक्षांत येऊन मिळण्याबद्दल त्यांनीं मला कधींच सांगितलें नाहीं. त्यांना स्वतःचा असा पक्षच नाहीं".

दादा व चेला यांचें वरील संभाषण मी ऐकत असतांना, हा दुसरा विचित्र मुलखावेगळा दादा आहे तरी कोण हें जाणण्याची माझी तीव्र जिज्ञासा वाढली. इकडे चेल्याच्या वरील शेवटच्या उत्तरानें दादा भयंकर चिडून गेले आणि त्यांनीं चेल्याला 'इथून चालता हो' म्हणून सांगितलें. दादांच्या या कानउघाडणीमुळें खट्टू झालेला माझा हा 'गुरुबंधु' तेथून बाहेर पडल्यावर, मी त्याला लगेच त्याचा कुडता धरून थांबविलें व माझी जिज्ञासा त्याला सांगितली. दुसऱ्या दिवशीं तो मला त्या दुसऱ्या दादांकडे घेऊन गेला. आणि त्या पहिल्या भेटींतच, दादांचा नेहमींचा 'चेला-धरा'चा खेळ न खेळणाऱ्या मुलखावेगळ्या या नवीन दादाच्या जाळ्यांत जों मी सांपडलों तो कायमचाच! या माझ्या नवीन दादांची मोहिनी माझ्यावर कशामुळें पडली याचें कोडें त्यावेळीं मला उलगडलें नाहीं. अंगकाठी पहातां, ते सामान्य चार माणसांसारखे दिसत. ते कसलेले कुस्तीगीर होते व त्यांच्या भीमसामर्थ्याविषयीं दंतकथाहि खूप प्रचलित होत्या. पण त्यांच्या शरीरयष्टीकडे पाहून तसें वाटेना! त्यांच्या वागण्यांत 'आपण कोणी मोठे असून दुसऱ्याला उपकृत करीत आहोंत' अशी ऐट किंवा आव बिलकुल नव्हता! या दादा-पंथांत आणखी एक धंदेवाईक मखली होती. ही दादामंडळी सूचक शब्दांची पेरणी करून असा भास उत्पन्न करीत कीं "आपली गुप्त कटाची संघटना अवाढव्य असून तिच्या असंख्य शाखा–उपशाखांचें जाळें सर्वत्र पसरलें आहे, त्यांतून दारूगोळा, शस्त्रास्त्रें व द्रव्य यांचें अमूप सांठे जय्यत तयार आहेत, आपल्या मायभूमीला मुक्त करण्याकरितां योग्य काळाची आपण वाट पहात आहोंत"! पण ज्या या नवीन दादांकडे मी गेलों होतों, त्या दादांच्या बोलण्यांत या खोट्या आविर्भावाचा मागमूसहि नव्हता. या नवीन दादांच्या आकर्षणाचें रहस्य कशांत आहे, याचा मला नंतर पुढें उलगडा झाला. त्यांच्या आकर्षणाचें बीज त्यांच्या व्यक्तित्वा-(Personality) मध्यें, त्यांच्या मानव्यांत होतें. त्यानंतर आतांपर्यंत हल्लींच्या अनेक थोर असामान्य व्यक्तींचा परिचय करून घेण्याचें भाग्य मला लाभलें आहे. या मला भेटलेल्या असामान्य व्यक्ती थोर, मोठ्या खऱ्या. पण जतीनदांचा विशेष हा कीं ते सज्जन होते. त्यांच्यापेक्षां नव्हे त्यांच्याइतका सज्जन मनुष्य मला अजून भेटायचा आहे!

ज्या काळीं माझी व जतीनदांची गांठ होऊन मी त्यांच्या व्यक्तित्वानें मोहून गेलों तो काळ हल्लींच्या पेक्षां फारच भिन्न होता. हल्लींच्याप्रमाणें बहुसंख्याक जनतेवर वशीकरणविद्येचें इन्द्रजाल पसरून, असंख्य अनुयायांचे मोठमोठे पक्ष बनविणें त्या काळीं अवगत नव्हतें. त्या काळीं सर्वच दादांना अनुयायी असत, पण ते बहुधा दशकांनीं, क्वचित् शतकांनीं मोजण्याइतकेच! लाठीकाठीनें सुसज्ज असें 'आनन्दमठ' छापाचें सैन्य घेऊन फोर्ट विलिअम किल्ल्यावर तुटून पडायचें हें त्या वेळचें ध्येय असून तें दीर्घकालानंतरच साध्य होणारें होतें. त्यावेळीं 'हरहर महादेव' ही नुसती रणगर्जना करणेंहि धोक्याचें होतें. कांहीं १०–१२ उतावळे देशभक्त अशी रणगर्जना करीत. पण लगेच त्यांना १२४ अ कलमाखालीं अटक होत असे. मधून मधून हे राजकीय क्रान्तिकारक कांहीं दहशतवादी 'कृति' (action) करून दाखवीत. अशा 'कृतीं-'








मुळें वीरोचित पराक्रमाची उजळणी व संचय होत असे. अशा 'कृती'च्या समयीं कित्येक वेळां रणगर्जना भलत्याच वेळीं होऊन, आजूबाजूचे सगळे लोक जागे होत आणि योजिलेला दहशतवादी राजकीय दरोडा मध्येंच सोडून द्यावा लागत असे. अर्थात् कांहीं वेळां हे राजकीय क्रान्तिकारक जिद्दीला पेटून, कोण बळी पडताहेत याचा विवेक न करतां बेछूटपणें भरमसाट ( indiscriminate ) गोळीबार करीत असत. अशा भरमसाट अविवेकी बेछूट गोळीबार करण्याला जतीनदा कसून विरोध करीत असत. त्यांच्याच सल्ल्यानें (– हुकुमानें नव्हें कारण ते 'हुकूम' करीतच नसत –), या देशभक्तांनीं ऐन घडीच्या आधीं भलत्याच वेळीं लष्करी पथकाप्रमाणें गोळया घालूं नयेत यासाठीं, तो क्रान्तिकारक 'छापा'च रद्द करावयाचें कटु 'अमंगल' समजलें जाणारें कर्तव्य मला अनेक वेळां करावें लागलें आहे.

आज काळ बदलला आहे. ज्या महापुरुषानें साम्राज्यवादी सत्तेविरुद्ध कट करणारा, अतुलनीय शौर्य-धैर्याचा एक महान् क्रान्तिकारक म्हणून नांव मिळविलें, त्याची आज आधुनिक हिंदुस्थानच्या इतिहासांतील एक थोर व्यक्ति म्हणून पुण्यस्मृति साजरी होत आहे. त्यांचा वाढदिवस साजरा झाला, त्यांचीं चरित्रें-हि लिहिलीं गेलीं. त्यांच्यानंतर लोटलेल्या या मध्यंतरीच्या काळांत, हिंदुस्थानच्या राजकीय व्यासपीठावर नेते म्हणविणाऱ्यांची ऐन गर्दी उडालेली आहे. "थोर असामान्य विभूतींच्या देव्हाऱ्यांत आम्हांला जागा पाहिजे; तीहि नसल्यास इतिहासाच्या सभामंडपांतील एक कोनाडा तरी ( niche ) आम्हांला द्या" अशी मागणी ही नेते-मंडळी आज अहमहमिकेनें करीत आहेत. जतीन्द्रांच्या जीवनाभोंवतीं जें दंतकथांचें वलय आहे तें बाजूला करून त्यांच्या प्रत्यक्ष कृतींवरून जर त्यांच्या थोरवीचें मूल्यमापन केलं, तर असेंहि शक्य आहे कीं कदाचित् हल्लींच्या राष्ट्रवीरांच्या खच्चून भरलेल्या यादींतून त्यांचें नांव गळेलहि ! समजा, तसें झालें तर त्यांत कांहीं शोक करण्यासारखें झालें, हल्लीं इतिहास ज्या तऱ्हेचा लिहिला जातो तो इतिहासच खोटा, असें समजण्याचें कारण नाहीं. मला तर वाटतें कीं, खुद्द जतीनदांनाहि या प्रकाराबद्दल खंत वाटणार नाहीं. पुरुषश्रेष्ठाचा एक मूळ आदर्श ( archetypal man ) या दृष्टीनेंच जतीनदांचें गुणग्रहण झालें पाहिजे. त्यांच्यासारखे पुरुषश्रेष्ठ विरळाच. असे पुरुषश्रेष्ठ या लोकांत अवतीर्ण होऊन काळाच्या विशाल पुलिनावर आपलीं पदचिन्हें न उमटवितांच निघून जातात. परंतु वस्तुतः पहातां हेच पुरुषश्रेष्ठ प्रकाशप्रदान करीत असतात. सामान्य, निर्बुद्ध, बुद्रुक, बुद्रूपणा-(mediocrity)नें बुजबुजलेल्या आपल्या या समाजांत सर्वत्र अंधार पसरलेला आहे; मारून-मुटकून बनविलेल्या तथाकथित थोर व्यक्तींच्या तेजाचे नेत्रदीपक लोळ मधून मधून तळपून जातात; पण या तेजाच्या लोळांमुळें आजूबाजूचा अंधार कमी न होतां, उलट तो अधिकच निबिड होतो. जतीनदांसारखे ज्योतिर्मय पुरुषश्रेष्ठ मात्र आपल्या तेजानें या अंधाराचा भेद करून स्थिरपणें, संतत प्रकाशदान करीत असतात.

जतीनदांच्या जीवनांतील घटना क्रमवार घेऊन, त्यांत त्यांच्या वीरपराक्रमाच्या दंतकथांचा माल-मसाला भरून, त्यांचें चरित्र लिहितां येईल. पण असें चरित्र लिहिण्यानें जतीनदांच्या पुण्यस्मृतीस खरी आदरांजलि होणार नाहीं. अलीकडील काळांत फॅसिस्ट राष्ट्रांनीं पादाक्रान्त केलेल्या देशांतून जें प्रतिकार-आंदोलन ( Resistance Movement ) झालें, त्याच्याशीं तुलना करितां, जतीनदांच्या जीवनांतील शेवटच्या शोकान्त घटना या कांहींच नव्हत ! आणि ही गोष्ट खुद्द जतीनदांनीं सर्वांच्या आधीं कबूल केली असती. जतीनदांच्या जीवनांतील ती 'बलसोर' जंगलांतील घटना – तिच्यावर एक उत्तम रोमांचकारी नाटक रचतां येईल यांत शंकाच नाहीं. एखाद्या श्रेष्ठ प्रतिभा-वंताच्या हातून तर, या नाट्यमय घटनेला एखाद्या भव्य-रमणीय महाकाव्याचें रूप येईल. पण जर अशी नाट्यकृति निर्मायची असेल तर तिची गुंफण जतीनदांचें मानव्य, त्यांचें शील, त्यांचें व्यक्तित्व यांच्या-भोंवतीं झाली पाहिजे; त्यांची नेमबाजी, शत्रूच्या हातावर तुरी देऊन निसटून जाण्याची त्यांची शिताफी, अगदीं थोडीं काडतुसें शिल्लक असतांना कितीतरी पटींनीं संख्याबलानें बलाढ्य असलेल्या शत्रूविरुद्ध तासन् तास टिकाव धरून राहण्याचें त्यांचें कौशल्य – या गोष्टींभोंवतींच नव्हे ! जतीनदांच्या गुप्त निवासस्थानाला वेढा घालणाऱ्या पोलिसदलाचा साम्राज्यशाही प्रमुख जतीनदांबद्दल आपली कौतुक-आदर-भावना






प्रकट करतांना म्हणाला होता : “ हातांत शस्त्र घेऊन शेवटपर्यंत लढून मरणारा हाच पहिला हिन्दी होय. ” ‘ हिन्दी ’ म्हणण्यांत पोलिसप्रमुखाचा ‘ क्रांतिकारक ’ असा आशय असावा; नाहींतर, जतीनदांचा हा मान भारतीयांच्या पौरुषाचा अपमान ठरला असता ! अस्तु. समजा, जतीनदांच्या जीवनावर जर नाटक रचायचें झालें तर त्या नाटकाचा पडदा ‘ एक पोलीस या पराक्रमी वीराच्या मरणोत्तरचा स्मृतिलेख अशा अनुचित शब्दांनीं लिहीत आहे ’ असा शेवटचा प्रवेश होऊन तरी पडूं नये !

महापुरुषांच्या तारामंडळांत सज्जनांना स्थान क्वचितच मिळतें. सज्जनपणा हीच खऱ्या मोठेपणाची कसोटी होय हें जोपर्यंत मान्य होत नाहीं तोपर्यंत हें असेंच चालूं रहाणार. शौर्य, धैर्य, लढाऊपणा, वीरत्व हे जे मध्ययुगीन गुण त्यांची जतीनदा मूर्तिमंत प्रतिमा समजली जाते. पण एवढेच ते होते असें समजण्याचें कारण नाहीं. ते कोणत्याच युगाचे नव्हते. त्यांचीं मूल्यें व गुण मानवी होते म्हणूनच ते स्थलकालातीत होते. ते दयाळु व सत्यनिष्ठ होते. त्यांच्या अंगीं अतुल शौर्य असून, तत्त्वदृष्ट्या तडजोड करणें त्यांच्या वृत्तींत नव्हतें. पण त्यांचें अतुल शौर्य-धैर्य हें क्रौर्यात कधींहि रूपान्तर पावलें नाहीं. तडजोड करणें त्यांच्या वृत्तींत नसलें तरी तिची मजल असहिष्णुतेपर्यंत गेली नव्हती. त्यांच्या वेळच्या पुरोगामी सुशिक्षित युवकांप्रमाणें, स्वामी विवेकानन्दांनीं उपदेशिलेला उन्नत पुरोगामी धर्म मानण्याकडे – बुद्धिवादाच्या कसोटीवर उतरणारा परमेश्वर आणि पुरोगामी अशीं सामाजिक आणि मानवी ध्येयें यांना पोषक – असा धर्म मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति होती. कर्मयोगावर त्यांची श्रद्धा असून ते स्वतः तो आचरण्याचा प्रयत्न करीत व आमच्या पुढेंहि कर्मयोग्याचें ध्येय ठेवीत. ‘ कर्मयोगा ’विषयीं एक उगीचच गूढवादी ( mystic ) ग्रह प्रचलित असतो; तो जर काढून टाकला तर ‘ कर्मयोगी ’ म्हणजे ‘ मानवतावादी ’च होय. मानवाला स्वकृतीनेंच आत्मसाक्षात्कार होऊं शकतो, अशी ज्याची श्रद्धा आहे, त्याची, तर्कशुद्ध पुढची पायरी म्हणून मानवाच्या सर्जनशीलतेवर, मानव आपल्या भाग्याचा स्वतःच विधाता आहे यावर श्रद्धा असलीच पाहिजे. मानवतावादाचें सार हेंच आहे. जतीनदा हे मानवतावादी, आधुनिक भारतांतील कदाचित् पहिलेच मानवतावादी होऊन गेले. ह्या गोष्टीची खूणगांठ बांधणें हीच त्यांच्या स्मृतीला अत्यंत उचित व अनुरूप अशी आदरांजलि होईल.

---

मानवेन्द्रनाथ रॉय

# जतीनदा आणि मानव्याचा प्रकर्ष

जुन्या सहकाऱ्यांबद्दलच्या निष्ठेला चिकटून रहावें कीं विवेकपूर्वक विचार करून ठरविलेलें नवीन ध्येय स्वीकारावें - अशा मानसिक द्वंद्वांत, एका बाजूला उत्कट भावना व दुसऱ्या बाजूला विवेक अशा कात्रींत मी सांपडलों होतों. माझ्या सबंध आतांपर्यंतच्या आयुष्यांत ज्या एकाच माणसाचें डोळे मिटून अगदीं निमूटपणें आज्ञाधारकत्व करावयाचें मी स्वीकारलें होतें, त्या माणसाची शेवटची आज्ञा मी कधींच विसरूं शकलों नाहीं. दुसऱ्यांदा हिंदुस्थान सोडून जाण्याच्या पूर्वी मीं जतीनदांबरोबर त्यांना त्यांच्या गुप्त निवासस्थानापर्यंत पोहोंचवायला गेलों होतों. याच त्यांच्या निवासस्थानीं पुढें ते लढत लढत मेले. त्यांचा निरोप घेत असतांना, त्या वेळच्या स्वप्नरंजनाच्या ध्येयसृष्टींत विहरणाऱ्या तरुणानें कांहींहि विचार न करतां भावनापूर्वक जेव्हां त्यांना म्हटलें कीं, “ जतीनदा, शस्त्रास्त्रांशिवाय मी कदापि परत येणार नाहीं ! ” तेव्हं

मानवेन्द्रनाथ रॉय यांनीं ‘ रॅडिकल ह्युमॅनिस्ट ’च्या १ मार्च १९५३ च्या अंकांत लिहिलेल्या लेखाचा प्रस्तुत लेख अनुवाद आहे.

वडिलधाऱ्या जतीनदांनीं त्या तरुणाला मोठ्या स्नेहानें आर्जवपूर्वक आवर्जून म्हटलें होतें: " शस्त्रास्त्रांसहित किंवा शस्त्रास्त्रांशिवायहि पण या , लवकर परत ये. " हें त्यांचें आर्जवपूर्वक सांगणें मी आज्ञा म्हणून शिरसावंद्य मानलें. कारण ते आमचे दादा असले तरी ते आमचे सेनापतीहि होते !

पुढें जतीनदा धीरोदात्तपणें लढत धारातीर्थी मृत्यु पावले. त्यांच्या मृत्यूमुळें मी त्यांची आज्ञा पाळण्याच्या नैतिक बंधनांतून मुक्त झालों. १९१५ च्या शरद्-ऋतूंत मी मनिलामधून जात होतों. त्याच वेळेला मला ही त्यांच्या मृत्यूची धक्का देणारी बातमी समजली. त्या वेळीं माझी मानसिक प्रतिक्रिया केवळ भावनात्मक होती. जतीनदांच्या मृत्यूचा सूड घेतला पाहिजे असें मला जोरानें वाटलें. त्यांच्या मृत्यूला एक वर्ष लोटलें होतें. या मधल्या काळांत, जतीनदांबद्दल माझ्या मनांत एवढी आदरभावना कां, याचा मी विचार करीत असतां, मी अशा निर्णयाप्रत आलों होतों कीं, मानवजातीमध्यें जें कांहीं उत्तमोत्तम आहे त्याची जतीनदा हे मूर्तिमंत प्रतिमा आहेत व म्हणूनच ते मला आवडतात. – कदाचित् जतीनदांना याची जाणीवहि नसेल ! – या माझ्या निर्णयांतून निघालेला माझा दुसरा उपनिर्णय किंवा उपसिद्धान्त असा कीं, जतीनदांच्या शोककारक मृत्यूचा मला बदला घ्यायचा असेल तर ज्या समाजव्यवस्थेंत मानवामधील उत्तमोत्तम गोष्टींचा आविष्कार होऊं शकेल अशी समाजव्यवस्थाच आपण प्रस्थापित केली पाहिजे. नवीन समाजरचनेचें ध्येय आपल्यापुढें ठेवून त्याकरितां अखंड प्रयत्न करीत रहाण्यानेंच तो बदला योग्य रीतीनें होऊं शकेल. हें नवीन ध्येय माझ्या भावनेलाच केवळ नव्हे तर माझ्या विवेकबुद्धीलाहि इतकें उत्कटतेनें पटलें कीं, माझें पूर्वीचें जुनें ध्येय मी स्वच्छ सदसद्विवेकबुद्धीनें टाकून देऊं शकलों. त्यामुळें जुन्या ध्येयाशीं आपण बइमान होत आहोंत अशी सदसद्विवेकबुद्धीची टोंचणी लागण्याचें कारणच उरलें नाहीं. या माझ्या विवेकशील निर्णयाच्या अभावीं, कदाचित् मी निराशा, वैफल्य आणि उद्वेग यांच्या आहारीं जाऊन धाडसी जीवनाला आणि त्याचबरोबर ध्येयवादालाहि कायमचा रामराम ठोकला असता !

---

## स्त्रीस्वातंत्र्य आणि लोकशाही

लोक म्हणजे लेंकरें व राज्यसत्ता म्हणजे मायबाप ( paternalism ) हें राजकीय ध्येय हिंदी जनतेपुढें असणें अशक्य आहे. जनतेची प्रगति व भरभराट घडवून आणायला जे कोणतेहि उपाय योजावयाचे असतील त्याकरितां पहिली महत्त्वाची अट ही आहे कीं, जनतेला लोकशाही स्वातंत्र्य पाहिजे. या मूलभूत लोकशाही स्वातंत्र्याच्या ध्येयाशीं जीं सांस्कृतिक, सामाजिक ध्येयें विसंगत असतील–मग तीं स्त्रियांच्या विषयींची असोत कीं कुटुंबविषयींची असोत–तीं त्याज्य ठरविलीं पाहिजेत. लोकशाही स्वातंत्र्य हा केवळ मताचा किंवा बरें कीं वाईट हें निवडण्याचाहि प्रश्न नाहीं. ऐतिहासिक दृष्ट्या तें आता अपरिहार्य होऊन बसलें आहे. हिंदुस्थानच्या लोकांना जर आपणच आपल्या भाग्याचे विधाते बनावयाचें असेल, तर जुन्या पारंपरिक कल्पना व ध्येयें मोडींत काढलीं पाहिजेत. स्त्रियांना स्वातंत्र्य व समता द्यायचें नाकारणें म्हणजेच त्यांना एवढा कमींत कमी तरी न्याय द्यायचें नाकारणें म्हणजे जनतेचा स्वातंत्र्याचा मार्गच बंद करून टाकणें होय.

आर्थिक स्वातंत्र्य हीच स्त्रियांची योग्य अशी मूलभूत गरज होय. जुनी समाजव्यवस्था कोलमडत असल्यामुळें समाजांत जो पेंचप्रसंग निर्माण झाला आहे, त्यांतून बाहेर पडण्याचा एकमेव मार्ग ती गरज भागविणें हाच होय. न्याय व सामाजिक कल्याण या दोन्हीहि दृष्टींनीं विचार केला तरी, स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य मिळणें हेंच अपरिहार्य ठरतें. आज आधुनिक स्त्री आर्थिक स्वातंत्र्य मागत आहे. ती तिची मागणी मान्य केल्यानेंच कुटुंबसंस्था एक उपयोगी सामाजिक संस्था म्हणून टिकून राहील व सामाजिक बेबंदशाही टळेल. आधुनिक स्त्रीला सामाजिक बेबंदशाही नको आहे. सामाजिक बेबंदशाही आधीच माजली असून ती विचारी त्यांत सांपडली आहे, त्यांतून ती बाहेर पडायचा प्रयत्न करीत आहे. अशा वेळीं प्राचीन सनातनी मनुप्रणीत स्त्रीध्येयांचा धोंडा तिच्या गळ्याभोंवतीं अडकवून तिला खोड्यांत घालूं नका !

—मानवेन्द्रनाथ रॉय, ' The Ideal of Indian Womanhood ' मधून








मानवेन्द्रनाथ रॉय : अनु०–श्री. वि. म. वेडेकर

# महात्माजींच्या पुण्यस्मृतीस --!

भारताचा ' राष्ट्रपिता ' व साधुपुरुष राष्ट्रवादी माथेफिरूपणाला बळी पडला त्याला आज बरोबर एक वर्ष होईल. पण आज अधिकारारूढ असलेले महात्माजींचे जे अनुयायी त्यांनीं त्या शोकजनक घटनेपासून कांहीं धडा घेतलेला दिसत नाहीं. ज्या राष्ट्रवादानें आपल्या प्रत्यक्ष प्रणेत्याचा माथेफिरूपणानें बळी घेतला, त्या माथेफिरू राष्ट्रवादाचाच ते अनुयायी प्रचार करीत आले आहेत. राष्ट्रवादाला एक चक्क धर्म बनविण्यांत आलें आहे ! एकीकडे राष्ट्रवादाच्या पार्थिव (mundane) देवतेची भाविकपणें पूजा बांधली जात आहे; दुसरीकडे ज्या राष्ट्रवादाच्या अध्वर्यूचें बलिदान झालें, त्यानें सांगितलेलीं नैतिक तत्त्वें पाळण्याच्या प्रतिज्ञेचा हि तितक्याच भाविकपणें पुनरुच्चार होत आहे. आज महात्माजींच्या हत्येनंतरच्या पहिल्या वर्षश्राद्धदिनीं या दोन्हीहि गोष्टी–राष्ट्रवादाची पूजा आणि महात्माजींच्या नैतिक तत्त्वांच्या पालनाची प्रतिज्ञा–या परस्परांशीं कितपत सुसंगत आहेत हा प्रश्न विचारणीय आहे.

भारत राष्ट्र स्थापन होऊन त्याची अमदानी सुरूं व्हायच्या ऐन वेळेलाच जें महाभयंकर कृष्णकृत्य घडून आलें, त्याबद्दल आज सर्वच भारतराष्ट्र दुःखप्रदर्शन करील. 'महात्माजींचा नैतिक आणि आध्यात्मिक संदेश प्रत्यक्ष अंमलांत आणण्याचें साधन म्हणून आम्ही राजकीय सत्तेचा वापर करीत आहोंत' असें ज्यांना वाटतें – व आज तसें जे निक्षून सांगतहि आहेत – त्यांनीं आज दुःखप्रदर्शन करतांना आत्मसंशोधन केलें पाहिजे. नाहींतर या दुःखप्रदर्शनाला केवळ औपचारिक समारंभापेक्षां अधिक महत्त्व रहाणार नाहीं.

ज्या ठिकाणांना कांहीं विशेष महत्त्व होतें अशा ठिकाणीं महात्माजींचीं स्मारकें झालींच आहेत. देशांत ठिकठिकाणीं त्यांचे पुष्कळ पुतळे उभारले गेले आहेत. राजकीय नेत्यांकडून महात्माजींच्या कितीतरी चित्रांचें अनावरण झालें आहे. एक मोठा प्रचंड स्मारकनिधीहि गोळा होत आहे. त्या निधीचा विनियोग कसा होणार याची अजून लोकांना माहिती देण्यांत आलेली नाहीं. काय सांगावें, कदाचित् आणखी कांहीं स्मारकें व पुतळे त्यांतून उभारलीं जातील ! अर्थात् या सर्व गोष्टींचा उपयोग महात्माजींची स्मृति जनतेच्या मनांत जागृत ठेवण्याकरितां होऊं शकेल. पण या रूपानेंच जर महात्माजींना आदरांजलि अर्पायची असेल तर ती निकृष्ट, भिकार स्वरूपाचीच म्हटली पाहिजे ! संतांच्या किंवा साधुपुरुषांच्या स्मृतीचा उपयोग प्राकृत (mundane) गोष्टींकरितां करून घेणें हा प्रघात मानवी इतिहास सुरूं होण्यापासूनच्या वेळचा इतका जुना आहे. साधुपुरुषाची लोकांना विस्मृति होऊं नये म्हणून त्याच्या स्मारकांनीं आणि पुतळ्यांनीं देशांतला सर्व भूभाग चितारून ठेवणें याचाच अर्थ असा कीं त्या साधुपुरुषानें जो अमर संदेश दिला त्या संदेशाच्या अमरत्वाविषयीं लोकांना श्रद्धा व खात्री नसावी !

महात्माजींची स्मृति जर अजरामर व्हावयाची असेल तर सत्य व अहिंसा यांच्या योगानें राजकारण शुद्ध करण्याचा त्यांनीं जो उपदेश केला तो प्रत्यक्ष आचरणांत आणल्यानेंच ती स्मृति अजरामर होईल. जुन्या दगडांचीं स्मारकें पुढें नष्ट होऊन जातील. परंतु सत्य व अहिंसेच्या उदात्त संदेशाचा प्रकाश मात्र यावच्चंद्र दिवाकरौ तळपत राहील. मानवजातीच्या आतांपर्यंत होऊन गेलेल्या आध्यात्मिक नेत्यांनीं युगानुयुगें ह्याच मूल्यांची जतन–जोपासना केली आहे. ' महात्माजींच्या संदेशाचा प्रसार करावयाचा मान आपणांकडे चालत आला आहे ' असें राष्ट्रवादी भारत आज मानीत आहे. पण तो वरील मूल्यांची व संदेशाची चाड व बूज कशी बाळगतो हेंच पहावयाचें आहे.

गांधींवादामधील सत्याची कल्पना इतकी बहुजिनसी–

'Independent India' मध्यें ३० जानेवारी १९४९ ला लिहिलेल्या लेखाचा प्रस्तुत लेख अनुवाद आहे.



अनुक्रमणिका






बहुरंगी व संमिश्र आहे कीं त्या सत्याच्या प्रत्यक्ष प्रयोगांच मूल्यमापन अनुभव, तर्कशास्त्र वा तत्त्वज्ञान यांच्या कसोट्या लावून करणें अशक्य आहे. म्हणून महात्माजींचे चेले त्यांचच सत्याचे प्रयोग पुढें कितपत चालवीत आहेत ह्याचें निश्चितपणें मूल्यमापन करतां येत नाहीं. अहिंसेच्या बाबतींत मात्र अहिंसा प्रत्यक्ष आचरणांत किती आली आहे, याचें मापन करणें शक्य आहे. अहिंसा तर गांधीवादाचें एक मूलभूत तत्त्व होय. महात्माजींनीं अहिंसेला अत्यंत महत्त्व दिलें असून मूल्यांच्या आपल्या क्रमवारींत तिला उच्चतम स्थान अर्पिलें आहे.

एका साधुपुरुषाच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रवादी भारतानें रक्तपातरहित क्रान्ति करून दाखविली व भारतराष्ट्राला स्वातंत्र्य अहिंसक साधनांच्या द्वारें मिळालें, असें म्हटलें जातें. या विधानाबाबत मतभेद होण्यास पुष्कळच वाव आहे. तरी पण, आजच्यासारख्या स्मृतिदिनीं, राष्ट्राच्या आपल्या जनकावरील निष्ठेचें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न करीत असतांना, तो मतभेदाचा मुद्दा अप्रस्तुत समजला पाहिजे.

भारतांतून परकीय सत्ता अस्तंगत होत असतांना, तिच्याकरितां रक्तपात झाला नाहीं ही वस्तुस्थिति आहे. राष्ट्रवादी भारत अशा रक्तपातरहित क्रान्तीचा अनुभव घेत आहे हें गृहीत धरलें तरी, त्या क्रान्तीला नुसती कोठें सुरुवात झाली आहे. क्रान्ति अजून स्थिर आणि सुसंघटित व्हावयाचीच आहे. नवीन अस्तित्वांत आलेली राष्ट्रवादी राज्यसत्ता (State) ती क्रान्ति सुसंघटित करण्याच्या क्रियेचें साधन बनली पाहिजे. तरच तिच्यांत अर्थ आहे. अहिंसक क्रान्ति याचा अर्थच असा कीं, त्या क्रान्तीमधून निर्माण झालेली राज्यसत्ता सर्व प्रकारच्या हिंसासाधनांचा वापर करणें त्याज्य मानील. म्हणूनच महात्माजी पुनः पुनः बजावून सांगत असत कीं, "स्वतंत्र भारताला स्वसंरक्षणाकरितां शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज अशा फौजांची गरजच लागणार नाहीं; अहिंसक साधनांनीं मिळविलेलें राष्ट्रीय स्वातंत्र्य अहिंसक साधनांनींच रक्षिलें जाईल." अहिंसा हें गांधीवादांतील परमोच्च सत्य असल्यामुळें, राज्यसत्ता ही निःशस्त्र बनणें हा एक राष्ट्रीय प्रमाणावर चालू करावयाचा सत्याचा प्रयोगच होऊं शकेल. परंतु खेदाची गोष्ट ही कीं आपल्या मान्यवर कुलमहर्षी-(patron-saint) नें दाखविलेल्या मार्गापासून, त्याचा शोकजनक अंत होऊन एक वर्षहि पुरें झालें नाहीं तोंच भारत फार दूर ढळला आहे! त्या शांतीच्या महान् उद्गात्याचे शिष्य आज त्याच्या श्राद्धदिनीं त्यानें उपदेशिलेल्या तत्त्वावरील निष्ठेची पुन्हां प्रतिज्ञा करून, "हीं तत्त्वें प्रत्यक्षांत आणण्याकरितांच आम्ही राजकीय सत्तेचा उपयोग करीत आहोंत" असें घोषणापूर्वक सांगत आहेत खरें. पण या असंख्य शिष्यांपैकीं किती जणांना आपल्या मार्गच्युतीबद्दल सदसद्विवेकबुद्धीची टोंचणी लागून खंत वाटत असेल बरें? असे फारच थोडे! आणि हीच वस्तुस्थिति एक वर्षापूर्वी घडून आलेल्या शोककारी घटनेपेक्षांहि महाभयंकर आहे!

महात्माजींचा 'राष्ट्रपिता' म्हणून जे जयजयकार करीत असतात, तेच आज मोठ्या तावातावानें राष्ट्राला शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज रहावयास आवाहन करीत आहेत. आपल्या राष्ट्राला एका बड्या राष्ट्राचा दर्जा प्राप्त व्हावा ही त्यांची महत्त्वाकांक्षा आहे; शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज, (imposing) दरारा उत्पन्न करणारें सैन्य जवळ असलें, तरच राष्ट्राला तो अभिमानाचा बडा दर्जा प्राप्त करून घ्यायची पात्रता येत असते! शांतीच्या महान् उद्गात्याचे अनुयायी आपल्या राष्ट्राला ती पात्रता प्राप्त करून द्यायला नुसते उत्सुकच आहेत असें नव्हे, तर सबंध राष्ट्राच्या राष्ट्रच शस्त्रास्त्रयुक्त करावयाचें त्यांनीं योजिलें आहे. लष्करी युद्धखोर मनोवृत्ति असणें हेंच पौरुषाचें लक्षण समजलें जात आहे. लष्करी थाटांत कवायत करीत जाणें आणि बंदुक वापरावयास शिकणें हेंच आज मुलामुलींच्या शिक्षणाचा एक भाग होऊन बसलें आहे

अशा राष्ट्राचा पिता म्हणून महात्माजींचा जयजयकार करण्यानें त्यांच्याविषयींचा आदरभाव शंकास्पद ठरतो. उलट, 'हें असलें वाढणें अपत्य माझें नव्हे' असेंच महात्माजी सांगतील अशी भावना ठेवणें हीच त्यांना उचित अशी श्रद्धांजलि होय. आजच्या स्मृतिदिनीं हीच आपली भावना आपण मोकळेपणानें प्रकट केली पाहिजे.

हुतात्म्या महात्म्याची स्मृति पाळावयाची ज्यांना तळमळ आहे, त्यांनीं राष्ट्रवादी भारताला—विशेषतः राष्ट्रवादी भारताच्या पुढाऱ्यांना हें ओळखायला लावलें

पाहिजे कीं, स्वतःविषयींची अतिरेकी गौरवभावना ( Megalomania ) ही एक विकृति असून तें खरोखरीं सत्ताधिकारामागें लागलेल्या विकृत हव्यासाचें रोगट लक्षण आहे. याच वासनातिरेकामुळें जगांत हल्लींची बजबजपुरी माजली आहे. शिवाय त्यांनीं असेंहि उद्घोषून सांगितलें पाहिजे कीं निःशस्त्र विकेन्द्रित राज्यसत्ता अस्तित्वांत आणणें हें अगदीं व्यवहार्य असून, अशा अभिनव राजकीय प्रयोगाच्या दिशेनेंच जर भारतानें पुढें पाऊलें टाकलीं तरच आजच्या सुसंस्कृत जगाला सध्या त्यावर कोसळूं पहाणाऱ्या अरिष्टांतून सहीसलामत पार पाडतां येईल.

महात्माजींच्या मनश्चक्षूला अशा प्रकारच्या प्रयोगाची आवश्यकता अस्पष्ट का होइना दिसत होती. म्हणून तो प्रयोग यशस्वी करण्याच्या प्रयत्नाला हातभार लावण्यानेंच भारतांत महात्माजींचें खरें अजरामर स्मारक उभारलें जाऊं शकेल. तें सन्माननीय कार्य करायचें तर भारतीय नेत्यांनीं, दुसऱ्याला उपदेश करण्यापेक्षां स्वतः कृति करून दुसऱ्याला उदाहरण घालून देणें हें उत्तम, हा जो सर्वमान्य सिद्धान्त त्याप्रमाणें वागलें पाहिजे. राष्ट्रपित्याच्या इच्छेप्रमाणेंच त्यांनीं त्यांच्या या 'बालका'चें संगोपन, संवर्धन केलें पाहिजे. तरच ते इतर जगाला उदाहरण घालून देतील. यापेक्षां महात्माजींचें अधिक भव्य स्मारक कोणतं असूं शकेल ?

---

# राजकीय क्रान्ति ही सामाजिक क्रान्तीची नान्दी

राजकीय क्रान्ति ही सामाजिक पुनरुज्जीवनाची नांदी किंवा पूर्वतयारी म्हणूनच घडून येते. इतिहासाचा हा अनुभवसिद्ध नियम असून हिंदुस्थानला आणि इतर जगालाहि तो बंधनकारक आहे. म्हणून राष्ट्रीय चळवळ ही जर राजकीय दृष्ट्या क्रान्तिकारक व्हायची असेल तर त्या राष्ट्रीय चळवळीचा सामाजिक हेतु, नाशाच्या पंथास लागलेल्या जुन्या सामाजिक संस्थांची अडगळ कमी करून त्यांऐवजीं नवीन सामाजिक संस्थांची उभारणी करण्याकरितां भूमिका तयार करणें, हा असला पाहिजे. उलट पक्षीं, राष्ट्रीय चळवळीनें देशाच्या राज्यसत्तेमध्येंहि क्रान्तिकारक बदल घडवून आणला पाहिजे. सामाजिक नवजीवन घडवून आणावयाचें तर त्याकरितां मालमत्ता व तिचें स्वामित्व यांच्या संबंधांत अनुकूल तो बदल घडून आला पाहिजे. हा बदल घडवून आणायला कायद्यांतहि बदल झाला पाहिजे. असा कायद्यांतील बदल राज्यसत्तेंमधील क्रान्तिकारक बदलामुळेंच शक्य होईल.

राष्ट्रीय चळवळ ही जनतेच्या दृष्टीनें राजकीय दृष्ट्या क्रान्तिकारकच असते. राष्ट्रवाद म्हणजे सामाजिक प्रगति घडवून आणण्याच्या वस्तुनिष्ठ प्रेरणेचा, अजाणता झालेला आविष्कार होय. प्रगति याचा अर्थ पुढें जाणें, पूर्वीच्याच जागीं परत येणें नव्हे, हें स्पष्ट आहे. आपल्या राष्ट्रवादी चळवळीवर ज्या विचारसरणीचा पगडा आहे, ती विचारसरणी सामाजिक प्रगतीला विरोध करणारी आहे. वास्तविक पहातां, राष्ट्रवादी चळवळीला खरें क्रान्तिकारकत्व तिच्यांतील सामाजिक प्रगतीच्या प्रेरणेमुळेंच येत असतें. त्या सामाजिक प्रगतीलाच भारतीय राष्ट्रवादी चळवळींच्या नेत्यांचा विरोध असल्यामुळ, जुन्या मृत भूतकाळांतील परंपरा-रूढींवरील श्रद्धांनीं जखडून गेलेली भारतांतील राष्ट्रवादी चळवळ राजकीय स्वातंत्र्याच्या ध्येयाच्या दिशेनें कधींच पुढें जाणार नाहीं. उलट वस्तुस्थिति अशी आहे कीं, राजकीय स्वातंत्र्याच्या ध्येयाला जी सामाजिक दृष्ट्या प्रतिगामी कलाटणी मिळाली आहे, तिच्यामुळें राजकीय स्वातंत्र्याचें ध्येय हें केवळ चळवळ्या पुढाऱ्यांनीं आपल्या भाषणांतून मारण्याची एक थाप बनली आहे !

— मानवेन्द्रनाथ रॉय, 'Some Random Reflections' मधून

मानवेंद्रनाथ रॉय : अनु०— श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी,

# नवमानवतावादाचीं बावीस सूत्रें

[ लोकशाहीच्या मुळाशीं असलेलें तत्त्वज्ञान पुढील मसुद्यांत सूत्ररूपानें सांगितलें आहे. रशियांतील समाजवादी किंवा कम्युनिस्ट राज्यसंस्थेचा प्रयोग आणि मार्क्सवादी कम्युनिस्ट पार्टीचीं गेल्या शंभर वर्षांतील जागतिक आंदोलनें यांचा ऐतिहासिक निष्कर्ष ध्यानांत घेऊन या विचारसूत्रांची निष्पत्ति झाली आहे. श्री. मानवेंद्रनाथ रॉय यांनीं या विचारसूत्रांची मांडणी इ. स. १९४७ मध्यें केली. त्यांनीं मार्क्सवादाची समीक्षा करून त्यांतील दुर्बलस्थानें व हेत्वाभास विचारांत घेतले आहेत. मार्क्सवादाच्या मूळ प्रमेयांशीं विसंगत अशी मानवी स्वातंत्र्यास धोका उत्पन्न करणारी विकृति कम्युनिझम्‌मध्यें उत्पन्न झाली आहे. ती टाळण्याकरितां मार्क्सच्या विचारमार्गानें मार्क्स-च्या पुढें गेलें पाहिजे, ही गोष्ट रॉय सूचित करीत आहेत. कम्युनिझमप्रमाणेंच पाश्चात्त्य समाजांतील प्रतिनिधि-प्रधान लोकसत्ताक राज्यसंस्थेंतहि अवनतीचीं बीजें वाढीस लागून हुकुमशाही प्रवृत्ती बळावल्या आणि समाजाच्या सांस्कृतिक प्रलयास कारणीभूत झगडे निर्माण झाले. त्यामुळें मानवी समाज दुर्धर व अनुल्लंघनीय अशा संकटांच्या चक्रांत सांपडला आहे. त्याचीहि मीमांसा करून प्रतिनिधिप्रधान लोकसत्तेचा दोष कसा निरसावा याचेंहि मार्ग-दर्शन रॉय यांनीं या विचारसूत्रांत केलें आहे. गेल्या पंचवीस वर्षांत, विशेषतः दुसऱ्या महायुद्धाच्या वातावरणांत जे नवविचारांचे प्रवाह राजकीय तत्त्ववेत्त्यांत निर्माण झाले आहेत, त्यांचाहि पूर्ण पडसाद या **नवमानवतावादांत** उमटला आहे. किंबहुना, त्यांचाच हा निर्भयपणें व मोकळ्या वृत्तीनें काढलेला निष्कर्ष आहे. कर्मयोगशास्त्राचें चिरंतन तत्त्वहि यांत समाविष्ट केलेलें आहे. — **अनुवादक** ].

## १

मानव हाच समाजसंस्थेचा मूळ आदर्श आहे. सामाजिक सहकार्याचे संबंध, व्यक्तींच्या प्रसुप्त शक्तींचा विकास करतात. परंतु, व्यक्तिविकास हाच समाजप्रगतीचा खरा मापक होय. ‘ समुदाय, समुदाय ’ असें म्हणावयाचें तर त्याच्या आधीं व्यक्ती असल्या पाहिजेत. सामाजिक विमोचन व प्रगति हीं साधतांना जर स्वातंत्र्य आणि स्वास्थ्य यांचा प्रत्यक्ष अनुभव व्यक्तिव्यक्तीला मिळत नसेल तर विमोचन व प्रगति हीं आभासमयच राहतात. तीं कधींच साध्य व्हावयाचीं नाहींत. ज्याला स्वास्थ्य म्हणतात तें जर खरें खरें असेल तर तें व्यक्ती-ला भोगतां आलें पाहिजे. मानवसमाजाच्या ( राष्ट्र, वर्ग अशा ) कोणत्याहि संघटनेला सामुदायिक आत्मा असतो हें म्हणणें अयोग्य आहे. कारण या तत्त्वाच्या पोटीं व्यक्तींच्या बलिदानाचें तत्त्वच गर्भित आहे. व्यक्तींच्या हितानेंच सामुदायिक हिताची साधना होत असते.

## २

स्वातंत्र्याची अन्वेषणा आणि सत्याचा शोध यांनीं मानवी प्रगतीची जी मूलभूत प्रेरणा ती घड-विली आहे. स्वातंत्र्याची अन्वेषणा ही काय आहे ? तर बुद्धि व भावना आणि जगावें म्हणून शरीरपिंडाची चाल-लेली झटापट यांचें उच्चतर परिणतीस पावलेलें तें रूप होय. आणि सत्याचा शोध हें काय आहे ? तर यांतूनच निघणारें तें एक आवश्यक प्रमेय आहे. निसर्गाचें ज्ञान ज्या मानानें वाढतें त्या मानानें मनुष्य निसर्गाच्या जुलमांतून आणि भौतिक व सामाजिक बंधनांतून क्रमाक्रमानें मुक्त होत जातो. सत्य म्हणजे ज्ञानाचा गाभा होय.

## ३

सतत वाढत्या प्रमाणांत स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावें हाच व्यक्तिगत किंवा सामुदायिक अशा तर्कशुद्ध मानवी प्रयत्नांचा हेतु असतो. व्यक्तींच्या ठायीं वसत असणाऱ्या शक्तींच्या विकासावरील बंधनांचा सतत



अनुक्रमणिका








वाढत जाणारा निरास म्हणजेच स्वातंत्र्य होय. व्यक्ती म्हणजे मानवप्राणी होते हें ओळखलें पाहिजें. ते कांहीं सामाजिक संस्थेच्या महायंत्रांतील खिळे किंवा टोकळे नव्हेत. म्हणूनच व्यक्तीचें समाजांतील स्थान हें, कोणत्याहि प्रकारच्या सामाजिक संस्थेच्या आणि सामुदायिक प्रयत्नांच्यामधील प्रगतीचें व स्वातंत्र्य-प्रवणतेचें उद्दिष्ट मोजण्याचें साधन होय. समाजघटकांच्या प्रत्यक्ष हितावरून कोणत्याहि सामुदायिक प्रयत्नाचें यश मोजलें पाहिजे.

४

मनुष्य स्वभावतःच बुद्धिप्रधान आहे. कारण नियमबद्ध निसर्गाच्या कुशींतूनच तो अवतरला आहे. बुद्धि हाहि पिंडधर्मच असल्यामुळें माणसाची इच्छाशक्ति बुद्धीशीं मुळीच विरोधी नाहीं. बुद्धि आणि भावना यांचा उद्गम जीवाच्या एकाच समान अवस्थेंतून झाला आहे, असें जीवशास्त्रदृष्ट्या म्हणतां येतें. म्हणून ऐतिहासिक नियतिवादाचा इच्छास्वातंत्र्याच्या सिद्धांताशीं विरोध नाहीं; तो त्याच्यांतच अंतर्भूत होऊं शकतो. एवढेंच नव्हे, तर मानवी इच्छाशक्ति हा इतिहासाचा एक अत्यंत प्रभावी आणि निर्णायक भाग आहे. तसें नसतें तर नियमबद्ध अशा इतिहासक्रमांत मनुष्यनिर्मित क्रांत्यांना स्थानच राहणार नाहीं. इतिहासाचा क्रम परमेश्वरी संकेतानेंच पूर्वनिश्चित झालेला असतो या धार्मिक सिद्धांताशीं बुद्धिवादी व शास्त्रशुद्ध अशा नियतिवादाची गल्लत करतां कामां नये.

५

इतिहासाची आर्थिक उपपत्ति भौतिकवादा-( Materialism ) च्या चुकीच्या अर्थावर आधारलेली आहे. भौतिकवाद हें अद्वैती तत्त्वज्ञान आहे आणि वरील उपपत्तींत तर द्वैतवाद सूचित होतो. *

इतिहासाचा क्रम कार्यकारणांच्या नियमांनीं बद्ध आहे. परंतु तो अनेकविध कारणांनीं घडत असतो. या कारणांमध्यें मानवी इच्छाशक्ति हा एक महत्त्वाचा भाग आहे. आणि आर्थिक हेतूंशीं तिचा साक्षात् संबंध नेहमींच जोडतां येत नाहीं.

६

कल्पनांची निर्मिति ही देहाची क्रिया होय; ती परिस्थितीच्या जाणिवेमुळें घडत असते. परंतु एकदां कल्पना अथवा विचार निर्माण झाले म्हणजे ते पृथक्पणें राहतात; आणि त्यांचा व्यापार त्यांच्या स्वतंत्र नियमांनींच चालतो. विचारांचा विकासक्रम सामाजिक विकासक्रमाबरोबर पावलें टाकतो आणि त्यांचा परस्परांवर प्रभाव पडत असतो. परंतु ऐतिहासिक घटना आणि विचारांचें आंदोलन यांचा प्रत्यक्ष कार्यकारणभाव, मानवांच्या सकल विकासक्रमाच्या कोणत्याहि एका विशिष्ट बिंदूच्या ठिकाणीं घडत असल्याचें निश्चित करतां येत नाहीं [ विचार या शब्दाचा अर्थ तत्त्वज्ञानदृष्ट्या महत्त्व असलेला ध्येयवाद किंवा विचारसरणी असा येथें गृहीत धरला आहे. ] आर्थिक व्यवस्थेच्या प्रस्थापित सांगाड्यावर उभारलेला वैचारिक डोलारा म्हणजेच संस्कृतीचे बनाव आणि नैतिक मूल्यें होत हें खरें नव्हें. संस्कृति व नैतिक मूल्यें यांनाहि विशिष्ट ऐतिहासिक नियम आहेत, आणि त्यांचा इतिहास विचारेतिहासाच्या तर्कशास्त्रानें बद्ध असतो.

७

स्वातंत्र्याचें नवें जग निर्माण करण्यासाठीं क्रांतीनें समाजाच्या आर्थिक पुनर्घटनेच्या पलीकडे गेलें पाहिजे. दलित आणि पिळलेल्या वर्गाच्या नांवानें राजकीय सत्ता हस्तगत करून उत्पादनांच्या साधनांची खाजगी मालकी नष्ट केली म्हणजे स्वातंत्र्ययुगाचें आगमन आपोआपच होतें असें नाहीं.

८

कम्युनिझम् किंवा समाजवाद हें स्वातंत्र्यध्येयाच्या सिद्धीचें साधन होऊं शकतें अशी कल्पना करतां येते. परंतु त्यामुळें तें कितपत साध्य होतें ही गोष्ट मात्र अखेरीस अनुभवानेंच पडताळून पाहिली पाहिजे.

* मार्क्सवाद हा भौतिकवादी आहे. परंतु तो आर्थिक उपपत्तीला वरिष्ठत्व देतो, ही विसंगति आहे. कारण भौतिकवादाप्रमाणें मन व बुद्धीसुद्धां भौतिकच होत. इतिहासाच्या क्रमांत त्यांची परिणामकारकता मानलीच पाहिजे. केवळ आर्थिक परिस्थितीच परिणामकारक मानल्यास मन वा बुद्धि भौतिक शक्तीपेक्षां भिन्न आहे असें मानल्यासारखें होतें. म्हणजे भौतिक शक्ति व आत्मशक्ति असे दोन भाग किंवा तत्त्वें मानावीं लागतात, व त्यामुळें भौतिकवादाचें खंडनच होतें आणि द्वैत मानावें लागतें. मार्क्सचा भौतिकवाद अद्वैती असल्यामुळें त्याच्या विचारसरणींतील इतिहासशास्त्रावर हा दोष येतो. — अनुवादक.








राष्ट्र किंवा वर्ग या नांवाचा एखादा सामुदायिक स्वरूपाचा ‘ अहंकार ’ श्रेष्ठ आहे असें मानून हाडा-मांसाच्या प्रत्यक्ष मानव-प्राण्याला जर डावलून टाकलें तर, जी राजकीय पद्धति आणि जो आर्थिक प्रयोग केल्यानें हें साधतें त्या पद्धतीनें किंवा प्रयोगानें स्वातंत्र्य-सिद्धीचें सोयीस्कर साधन उपलब्ध झालें असें होत नाहीं. कारण एक तर स्वातंत्र्याचा नाश स्वातंत्र्याकडे नेतो असें म्हणणें हें असमंजस आहे. आणि दुसरें असें कीं केवळ काल्पनिक अशा सामुदायिक ‘ अहं-कार ’–देवतेच्या स्थंडिलावर व्यक्तीचा बळी देणें म्हणजे स्वातंत्र्य खास नव्हे ! स्वातंत्र्याचें ध्येय ही एक पोकळ तात्त्विक कल्पना आहे असें म्हणून त्या ध्येयास अमान्य करणारें आणि व्यक्तीचें सार्वभौमत्व त्याज्य ठरविणारें जें कोणचें सामाजिक तत्त्वज्ञान असेल किंवा अशी जी कोणची सामाजिक पुनर्घटनेची योजना असेल, त्याच्या किंवा तिच्या अंगीं प्रगतीचें किंवा क्रांतीचें बल अत्यंत अल्पच रहाणार; याहून तिला जास्त किंमत नाहीं.

## ९

राज्यसंस्था म्हणजे समाजाची राजकीय संघटना होय. कम्युनिझम्‌मध्यें ही राज्यसंस्था क्रमाक्रमानें आपोआप विरून जाते, हें आदर्श-स्वप्न अनुभवान्तीं मिथ्या ठरलें आहे. सामाजिक मालकीच्या उद्योग-धंद्यांवर अधिष्ठित अशा आर्थिक नियोजनांना जबरदस्त राजकीय यंत्राची आवश्यकता असते. परंतु या यंत्रावर लोकसत्तेचेंच नियंत्रण असलें तरच या नव्या समाज-व्यवस्थेंत स्वातंत्र्याची निश्चिति राहील. लोकसत्ता आणि वैयक्तिक स्वातंत्र्य यांच्याच पायावर आर्थिक नियोजन उभें करतां आलें तरच जनतेच्या गरजा भागविण्यासाठींच उत्पादन हा हेतु सिद्धीस जाऊं शकेल.

## १०

धंद्यांचें राष्ट्रीयीकरण व आर्थिक नियोजन यांच्या-मुळें कामगारांची पिळवणूक आपोआप थांबेल किंवा त्यामुळें संपत्तीची समविभागणी खात्रीनें होते असें नाहीं. जर आर्थिक लोकशाही आली नाहीं तर ज्याप्रमाणें राजकीय लोकशाही प्रस्थापित व्हावयाची नाहीं, त्या-प्रमाणेंच जर राजकीय लोकशाही आली नाहीं तर आर्थिक लोकशाहीहि प्रस्थापित व्हावयाची नाहीं.

## ११

एकदां हुकुमशाही प्रस्थापित झाली म्हणजे ती कायमच राहूं पहाते. कामाचा उरक, सामुदायिक प्रयत्न आणि सामाजिक प्रगति यांच्या सबबीवर राजकीय हुकुमशाहीच्या छत्राखालीं चालणारें आर्थिक नियो-जन हें व्यक्तिस्वातंत्र्याची अवहेलना करतें. त्याचा परिणाम असा होतो कीं, समाजवादी समाजांत उच्च प्रकारची लोकशाही प्रस्थापित होते, अशी जी हल्लीं कल्पना आहे ती अशक्य ठरते. हुकुमशाही ही स्वतः-च्या घोषित ध्येयांना हरताळ फासत असते.

## १२

पार्लमेंटरी डिमॉक्रसीचीं म्ह० प्रतिनिधि–प्रधान लोकशाहीचीं वैगुण्यें देखील अनुभवांतीं उघड झालीं आहेत. सत्ता प्रतिनिधींच्याकडे सोंपविल्यामुळें हीं वैगुण्यें उद्‌भवतात. लोकसत्ता खरी खरी प्रभावी करा-वयाची तर, सत्ता ही नेहमीं निरपवादपणें जनतेच्या हातींच स्थिरावली पाहिजे; व सार्वभौम सत्ता जनतेलाच, अधूनमधून नव्हे तर सतत व दैनंदिन, प्रभावीपणें वापरतां यावी यासाठीं उपाययोजना झाली पाहिजे. कणाकणाप्रमाणें एकमेकांपासून विलग असलेल्या नाग-रिक व्यक्ती बहुधा नेहमींच फलतः असमर्थ बनून राहिलेल्या असतात. आपलें सार्वभौमत्व अंमलांत आणण्याचें व राज्ययंत्रावर सतत ताबा चालविण्याचें आवश्यक असें कोणतेंहि साधन त्यांच्यापाशीं नसतें.

## १३

प्रतिनिधिप्रधान लोकशाहींत उदारमतवादाला नकलीपणा येतो, त्याचें विडंबन होत असतें. माणसांनीं माणसांची जी पिळवणूक चालविली आहे तिला कायदेशीरपणा आणण्याचें काम खुल्या व्यापाराच्या तत्त्वानें उदारमतवाद करीत आला आहे. तो वाद तिच्यावर शिक्कामोर्तब करतो. अर्थ हा मानवाचा एक-मेव पुरुषार्थ आहे ही कल्पना, व्यक्तिवादाच्या विमोचक तत्त्वाला निष्प्राण करते. अर्थप्रधान मनुष्य एकतर गुलाम तरी असतो किंवा गुलामांचा धनी तरी असतो. “ अर्थ हा एकच पुरुषार्थ ” ही ग्राम्य कल्पना बुडविली पाहिजे, आणि तिच्याजागीं मनुष्य हा स्वभावतःच बुद्धिप्रधान आहे ही प्रत्ययास येणारी कल्पना रूढ केली पाहिजे. मनुष्य हा बुद्धिप्रधान असतो म्हणून तर नीतिविचारी असतो. नीति म्हणजे विवेकबुद्धीला आवाहन होय.

आणि विवेकबुद्धि म्हणजे परिस्थितीची साहजिक जाणीव आणि परिस्थितीला अनुसरून होणारी प्रतिक्रिया होय. बुद्धीच्या पातळीवर घडणारी जीवपिंडाची यांत्रिक क्रिया म्हणजे विवेकबुद्धि होय. आणि म्हणूनच विवेकबुद्धि बुद्धिनिष्ठ असते.

## १४

प्रतिनिधिप्रधान लोकशाहीचा पर्याय [alternative] हुकूमशाही मात्र खास नव्हे. आधुनिक समाजपद्धतींतील तुटक अतएव दुर्बल अशा व्यक्तींच्या प्रतिनिधिप्रधान लोकशाहीच्या स्थानीं संघटित लोकशाही स्थापणें हाच त्याचा पर्याय होय. देशभर स्थापिलेल्या जनसमित्यांचें जाळें विणून सुसंघटित लोकसत्ता अस्तित्वांत आणली पाहिजे व या लोकसत्तेच्या पायावर पिरॅमिडच्या धर्तीवर निमुळता होत जाणारा मनोरा उभारून त्या सुस्थिर मनोऱ्याचें शिखर या दृष्टीनें संसद् अस्तित्वांत आली पाहिजे. अशा रचनेनें समाजाची राजकीय संघटना (राज्य) सर्व समाजाशीं एकरूप होईल आणि याचाच परिणाम म्हणजे राज्यावर लोकसत्तेचें निरंतर नियंत्रण राहील.

## १५

मानव हाच स्वतःच्या विश्वाचा शिल्पकार आहे या मूलभूत ऐतिहासिक सत्यावर भर देणें हें क्रांतिकारक व विमोचक सामाजिक तत्त्वज्ञानाचें मुख्य कार्य आहे. मानव हा विचारशील प्राणी आहे व ही विचारशीलता, तो व्यक्तित्वसंपन्न राहिला, तरच दिसून येईल. मेंदू हें उत्पादनाचें साधन असून तें अत्यंत क्रांतिकारक माल निर्माण करतें. क्रांत्या होण्याकरितां त्यांना रूढ कल्पनांचा विध्वंस करणाऱ्या विचारांची पूर्वतयारी लागते. ज्यांना आपल्या सर्जनशील आत्मशक्तीचा प्रत्यय आलेला आहे, विश्वाची नवरचना करण्याच्या दुर्दम्य इच्छाशक्तीनें जे प्रेरित झाले आहेत, साहसी विचारांनीं जे गतिमान् झाले आहेत आणि स्वतंत्र मानवांचा बनलेला स्वतंत्र समाज निर्माण करण्याच्या ध्येयाच्या ध्यासानें जे चेतले आहेत असे संख्येनें सतत वाढत जाणारे लोकच, लोकशाही नांदेल, अशी परिस्थिति निर्माण करूं शकतात.

## १६

सामाजिक प्रगतीचें मूलभूत तत्त्व पुनः निश्चितपणें मांडून त्याच्या पायावरच सामाजिक क्रांतीची पद्धति व कार्यक्रम यांची उभारणी केली पाहिजे. खंबीर आणि व्यापक प्रयत्न करून लोकांना स्वातंत्र्याचीं तत्त्वें आणि बुद्धिवादी सहकार्यप्रधान राहाणी यांचें शिक्षण देणें हाच सामाजिक नवजीवन निर्माण करण्याचा मार्ग आहे. क्रांतीनंतर जी व्यवस्था निर्माण करावयाची तिचा सामाजिक व राजकीय पाया घालण्यासाठीं जनतेच्या कार्यक्षम अशा लोकशाही संघटना तयार कराव्या लागतील. नवजीवनाचें रहस्य आत्मसात् केलेल्या लोकांच्या संख्येंत त्वरेनें वाढ करणें आणि जनतासमित्यांचा जलद प्रसार करणें, तसेंच या दोहोंत सजीव एकसूत्रीपणा निर्माण करणें या गोष्टींची सामाजिक क्रांतीला आवश्यकता आहे. त्याचप्रमाणें स्वातंत्र्य, बुद्धिवाद आणि सामाजिक संवादित्व या तत्त्वांवर क्रांतीच्या कार्यक्रमाची उभारणी झाली पाहिजे. सामाजिक जीवनाच्या नियंत्रणांत सर्व प्रकारची मक्तेदारी व पक्षपाती हितसंबंध यांचें निर्मूलन करणें हा या कार्यक्रमाचा अर्थ आहे.

## १७

मनुष्यानें मनुष्याची पिळवणूक करणें अशक्य करण्यासाठीं समाजाची आर्थिक पुनर्घटना करणें हें मूलगामी लोकसत्तेंत अर्थात् गृहीत धरावेंच लागतें. समाजांतील घटक व्यक्तींच्या बौद्धिक व इतर सूक्ष्म शक्तींचा आविष्कार होण्याकरितां अगोदर त्यांच्या भौतिक गरजांची चढत्या प्रमाणांत तृप्ति करणें ही आवश्यक गोष्ट आहे. राहणीचें मान सतत वाढत राहील, याची हमी घेणारी आर्थिक पुनर्घटना हा मूलगामी लोकसत्तेचा पाया आहे. आर्थिक बंधनांतून जनतेची मुक्तता करणें हें तिला स्वातंत्र्याच्या ध्येयाप्रत नेण्याचें आवश्यक साधन आहे.

## १८

उत्पादन हें उपयोगासाठींच करावयाचें आणि त्याची वांटणी मानवी गरजा भागविण्याच्या दृष्टीनें करावयाची या तत्त्वांवर नव्या समाजरचनेचें अर्थशास्त्र उभारलें पाहिजे. या समाजरचनेच्या राजकीय संघटनेंत प्रतिनिधींच्या हातीं सत्ता सुपूर्द करण्यांत येणार नाहीं; कारण तसें केल्यानें व्यवहारांत लोकांच्या हातीं प्रभावी सत्ता








अजिबात रहात नाहीं. जनता-समित्यांच्या द्वारां वयांत आलेले सर्व लोक राजकारभारांत प्रत्यक्ष भाग घेऊं शकतील, अशा पद्धतीवरच ती राज्यघटना आधारली पाहिजे. ज्ञानाचा सार्वत्रिक प्रसार आणि कमींत कमी नियंत्रणें ठेवून वैज्ञानिक सर्जनशील प्रवृत्तींना व प्रयत्नांना अधिकाधिक वाव व प्रेरणा देणें, या गोष्टींवर नव्या समाजरचनेची संस्कृति उभारली जाईल. बुद्धि व विज्ञान यांवर हा नवा समाज आधारलेला असल्यामुळें त्यांत नियोजन हें अपरिहार्यपणें येतेंच. परंतु व्यक्तीचें स्वातंत्र्य हा मुख्य उद्देश ठेवूनच हें नियोजन केलें जाईल. हा नवसमाज राजकीय, आर्थिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या लोकसत्ताप्रधान राहील आणि म्हणूनच स्वतःचें संरक्षण करण्यास पूर्णपणें समर्थ अशीच लोकसत्ता तो निर्माण करील.

## १९

बुद्धीवरील बंधनें तोडून टाकून आत्मिक दृष्ट्या स्वतंत्र झालेलीं माणसें स्वातंत्र्याचें जग निर्माण करण्याच्या दृढ निश्चयानें एका राजकीय पक्षांत जेव्हां एकत्रित होतील, तेव्हांच त्यांच्या सामुदायिक प्रयत्नांनीं मूलगामी लोकसत्तेचें ध्येय साध्य होईल. या पक्षाचे सभासद भावी काळांतील राज्यकर्ते म्हणून नव्हे तर जनतेचे मार्गदर्शक, मित्र व तत्त्वज्ञ या नात्यानेंच कार्य करतील. या पक्षाचें राजकीय वर्तन व कार्य बुद्धिप्रधान आणि म्हणूनच नैतिकहि राहील; कारण, त्याखेरीज तें स्वातंत्र्याच्या ध्येयाशीं सुसंगत राहणार नाहीं. ज्या प्रमाणांत जनतेची स्वातंत्र्याकांक्षा वाढीस लागेल, त्या प्रमाणांतच या पक्षाची वाढ होईल. आणि सुजाण लोकमत व लोकांचा ज्ञानयुक्त प्रयत्न यांच्या साहाय्यानें हा पक्ष सत्तारूढ होईल. सत्तेचें केंद्रीकरण आणि स्वातंत्र्य यांच्यांत परस्पर विसंगति आहे, याची जाणीव असल्यामुळें सर्वत्र विकेंद्रीकरण करणें हा या पक्षाचा उद्देश राहील. पक्षाला सत्ता-संपादनांत यश मिळणें हा या मार्गातील एक टप्पा होय आणि नियमानुसार हातीं आलेल्या सत्तेचा उपयोग, ती सत्ता आणखी सर्वत्र पसरून टाकण्यासाठीं हा पक्ष करील. अखिल समाज व राज्य हीं दोन्हीं एकरूप होईपर्यंत पक्षाचें हें कार्य चालू राहील.

## २०

मौलिक पृथक्करण करून पाहिलें तर असें दिसून येईल कीं व्यक्तिस्वातंत्र्यावर आक्रमण न करतां सर्वांची प्रगति व भरभराट करणारी सामाजिक रचना ही नागरिकाला शिक्षण देण्यावरच अवलंबून असते. लोकसत्ताक राज्य हें नागरिकत्वाच्या आणि राजकारणाच्या शिक्षणाचें नागरिकांचें विद्यालयच होईल. अनासक्त अशा व्यक्तींना समाजकार्याची धुरा वाहण्यास समर्थ करील अशीच त्याची रचना व कार्यपद्धति असेल. अशा अनासक्त व्यक्तींच्या हातीं असलेलें राज्ययंत्र हें एका विशिष्ट वर्गाच्या हातीं सांपडलेलें इतरांवर जुलुम करण्याचें साधन म्हणून राहणार नाहीं. ज्यांच्या आत्म्यावरील बंधनें छिन्न झालीं आहेत, तीं सत्तारूढ माणसेंच गुलामगिरीच्या शृंखला उच्छिन्न करून सर्वांना स्वातंत्र्याचा लाभ करून देऊं शकतील.

## २१

हा 'रॅडिकॅलिझम्' म्हणजे मौलिकतावाद विज्ञानास समाजसंघटनेचें अंग बनवितो, व्यक्ति आणि समाज यांतील विसंगति नष्ट करतो आणि स्वातंत्र्याच्या कल्पनेंत नैतिक, बुद्धिवादी आणि समाजपरायणतेचा आशय भरतो; विचारांची गतिमीमांसा ( Dynamics of Ideas ) आणि आर्थिक नियतिवादाचा विरोधविकास ( The Dialectics of Economic Determinism ) यांचा योग्य परामर्श ज्यांत घेतलेला आहे अशा प्रकारचें सामाजिक तत्त्वज्ञान 'रॅडिकॅलिझम्'–मौलिकतावाद पुढें ठेवतो. याच तत्त्वज्ञानांतून वर्तमानकालांतच घडावयाच्या समाजक्रांतीची पद्धति आणि कार्यक्रम यांची निष्पत्ति होते.

## २२

'मानव हाच हरएक गोष्टींचा मानदंड आहे' ( प्रोटॅगोरस ) किंवा 'मानव हाच मनुष्य जातीचा उगम आहे' ( मार्क्स ) या सिद्धांतापासून 'रॅडिकॅलिझम'ला – मौलिकतावादाला प्रारंभ होतो, आणि आध्यात्मिक दृष्ट्या विमुक्त आणि नीतिशील मानवांच्या सामुदायिक प्रयत्नांनीं जगाची " स्वतंत्र मानवांचें एकराज्य व बंधुसमूह " या स्वरूपांत पुनर्घटना झाली पाहिजे, असें तो वाद प्रतिपादन करतो.



अनुक्रमणिका








मानवेंद्रनाथ राय

# मानवतावादी राजकारण

लोकशाहीपेक्षां अधिक चांगली राज्यपद्धति आजपर्यंतच्या राज्यपद्धतींत माणसास सांपडलेली नाहीं. समाजाच्या राजकीय संघटनेचे जे कांहीं प्रकार आहेत त्यांत तत्त्वतः सर्वोत्तम असलेला प्रकार हाच होय. म्हणून लोकशाहीची कल्पना पुनः स्थिरावली पाहिजे हीच वर्तमान जगाची वरिष्ठ गरज आहे. खरीखुरी लोकशाही वस्तुतः शक्य आहे काय अशा प्रकारचें आव्हान समाजाच्या कारागिरांना व राज्यशास्त्रज्ञांना अस्वस्थ करीत आहे. परंतु, उलट याच वेळीं हुकुमशाहीच्या पुरस्कर्त्यांना लोकशाहीच्या कल्पनेस मान्यता देणें भाग पडत आहे. आधुनिक समाजविषयक अनुभवाच्या, सांस्कृतिक प्रगतीच्या व राजकीय विचाराच्या परंपरेवर जी सार्वत्रिक व चिवट निष्ठा आहे, ती यास कारण आहे. स्वसामर्थ्याची धुंदी चढलेले हिट्लर-मुसोलिनीसारखे थोडे गर्विष्ठ लोकच राज्यविषयक तत्त्वज्ञानाच्या या मूलभूत कल्पनेस धुडकविण्याचें धाष्टर्य करितात. बाकीच्या लोकशाहीच्या टीकाकारांनीं ज्या कांहीं दुरुस्त्या सुचविल्या आहेत त्या एकाच सबबीवर. लोकशाही व्यवस्थेमध्यें कार्यक्षमतेचा अभाव राहूं नये ही ती सबब होय. कामगार-हुकूमशाहीसहि लोकशाहीच्या ऐवजीं पाठिंबा बराच मिळत आहे; परंतु हा पाठिंबासुद्धां कां मिळतो? तर अस्सल लोकशाहीचें कामगार-हुकुमशाही हें साधन आहे, असें सांगितलें जातें म्हणून. आर्थिक समतेच्या पायावर राजकीय स्वातंत्र्याची उभारणी अस्सल लोकशाही करते; ही कामगार-हुकूमशाहीच्या बळावर उभी करावयाची-असा या समर्थनाचा अर्थ आहे. तात्पर्य, लोकशाही नाकारावयाची नाहीं, हें स्पष्ट आहे. आतां हुकुमशाहींतून लोकशाही पुनः निर्माण होऊं शकेल काय, असा प्रश्न आहेच; परंतु तो अलाहिदा आहे. एवंच मुद्दा असा कीं, लोकशाहीचे टीकाकार देखील लोकशाहीस मान्यता देतात. समाजाची सर्वोत्तम व व्यवहार्य संघटना म्हणजे लोकशाही—या कल्पनेस साधारण मान्यता आहेच; फुकट गेलेल्या ध्येयाकरितां झगडा म्हणजे लोकशाहीचा झगडा असें म्हणतां येणार नाहीं. ती यशस्वी होण्याकरितां कणखर, मूलगामी, प्रामाणिक आणि आत्मविश्वासपूर्ण यत्नाची गरज आहे.

राज्य आणि व्यक्ति यांचा संबंध काय आहे, हा जुना प्रश्न नव्या पद्धतीनें सोडवून लोकशाही दृढमूल केली पाहिजे. हा प्रश्न पुढें ठेवून आणखी एक पायरी मागें जाऊन संशोधन केलें पाहिजे; म्हणजे असें कीं, माणूस आणि समाज यांचा मूलतःच संबंध कशाप्रकारचा आहे याचें संशोधन केलें पाहिजे. मानवी समाजाची राजकीय संघटना म्हणजे राज्य होय. म्हणून असें म्हणावें लागतें कीं, समाजाचा आणि माणसाचा संबंधच राज्य व माणूस यांचा संबंध होय. सुसंस्कृत समाजासंबंधी ज्या ऐहिक उपपत्ती आहेत त्यांच्यामध्यें मनुष्याचा संबंध हा मुख्य होय हें मान्य केलें आहे. माणसांनीं प्रथम आपसांत जें सहकार्य केलें त्यांतून समाजसंस्था उद्भवली. हें सहकार्य माणसांनीं रानटी अवस्थेंतील जीवनाचा झगडा यशस्वी चालविण्याकरितां निर्माण केलें असा शोध मानवजातिशास्त्रानें केला आहे. एवंच समाज ही

नेहरूंच्या 'अभिनंदनग्रंथां'तील रॉय यांच्या Humanist Politics (१५ मार्च १९४९) या लेखावरून, आणि रॉय यांच्या 'Pratice of New Humanism' (२९ डिसेंबर १९४९) या पुस्तिकेवरून महत्त्वाचे अंश एकत्र करून हा लेख तयार केला आहे.

मनुष्यनिर्मित संस्था आहे, असेंच सिद्ध होतें. प्रत्यक्ष-सिद्ध वस्तुस्थितीवरून मनुष्यव्यक्ति व राज्य यांचा काय संबंध आहे, हें तर्कतः निश्चित करतां येतें. राज्य ही मनुष्याची कृति आहे; कारण राज्य म्हणजे समाजाचीच राजकीय संघटना होय. म्हणून व्यक्ति ही राज्यापेक्षां कमी लेखतां कामा नये. तसें केल्यास निर्माता हा स्वतःच्या कृतीचा दास होय असा विपर्यास केल्याची आपत्ति येते !

लोकशाही तत्त्वज्ञानानें माणसाला आत्मोन्नतीबद्दल जीं आश्वासनें दिलीं आहेत तीं कृतींत अजूनपर्यंत आलीं नाहींत याचें कारण, 'लोकशाही राज्य हें माणसां-करितां आहे, माणूस हा त्या राज्याचा घटक आहे' याची अंमलबजावणीच्या वेळीं विस्मृति होते. राजकीय तत्त्वज्ञानाच्या मूलभूत प्रश्नाची सोडवणूक जीवनविषयक मानवतावादी दृष्टिकोणानेंच होऊं शकेल. लोकशाहीची कल्पना दृढमूल व्हावयास आणि ती आचरणांत उतरविण्यास याशिवाय दुसरा उपाय असूं शकत नाहीं.

मानवीसमतेचें ध्येय ही एक पोकळ श्रद्धा आहे, तिचा उपयोग केवळ कायद्यापुरता, न्यायासनासमोरील समता एवढाच आहे, असें समजण्याची गरज नाहीं. जीवशास्त्राप्रमाणें सर्व माणसांना प्रत्येक बाबतींत समान सामर्थ्याची देणगी लाभली आहे, असें सिद्ध झालें आहे. म्हणून समतेची वाढत्या प्रमाणांत अंमलबजावणी करणें अत्यंत शक्य आहे. समाजसंस्थेचें हेंच मुख्य कार्य आहे कीं, माणसांच्या सुप्त सामर्थ्यांचा सतत बंधनरहित आवि-ष्कार होण्यास मदत पोंचवायची. व्यक्तिस्वातंत्र्याला कसलेंहि बंधन पडणार नाहीं, अशी काळजी घेऊन समान हिताची साधना करण्याकरितां सार्वजनिक संबंधांचें नियंत्रण करणें हेंच राज्याचें मुख्य कार्य होय असा सिद्धान्त तर्कतः वरील समाजविषयक प्रमेयां-तून निघतो. लोकशाहीचा कायदा सामाजिक सह-कार्याची व्यवस्था राखण्याकरितां निर्माण होत असतो. या सामाजिक सहकार्यानें व्यक्तींच्या सुप्त सामर्थ्यांचा आविष्कार करावयाचा असतो. म्हणून व्यक्तिस्वातंत्र्य हें सामाजिक संघटनेच्या विरुद्ध असूंच शकत नाहीं. व्यक्तिव्यक्तींना स्वातंत्र्याची साधना करतां यावी, म्हणून स्वेच्छाप्रेरित, समंजसपणाचें व हेतुपुरःसर घडून येणारें सहकार्य हाच लोकशाही समाज-संस्थेचा पाया होय. मानवतावाद ही त्याची संघटना करणारी मानसिक शक्ति होय.

लोकशाहीचें यश लोकशिक्षणावरच अवलंबून असतें. राज्य व शिक्षण यांचा हा अभेद्य संबंध हजारों वर्षांपूर्वी प्लेटोच्या ध्यानांत आला. येथें शिक्षण याचा एक विशिष्ट अर्थ आहे. आत्मस्वातंत्र्य व आत्मसामर्थ्य यांचा वाढता प्रत्यय समाजघटक व्यक्तींना मिळत राहील अशी समाजघटक व्यक्तींची बौद्धिक आणि सांस्कृतिक उन्नति होणें, हा या शिक्षणा-चा अर्थ आहे. आधुनिक विज्ञानाची अशी घोषणा आहे कीं, बुद्धि आणि सर्जनशीलता हें माणसाचें मूलभूत वैशिष्ट्य आहे. म्हणून माणसांना असें शिक्षण देण्याची गरज आहे. मानवी समतेचें ध्येय त्याशिवाय प्रत्यक्ष वस्तुस्थितींत उतरवितां येणार नाहीं.

लोकशाही राज्याकरितां माणसाचीहि वाढ नव्या प्रकारानें व्हावयास पाहिजे. माणसाच्या ठिकाणीं सार्वभौम सत्ता आहे, तो समाजाचा निर्माता आहे, हें प्रत्यक्ष अनुभवांत येण्याकरितां समाज व राज्य यांची निराळीच संघटना करणें जरूर आहे. सत्तास्पर्धेत गुंतलेल्या कांहीं व्यक्तींना व कांहीं पक्षांना केवळ मत-दान करून स्वस्थ बसणाऱ्या मतदारांचा गण म्हणजे लोकशाही नव्हे ! ज्या स्त्रीपुरुषांना स्वतःच्या ठिकाणीं असलेल्या सार्वभौम सत्तेचा प्रत्यय येत आहे आणि ती सत्ता स्वतःच वापरण्याची ज्यांच्या ठिकाणीं लायकी आहे, अशा स्त्रीपुरुषांचा समाज म्हणजे लोकशाही समाज होय. धंदेवाईक राजकारणी लोकांचा वर्ग किंवा मतदानपद्धतीच्या जोरावर राजकीय सत्तेची ठेकेदारी करणारा कायदेमंडळां-










तील प्रतिनिधींचा गट हेच जेथें राज्य चालवितात तो खराखुरा लोकशाही समाज नव्हे. वर्तमान परिस्थितींतली संसदेवर म्हणजे कायदेमंडळावर आधारलेली लोकशाही ही विस्कळित अशा परावलंबी वृत्तीच्या मतदारांनीं निर्मिलेली आहे. तिच्या ऐवजीं वर्तमानकालीन प्रचंड व गुंतागुतीच्या सामाजिक व्यवस्थेंतहि प्रत्यक्ष लोकशाही निर्मिली पाहिजे. वरिष्ठ विधिमंडळाच्या अधीन असलेल्या या अप्रत्यक्ष लोकशाहींत सत्तेचें केंद्रीकरण होतें व जनतेची वास्तविक सत्ता नष्ट होते. स्वतःच्या व्यक्तिस्वातंत्र्याचें सतत संरक्षण करणाऱ्या व निरपवाद समता भोगणाऱ्या स्वतंत्र माणसांचें सहकारी राज्य(Co-operative Commonwealth) हेंच लोकशाही राज्य होय. ज्यांत मनुष्य हाच अंतिम मूल्य आहे, हें मूलभूत तत्त्व सिद्ध होतें असें मानवतावादी तत्त्वज्ञान स्वीकारल्याशिवाय माणसांची अशा सहकारी राज्याच्या निर्मितीकडे निखालस प्रवृत्ति होणार नाहीं. अन्यथा, वैचारिक गोंधळ माजून लोकशाही राज्यासंबंधीं असलेली निष्ठा विचलित होण्याचा धोका कायम राहील. वर्ग किंवा राष्ट्र या कल्पनेच्या आश्रयानें किंवा गूढ धार्मिक कल्पनेच्या आश्रयानें सुरुवात होणारें तत्त्वज्ञान लोकशाहीनिष्ठेला विचलित करण्याचें कार्य करील. जें तत्त्वज्ञान मनुष्याला प्राथम्य व प्राधान्य देतें, तेंच लोकशाही निर्माण करतें.

सध्यां जें ठराविक ्राचें राजकारण सुरू आहे त्या सर्वांतला पुरोगामीपणा संपला आहे. ज्या एका परिस्थितीला गृहीत धरून या राजकारणाची विचारसरणी व आचारसरणी ठरली ती परिस्थितीच बदलली आहे. ती परिस्थिति म्हणजे भांडवलशाही होय. भांडवलशाही समाजव्यवस्था कायम राहाणारी आहे असें तिचे पुरस्कर्तेहि मानीत नाहींत. तिला नैतिक पाठिंबा देणारे कोठेंच उरले नाहींत. भांडवलशाही डबघाईस आल्यामुळें निर्माण झालेली नवी परिस्थिति सामाजिक अस्वास्थ्याच्या युगांत शिरली आहे. या अस्वास्थ्याच्या जाणिवेचा विपरीत परिणाम जनतेच्या मनावर झाला आहे. वर्गविग्रहाच्या किंवा राष्ट्रवादाच्या नांवानें आवाहन देणारी हुकूमशाही जनमनाची पकड घेत आहे. आपलें विचारस्वातंत्र्य आणि व्यक्तिस्वातंत्र्य गमावून समुदायवादामध्यें स्वतःला बुडवून घेण्यास जनता तयार होत आहे. भांडवलशाहीची अवनति झाल्यामुळें भांडवलदारांकडून पुढारीपण हिसकावून घेणारे राजकीय पक्षांचे नेते पुढें आले आहेत. त्यामुळें सत्तास्पर्धेचें राजकारण वरचढ होऊन बसत आहे. या राजकारणाला तिसरें एक कारण मदत करूं लागलें आहे. भांडवलशाही स्पर्धेचा अंत झाल्यामुळें, खुल्या व्यापाराच्या तत्त्वाच्या ठिकाणीं राष्ट्रीय आर्थिक नियोजनानें आपली बैठक बांधली आहे. हें आर्थिक नियोजन राज्यसंस्थेची शक्ति व परिघ वाढवीत आहे. जे राज्याचें नियंत्रण करतात तेच केंद्रीभूत सत्ता बळकावून बसतात. सत्तास्पर्धेच्या राजकारणाची किंमत प्रचंड हुकूमशाहीच्या स्थापनेनें पदरांत पडते.

भांडवलशाहीचें युग संपलें असून सत्तास्पर्धेच्या राजकारणाचें युग अवतरलें आहे असें जर म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति नाहीं. हुकूमशाही शक्तींच्या मधील आपसांतील स्पर्धेनें राजकारणी विश्व दोन विरुद्ध टोकांमध्यें विभागलें गेलें आहे. भांडवलशाहीचे पुरस्कर्ते गट आणि भांडवलशाहीशीं विरोधी असलेले गट अशीं हीं दोन टोकें नव्हेत. सत्तेची तृषा लागलेले हे दोन निराळेच गट आहेत. ते डाव्या गटांत मोडतात कीं उजव्या गटांत मोडतात या मुद्द्यांत कांहींच तथ्य राहिलें नाहीं. ते डावे असोत अथवा उजवे असोत, कोणीहि असले तरी पर्यवसान एकच. कोणाचाहि विजय झाला तरी लोकशाही, मानवी हित आणि स्वातंत्र्य यांना सारखाच धोका पोंचतो. म्हणून तात्पर्य असें कीं, भांडवलशाही-विरुद्ध-समाजवाद हा आतां खरा वादाचा मुद्दाच



अनुक्रमणिका








राहिला नाहीं. सत्तास्पर्धेच्या राजकारणांतून उत्पन्न होणारी हुकुमशाही कीं खरीखुरी लोकशाही हाच विचाराचा खरा मुद्दा आहे. या परिस्थितींत ठराविक ठशाच्या राजकारणांतून बाहेर पडलें पाहिजे. लोकशाही राजकारणाचा विचार निराळ्याच प्रकारानें केला पाहिजे.

समाजवादी कार्यक्रम घेऊन पुढें येणारे व लोकशाहीचा अंगीकार करणारे डावे पक्ष प्रस्तुत उत्पन्न झालेल्या संकटांतून उत्तीर्ण होण्याचा मार्ग दाखवूं शकत नाहींत. उत्पादन, वांटणी व विनिमय यांच्या साधनांचें राष्ट्रीयीकरण करण्याचा कार्यक्रम लोकशाही अस्तित्वांत आणत नाहीं. याचें तात्पर्य असें निघतें कीं, सद्यःस्थितींत उजव्या पक्षांच्या कार्यक्रमापेक्षां निखालस निराळा कार्यक्रम डाव्यांच्यापाशींहि नाहीं. कारण खाजगी भांडवलशाही व खुल्या व्यापाराचें अर्थशास्त्र असमर्थनीय आहे असें उजव्या पक्षांनाहि मान्य झालें असल्यामुळें राष्ट्रीय नियोजन तेहि स्वीकारूं लागले आहेत. राज्यांनीं उत्पादन, वांटणी व विनिमय नियंत्रित करण्याची कल्पना त्यांनाहि मान्य झाली आहे. डावे किंवा उजवे, सत्तेचें केंद्रीकरण कसें टाळतां येईल, यासंबंधीं कार्यक्रम निखालसपणें देऊं शकत नाहीत. याचें कारण राज्यसंस्थेचें नियंत्रण त्या दोघांनाहि मान्य आहे. दोघेहि विधिमंडळाच्या लोकशाहीशीं म्हणजे अल्पसंख्याकांच्या सत्तेशीं लग्न लावून बसले आहेत. म्हणून ' जनतेची सार्वभौम सत्ता' हा केवळ वाङ्मयाचा अलंकार म्हणूनच वापरण्याची मुभा त्यांनीं घेतली आहे! जोंपर्यंत राज्यसत्ता प्रत्यक्षपणें लोक वापरणार नाहींत, तोंपर्यंत राज्यसंस्थेनें चालविलेल्या आर्थिक नियोजनांत मानवी स्वातंत्र्याचा अभावच राहणार. अशा स्थितींत समाजवाद म्हणजे राज्यसंस्थेची भांडवलशाही होय, असेंच जनतेच्या अनुभवास येणार.

डाव्या व उजव्या पक्षांच्या कार्यक्रमांमध्यें जें अर्थपूर्ण साम्य आहे, त्यापेक्षां त्यांच्या राजकीय वर्तनांतील साम्य अधिक अर्थपूर्ण आहे. सत्ताप्राप्तीच्या झगड्यांत सांपडून ते अशीं साधनें वापरूं लागतात कीं तीं साधनें लोकशाही ध्येयाच्या नेमकी विरुद्ध असतात. लोकप्रियता मिळविण्याच्या प्रयत्नांत लोकांच्या मूर्खपणाच्या भावनांना ते गोंजारूं लागतात. लोकांच्या सांस्कृतिक व राजकीय मागासलेपणाचें लक्षण असलेल्या हुकूमशाही परंपरेचे स्तुतिपाठक बनून ते तिला दृढ करतात. हुकूमशाही भावनांना दृढ करण्याचें कार्य करीत असतां डावे गट उजव्यांच्या मागें नसतात. वस्तुतः स्वावलंबी विचार व विवेकाला महत्त्व देणारी, व्यक्तित्वाचा महिमा जाणणारी जनता लोकशाहीचा आधार होय, हेंहि ते विसरतात. व्यक्तित्वाचा बळी घेणाऱ्या वर्ग व राष्ट्र या दोन्ही समुदायनिष्ठ भावनांना ते सारखेंच आवाहन देऊं लागतात. कार्यक्रम व राजकीय आचरण या बाबतींत पक्षापक्षांचा भेद लुप्तसा होऊन जातो! शुद्ध सत्तास्पर्धेचें राजकारण हेंच रूप सर्व पक्ष धारण करतात. पुरोगामितेचें सामर्थ्य संपुष्टांत येतें. लोकशाहीचीं सांस्कृतिक मूल्यें विनाश पावतात. प्रलयाकडे नेऊं पाहणाऱ्या लष्करी संग्रामाच्या कडेवर जग यांनींच आणून सोडलें आहे! यांनींच देशोदेशींच्या हुकुमशाही शक्तींच्या वाढीला कळत न कळत मदत केली आहे.

सत्तेच्या विकेन्द्रीकरणाचें ध्येय धरून स्थापन केलेला पक्ष देखील सत्तेच्या साधनेंत गुंतला तर साधनशुचितेचा विवेक विसरतो. अंधश्रद्धा आणि वीरपूजा हीं हुकूमशाहीचीं साधनें तोहि वापरूं लागतो. कोणत्याहि ध्येयाचा पक्ष असो, त्यानें एकदां सत्ता काबीज केली कीं तो विकेंद्रीकरणाच्या कल्पनेला दुरूनच रामराम ठोकणार! लोकांच्या मध्यें राज्य चालविण्याबद्दल आत्मविश्वास उत्पन्न करण्याच्या ऐवजीं पक्षनिष्ठेचा बडेजाव या ना त्या कारणास्तव त्यांना










करावाच लागतो. लोकांच्या ठिकाणची असहायतेची भावना नष्ट करण्याचा विचार त्यांना आवडेनासा होतो. महापुरुषपूजा, गूढ अध्यात्मवाद, ऐतिहासिक नियतिवाद यांच्या योगानें ती असहायतेची भावना अधिक गंभीर बनून जनता पक्षांच्या सत्तास्पर्धेच्या खेळाचें क्षेत्र बनते.

जनतेंतील असहायतेच्या भावनेस कारण होणारी अंधश्रद्धा नष्ट करणें व बुद्धिवादी विचारसरणी निर्माण करणें हें लोकशाहीतील लोकशिक्षणाचें कार्य आहे. सत्तास्पर्धेच्या राजकारणांतून बाहेर पडून व पक्षविषयक आसक्तीचीं बंधनें तोडून टाकून लोकांना स्वत:च्या आचरणानें स्वावलंबन शिकविणारा नागरिकच लोकशिक्षण देण्यास पात्र होऊं शकतो. मानवतावादी चळवळींतील एक महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे बुद्धिवादाची शिकवणूक जनतेस देणें, हा होय. मनुष्याचा स्वसामर्थ्यावरील विश्वास ज्या ज्या तत्त्वज्ञानांनीं ढासळतो, तीं तीं तत्त्वज्ञानें बुद्धिवादास नाकारीत असतात. हिंदुस्थानसारख्या देशांत बुद्धिवादाच्या विरोधी असलेलीं तत्त्वज्ञानें जनमनावर अंमल गाजवीत आहेत. बुद्धीच्या व अनुभवाच्या पलीकडे असलेल्या पारलौकिक कल्पनांच्या समर्थनाकरितां गूढ अनुभववाद म्हणून नांवाजलेली विचारसरणी पुरस्कारिली जाते. माणसाच्या असहायतेचेंच एक प्रकारचें समर्थन त्यांत असतें. खराखुरा आत्मनिष्ठ मानव अस्तित्वांत येण्यास हें तत्त्वज्ञान प्रतिबंध करतें. असा मानव अस्तित्वांत येण्याकरितां वैचारिक नवजीवनाचा कार्यक्रम हातीं घेण्याची जरूर आहे.

असहायतेच्या भावनेंतून बाहेर पडण्याकरितां जनतेला स्वत:चे जीवनविषयक प्रश्न स्वत:च कसे सोडवावेत, याचें प्रत्यक्ष मार्गदर्शन करणें जरूर आहे. जनतेनें आपले राजकीय, सामाजिक आणि आर्थिक प्रश्न स्वत:च सोडविण्यास प्रारंभ करावा. त्यांतूनच त्यांना स्वातंत्र्य, बुद्धिवाद व ऐहिक नीतिशास्त्र यांची प्रेरणा मिळेल. जीवन म्हणजे शिक्षण असा लोकजीवनाचा अर्थ त्यामुळेंच उत्पन्न होईल.

एका बाजूस नफेबाजीचें अर्थशास्त्र आणि दुसऱ्या बाजूस केंद्रीकरणास महत्त्व देणारें अर्थशास्त्र या पेचांतून बाहेर पडण्याकरितां सहकारितेचें अर्थशास्त्र आधारभूत धरून नवसमाजाची बांधणी केली पाहिजे. व्यक्तिस्वातंत्र्य व व्यक्तिहित हीं सामाजिक हिताशीं विरुद्ध नाहींत, ही गोष्ट सहकारी अर्थशास्त्रांतच प्रत्ययास येते. व्यापक प्रमाणांतले उद्योगधंदेदेखील सहकारितेच्या तत्त्वावर चालवितां येतात. आधुनिक विज्ञान आणि तंत्र यांचाहि योग्य प्रमाणांत वापर सहकारी तत्त्वाशीं विसंगत नसतो. नफेबाज व सरकार या दोघांचे हात शिरल्यामुळें होणारे दुष्परिणाम टाळतां येऊन पिळवणुकीचें सामाजिक पाप या अर्थशास्त्रानें नष्ट होतें.

व्यक्तींचे स्वेच्छाप्रेरित यत्न आणि सहकार्य यांच्या वातावरणांतच जनतेच्या राजकीय संघटना मुळापासून तयार करणें जरूर आहे. लोकशाही राज्याचे प्राथमिक घटक म्हणून जनसमित्यांची निर्मिति करणें जरूर आहे. लोकांना प्राथमिक समित्या नीट चालवितां येऊं लागल्या, लोकशाही दृष्टिकोण त्यांना लाभला, म्हणजे सरकारसंस्थेचें नियंत्रण करण्याची पात्रता त्यांना प्राप्त होईल. जनसमित्यांचें देशव्यापी जाळें खेड्यांतून व नगरांतून निर्माण झालें म्हणजे पक्षोपपक्षांचा सत्तास्पर्धेचा खेळ संपुष्टांत येऊं लागेल. पक्षांच्या प्रतिनिधींपेक्षां जनसमित्यांत लोकहिताचें कार्य करीत असतां कार्यक्षम झालेले जनतेचे वास्तविक प्रतिनिधीच जेव्हां जनसमित्यांच्या वतीनें निवडणुकींकरितां उभे राहूं लागतील, तेव्हांच मूलगामी लोकशाहीचा काल क्षितिजावर उदयाला येईल व मानवी स्वातंत्र्याचें खरेखुरें युग अवतरूं शकेल.

---








मानवेंद्रनाथ रॉय

# भारतीय नवजीवनाची चळवळ

**भारतीय नवजीवनाची चळवळ** ( Renaissance Movement ) किंवा भारतीय **नवजीवनाची** कल्पनाच म्हणाना, मला फार दिवसांपासून प्रिय झाली आहे. राजकीय चळवळींपेक्षां हिचें क्षेत्र पुष्कळच व्यापक असतें. माझ्या आयुष्यांतला बराच भाग प्राधान्यानें राजकीय चळवळींशीं निगडित झाला आहे; म्हणून नवजीवनाच्या ठोकळ गोष्टींकडे जरी माझें लक्ष तीव्रतेनें वेधलें गेलें, तरी त्या बाबतींत भरीव कामगिरी करावयाला मला फारसा वेळ मिळाला नाहीं.

आपल्या राजकारणांत विचारांपेक्षां भावनांना प्राधान्य अधिक असतें, या गोष्टीचा मी वारंवार उल्लेख केलेला आहे. भावना मानवी स्वभावाचा अंशच असल्यामुळें मानवी कृतीच्या कोणत्याहि विभागांतून ती बहुधा संपूर्णपणें वगळतां येणें शक्य नाहीं, हें जरी खरें असलें तरी ही दुसरी गोष्टहि तितकीच खरी आहे कीं, मनुष्याला जेव्हां मूलगामी प्रश्न सोडवायचे असतात तेव्हां बुद्धि व चिकित्सा यांनाच प्रथम महत्त्व द्यावें लागतें, भावनेस बाजूला सारावें लागतें. एकदां विचार निश्चित करण्याकरितां अडचणींतून बाहेर पडण्यास मदत करणारे मार्ग सांपडले म्हणजे मग प्रत्यक्ष कृति घडविण्याकरितां, कार्याचा उठाव करण्याकरितां, अंतःकरणें काबीज करण्याकरितां, भावनांच्या भांडाराचा उपयोग करावयाचा असतो.

आपल्या सार्वजनिक जीवनांत गेल्या पन्नास वर्षांत राजकीय चळवळीला महत्त्वाचें स्थान लाभलें आहे. परंतु राजकारण हें साध्य नव्हे. भारत मागसलेला देश आहे, त्याला प्रगतिपथावर आणावयाचें आहे. भारताच्या मागासलेपणाकडे कानाडोळा करून चालणार नाहीं. असें करणें शहामृगी खेळ खेळण्यासारखें आहे. भारताचा मागासलेपणा परकीयांच्या स्वाऱ्यांनीं व दीर्घकालीन पारतंत्र्यामुळें निर्माण झाला आहे हें जितकें सत्य आहे त्यापेक्षां उलट मागासलेपणामुळें परकीयांच्या स्वाऱ्या झाल्या व वारंवार पारतंत्र्य आलें, हें अधिक महत्त्वाचें सत्य आहे. एखादा लहानसा देश मोठ्या शक्तीच्या पुढें हार खाऊन परतंत्र होऊं शकतो. परंतु हा फार मोठा देश परकीयांच्या स्वाऱ्यांच्या पुढें वारंवार हार खात गेला, याची मीमांसा आगंतुक कारणें दाखवून पुरेशी होत नाहीं. त्याकरितां अंतरंगांतील खोल कारणांचा शोध करून अर्थ लावणें जरूर आहे. प्रत्येक वेळीं संघटित व अल्पसंख्य धाडसी लोकांनींच भारताला जेरीस आणून आपल्या कबजांत घेतलें ही गोष्ट इतिहास वारंवार दाखवितो. भारताची प्राचीन संस्कृति शक्तिसंचय संपल्यामुळें अधिक पुढें प्रगति करूं शकली नाहीं, म्हणून देश दीर्घकालीन जीर्णदशेंत सांपडला. प्रगति करणाऱ्या सामाजिक शक्ती खुरटल्या हें या पुनःपुनः घडणाऱ्या पराभवाचें कारण होय.

प्रगति करणाऱ्या शक्तींची वाढ जर खुंटली नाहीं, तर वारंवार पराभव होत नसतो व अवनत दशा चिरकाल टिकत नाहीं. प्रगतिकारक शक्ती आपलें अस्तित्व शाबीत केल्याशिवाय राहात नाहींत.

---

मानवेंद्रनाथ रॉय यांच्या 'Indian Renaissance Movement' ( ७ एप्रिल १९४४ ) या पुस्तिकेंतून उद्धृत.



अनुक्रमणिका








नवे विचार व नवीं ध्येयें त्यांत येऊं लागतात, लोकांच्या ठिकाणीं नव्या प्रेरणा त्या शक्ती निर्माण करितात व इतिहासाच्या नव्या प्रकरणाचें पृष्ठ उघडलें जातें. अवनत दशा संपली असें दर्शित करणाऱ्या अवस्थेला '**नवजीवन**' असें म्हणतात. नवजीवन म्हणजे पुनर्जन्म. नवजीवन ही संज्ञा ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाची आहे. मध्ययुगीन अंधारांतून उत्तीर्ण होऊन बाहेर पडण्याकरितां झगडणाऱ्या युरोपच्या त्या विशिष्ट कालखंडाला **नवजीवन** ही संज्ञा आहे. युरोपच्या मानवजातीला असें नवजीवन लाभलें म्हणून आधुनिक संस्कृति व विशेषतः विज्ञान प्रादुर्भूत झालें.

आपण जेव्हां 'भारतीय नवजीवनाची चळवळ' असा शब्दप्रयोग करतो, तेव्हां कांहींसा असाच अर्थ मनापुढें येतो. परंतु आपल्या देशांत ही गोष्ट घडून येणें अवघड आहे. जीर्णोद्धाराच्या चळवळीनें आपल्या देशाचें मानसिक वातावरण भारलेलें व भारावलेलें आहे. भूतकाळची महती गाऊन भूतकाळांतील कल्पित सुवर्ण युगाची कल्पना आपल्या देशाच्या प्रगतिशील बुद्धीचीं द्वारें बंद करून बसली आहे. जीर्णोद्धारवादाला त्या भूतकालीन सुवर्ण युगानें स्वप्न खरें करून दाखवावयाचें आहे. इतिहासाचे पुरावे खरे कीं खोटे, याची तमा न बाळगतां वासनावश होऊन मिथ्या अहंतेच्या धुंदींत हें स्वप्न रचलें गेलें आहे. उदाहरणार्थ, विक्रमादित्याच्या युगप्रारंभाचा दिन नुकताच साजरा झाला. ऐतिहासिक सत्याच्या बाबतींत आपण किती बेफिकीर आहोंत हें त्यावेळच्या पुढाऱ्यांच्या भाषणांनीं सहज सिद्ध झालें आहे. विक्रमसंवत् स्थापणारा विक्रमादित्य होता हें सिद्ध करणारा पुरावाच उपलब्ध नाहीं !

अशा प्रकारचा हा जीर्णोद्धारवाद निरुपद्रवी म्हातारचळ म्हणून उपेक्षणीय मानावा असें कोणी म्हणेल. परंतु या चळवळीची वाढ भलत्या दिशेनें होत आहे, यांत मोठा धोका आहे. प्रतिगामी कल्पना व ध्येयें दृढ करण्याकरितां नैतिक पाठिंबा मिळविणें असा या चळवळीचा उद्देश आहे. सामाजिक व सांस्कृतिक मागासलेपणाचें गटारपाणी या चळवळीचें पोषण करीत आहे. भारतीय नवजीवनाच्या चळवळीला व पुरोगामी शक्तीला विरोध करणाऱ्या हुकूमशाही राष्ट्रवादाचा उद्देश सफल करणें हा या काल्पनिक सुवर्णयुगाच्या पुरस्काराचा हेतु आहे.

ज्यांना नवजीवनाची चळवळ विचारांत घ्यावयाची आहे, त्यांना भारताच्या प्राचीन संस्कृतीचा परामर्श घेण्याची आवश्यकता आहेच. जुन्या जगानें दिलेला वारसा नीट रीतीनें तपासून घेणें नवजीवन चळवळीचें एक अंग आहे. मागें पाहूनच पुढें जाणें योग्य असतें. युरोपांतील नवजीवनाच्या चळवळीची कल्पना अशाच प्रकारची होती. प्राचीन ग्रीक संस्कृतीचा व विशेषतः प्लेटोच्या विचारांचा पुनरुद्धार यास त्यांत प्राधान्य होतें. या चळवळीचा अभ्यास केल्यावर असें दिसून येतें कीं, युरोपियन नवजीवनाच्या चळवळींतील माणसें भूतकाळाकडे दृष्टि फिरवून चाललेलीं जरी दिसतात, तरी असें करीत असतां वस्तुतः त्यांनीं उलट्या दिशेचाच दृष्टिकोण युरोपियन मानवजातीला दिला. भारताला असेंच करावें लागेल. ही गोष्ट नुसती शक्य नाहीं तर आवश्यक आहे. नवजीवन ही हिंदुस्थानची ऐतिहासिक अपरिहार्य गरज आहे. ही अशी गरज ज्यांना भासत आहे त्यांना याची जाणीव आहे कीं, मनुष्यजातीचा जो थोर वारसा आहे त्यामध्यें प्राचीन भारताच्या विचारवंतांनीं मूल्यवान् भर टाकली आहे. मानवी विचाराची दोन स्वरूपें असतात : त्यांतील एक तात्पुरतें प्रमाण असतें. हें तात्पुरतें असलेलें स्वरूप विशिष्ट ऐतिहासिक युगापुरतेंच प्रमाण असतें. सामाजिक परिस्थितींत बदल होऊन जन्माला आलेल्या नव्या

कालखंडांत तेंच स्वरूप असमर्थ बनून अप्रमाण बनतें. दुसरें स्वरूप जें असतें तें चिरंतन सामर्थ्याचें असतें. तें मानवी विचाराच्या इतिहासांत टिकाव धरूं शकतें. त्याच्या अभावीं तर संस्कृति, प्रगति किंवा सुधारणा होणें अशक्य ठरेल! मनुष्यजाति जेथें वाटच संपलेली असते अशा टोंकाला येऊन जेव्हां जेव्हां पोंचते अशा वेळीं पाठीमागें पाहूं लागते. त्यावेळीं तिचा प्रयत्न भूतकालीन परंपरेंतील चिरंतन अंशांतून धैर्य व स्फूर्ति मिळवावी असा असतो. प्राचीन भारताच्या सांस्कृतिक विचारप्रवाहांत असे कोणते चिरंतन अंश आहेत हें शोधून काढणें आवश्यक आहे. त्याकरितां त्या पडिक जगांतील पर्वतप्राय टाकाऊ अवशेषांच्या ढिगाऱ्याखालीं खोल खणणें जरूर आहे. हा पर्वतप्राय उद्वेगपूर्ण ढिगारा आपल्या दीर्घकालीन जाड्याचें अधिष्ठान होय. आपण आज त्याला आपला वारसा समजून त्याच्याकडे पाहून फार खूष होतों! जे असे खूप खूप झालेले असतात, त्यांना त्याच्याखालीं दडलेल्या प्राचीन संस्कृतीच्या चिरंतन संपदेचें ज्ञान मुळींच नसतें. त्या चिरंतन मूल्यांचा शोध व संग्रह करून तीं टिकविणें हा भारतीय नवजीवनाच्या कार्यक्रमांतील एक मुख्य मुद्दा आहे. ग्रीस देशांतील ऋषींनीं जशी मानवी विचारसंपदेंत एक महत्त्वाची भर घातली आहे त्या प्रकारची ही भर आहे. परंतु जीर्ण अवशेषाच्या गोंधळांत ती लुप्तप्राय झाली आहे. हे जुने टाकाऊ अवशेष म्हणजे ब्राह्मणांस प्राधान्य दिलेल्या अशा जीर्ण व अवनत समाजसंस्थेचे अंश होत. त्या अंशांना भारतीय संस्कृति म्हणून मिरविणें हा भयानक प्रमाद होय!

नवजीवन-चळवळीनें दुसरें एक कठिण काम हातीं घेतलें पाहिजे. भारताचा प्रमाणशुद्ध इतिहास लिहिणें हें तें काम होय. प्राचीन इतिहासापासून स्फूर्ति खरोखर मिळवावयाची झाली तर इतिहास म्हणजे काय याची कल्पना बरोबर असली पाहिजे. इतिहासाचें विशिष्ट तत्त्वज्ञान असतें आणि विज्ञानशुद्ध इतिहास कसा लिहावा याची विशिष्ट पद्धति असते. भारताचा इतिहास लिहिण्याचें काम जीं माणसें अंगावर घेतील त्यांनीं जर इतिहासाचें विज्ञान व तत्त्वज्ञान दुर्लक्षिलें, तर इतिहासलेखनाची विज्ञानशुद्ध पद्धति ते गमावून बसतील व त्यामुळें भारतेतिहास म्हणजे एक पौराणिक कथा निर्माण करतील! भविष्यकालीन भारताच्या कारागिरांना विज्ञानशुद्ध इतिहासाची गरज आहे. आपल्या पूर्वजांच्या चिरंतन यशाच्या ज्ञानानें मिळालेल्या स्फूर्तीनें त्यांना अधिक चांगला व मोठा भविष्यकाल रचतां येईल.

भारताचा इतिहास लिहिण्याच्या कामांत आणखी एक महत्त्वाची अडचण आहे. पुराव्याच्या तपासणीच्या आधुनिक कसोटीला उतरेल असा नोंदलेला भारतेतिहास किंवा विश्वासार्ह अशी विविध प्रकारची लिखित नोंद बुद्धयुगाच्या अंतापर्यंत सांपडत नाहीं. बौद्धक्रांतीनें तत्पूर्वीच्या नोंदी नष्ट केल्या आहेत व बौद्धक्रांतीचा पराभव करणाऱ्या ब्राह्मणी प्रतिक्रांतीनें बौद्धक्रान्तीच्या नोंदी नष्ट केल्या आहेत. म्हणून लिखित प्रमाणांवर आधारलेला भारतीय इतिहास १५०० वर्षांपूर्वीच्या कालखंडांत पोंचत नाहीं. स्वैर कल्पनातरंगांनीं इतिहास निर्माण करावा व पांच सहस्र वर्षांपूर्वीं काय घडलें याचें स्वप्न रचावें, यांत कांहीं अर्थ नाहीं. श्रीरामचंद्रानें अनेक सहस्रकांपूर्वीं वैमानिक यात्रा केली, वानरगण म्हणजे एंजिनिअरांचें पथक होतें, त्यांनीं समुद्रावर पूल बांधले— अशा अद्भुत कल्पित कथांच्या आधारावर इतिहास बनविण्यांत अर्थ नसतो.

अशा परिस्थितींत इतिहासलेखनाची वैज्ञानिक पद्धति आपणांस मदत करील. महान् दार्शनिक हेगेल यानें असा सिद्धांत सांगितला आहे कीं, तत्त्वज्ञानेतिहास म्हणजे विश्वेतिहास होय. हाच सिद्धान्त उलटा मांडला म्हणजे बरोबर होतो. तत्त्वज्ञानेतिहास












मानवेतिहासाच्या इतर शाखांच्या समांतर रेषेंत घडत असतो, हा सिद्धांत बरोबर आहे. कारण सामाजिक विकासावर मनुष्याच्या आत्म्याची वैचारिक यशस्विता म्हणजे तत्त्वज्ञान अवलंबून असतें. या सूत्राप्रमाणें उलटा क्रम अनुसरून आपणांस भारतीय विचारांचा इतिहास निर्माण करतां आला तर प्राचीन भारताच्या सामाजिक विकासाचा इतिहास रचतां येईल. विशिष्ट प्रकारचा विचार हा विशिष्ट सामाजिक संबंधांशीं संलग्न असतो, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे.

आपणांस भारताच्या विशिष्ट प्राचीन कालखंडांत विशिष्ट प्रकारचा विचार प्रबल होता, असें जर दिसून आलें तर तत्कालीन सामाजिक परिस्थिति कशा प्रकारची होती, हें विचारसाम्यावरून योग्य रीतीनें निश्चित करतां येईल. कारण, इतर देशांमध्यें सुद्धां विशिष्ट प्रकारच्या सामाजिक विकासाशीं अनुरूप स्वरूपांत वाढलेली तशाच प्रकारची तत्त्वज्ञानपद्धति रूढ होती, असें तुलनात्मक अभ्यासानें दाखवितां येतें.

भारतीय नवजीवनाच्या चळवळीचें तिसरें एक जबाबदारीचें काम आहे. वरील दोन कामें नीट रीतीनें पार पडावयास हें तिसरें काम तुम्हीं आधीं हातीं घ्यावयास पाहिजे. भारताचा सामान्य इतिहास लिहिण्याच्या अगोदर भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहिणें आवश्यक आहे. येथें नेहमीं तत्त्वज्ञान या नांवानें जें निर्दिष्ट केलें जातें तें तत्त्वज्ञान (Philosophy) नसून धर्मशास्त्र (Theology) असतें. परंतु अत्यंत प्रगल्भ असें तत्त्वज्ञान भारतापाशीं पूर्वी होतें. आपले सुप्रसिद्ध तत्त्वज्ञानाचे उपदेशक व प्रचंड ग्रंथांचे लेखक ही गोष्ट जाणतात, असें दिसत नाहीं. ते तत्त्वज्ञानाचा उपदेश म्हणून धर्मोपदेश करीत असतात. ते जें लिहितात तें धर्मावर लिहिलेलें असतें, तत्त्वज्ञानावर नव्हे.

आणखी असें कीं, तत्त्वज्ञानेतिहास धर्मेतिहासावरून अनुमानानें काढतां येतो. आपली जी सुप्रसिद्ध परंपरागत सामग्री आहे ती म्हणजे धार्मिक विचारांची पंचमेळ होय. पूर्वग्रह, कल्पनातरंग, मतिभ्रम व लोकभ्रम यांची सरमेसळ होऊन तयार झालेला गठ्ठा तो आहे. हा गठ्ठा हेंच अभ्यासाचें साधन होय. जगाच्या इतर भागांच्या इतिहासांत सांपडणाऱ्या साधनांच्या तुलनेनें आपणांस याचें पृथक्करण करतां येईल. त्यावरून सामाजिक संबंध आणि विचार यांचे सांधे जुळवितां येतील आणि त्यावरून विननोंदलेला इतिहास कांहीं अंशीं पुन: रचतां येईल. तेव्हांच भूतकालाच्या अवशेषाखालीं दडलेला तेजस्वी निधि आपल्या हातीं येईल. त्याकरितां वर्तमानकाळापासून प्रारंभ करणें जरूर आहे. वैज्ञानिक पद्धतीच्या विदारक प्रकाशानें भूतकाळाच्या काळोखांत दडलेलीं रत्नें चमकून उठतील. त्यांचा संग्रह करून भविष्याचा मार्ग आक्रमावयास लागूं या.

भूतकालाच्या स्मृतीच्या भांडवलावर आपण जगूं शकणार नाहीं. भूतकालाच्या महिम्याच्या आकर्षणापासून आपण आपणांस मुक्त केलें पाहिजे. भूतकाल मृत आहे. त्याचें दफन करण्याचें धैर्य आपणांस असावयाला पाहिजे. तें जितक्या लौकर करतां येईल तितकें अधिक बरें. नाहींतर आपलें सगळें वातावरण बिघडून जाईल. भूतकाळाकडे तोंड करून जर पुढें जाण्याचा प्रयत्न केला तर प्रगति होणार नाहीं, झालीच तर अत्यल्प होईल. भूतकाळाकडे कायम पाठ केली पाहिजे. पुढें जाण्यास उपयोगी होईल तेवढेंच त्यांतून घेतलें पाहिजे. त्याला आदर्शवत् मानण्याची प्रवृत्ति मात्र उपयोगी पडणार नाहीं. टीकात्मक दृष्टीनें भारतेतिहास तपासला तरच त्यांतील उपयुक्त तेवढें निवडतां येईल. याकरितां वैचारिक क्रांतीची चळवळ आपण निर्माण करूं या.

पुरातन मूल्यांचें पुनः मापन केल्यानें वैचारिक नवजीवनाची प्रक्रिया राष्ट्रांत सुरू होऊं










शकते. जुन्या परंपरा आणि संस्था यांची वैचारिक तपासणी करण्याची गरज प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत उत्पन्न होत असते. नाहींतर जुनी परंपरा प्रगतीच्या पायांतील शृंखला बनते व राष्ट्र मागेंच राहतें.

गेल्या दोनशें वर्षांच्या ब्रिटिश राजवटींत आपला पाश्चात्त्य संस्कृतीशीं जो संबंध आला तो अगदीं वरपांगी होता. आणि पुनः त्यांतहि न्यूनगंडानें पराभूत होऊन आपण आधुनिक विचारपद्धतीचा स्पर्शदोष टाळला. भारतीय विद्वानांना देखील पश्चिमेपासून कांहीं अधिक शिकण्यासारखें आहे याची जाणीव राहिली नाहीं. कांहीं बाबतींत जें कांहीं अनुकरण केलें तें अगदीं उथळपणाचें दर्शक होतें. त्यामुळें खरीखुरी विचारक्रांतीच या ठिकाणीं जन्माला आली नाहीं. असा बहाणा करण्यांत आला कीं, प्राचीन काळीं सर्वोच्च मानवी संस्कृति या देशांत नांदत होती. देशकालाच्या बंधनाच्या पलीकडे असलेलें अध्यात्मवादाचें नितांत वैशिष्ट्य भारताच्या ठिकाणीं आहे, असें येथील बौद्धिक नेते बोलूं लागले. पश्चिम ही भौतिकवादी आहे व भारत हा अध्यात्मवादी आहे — असा एक सिद्धांत भारतीय राष्ट्रवादाचा आधार बनविला गेला.

हा अत्यंत वादग्रस्त मुद्दा आहे. त्याच्या चर्चेंत मी येथें शिरत नाहीं. परंतु एक वस्तुस्थिति नाकारतां न येण्यासारखी अशी लक्षांत ठेविली पाहिजे. आधुनिक पाश्चात्त्य संस्कृति ज्या वैज्ञानिक विचारपद्धतीच्या आश्रयानें निर्माण झाली त्या प्रकारची विचारपद्धति भारतास वाढवितां आली नाहीं. त्यामुळें भारतास सामाजिक जाड्य आणि आर्थिक मागासलेपण प्राप्त होऊन तो दुःस्थितींत रुतून राहिला. आपणांस वैज्ञानिक विचारपद्धति स्वीकारल्याशिवाय प्रगति करतां येणार नाहीं. वैज्ञानिक विचारपद्धति ही जीवनदृष्टि आहे. केवळ विश्वविद्यालयीन ग्रंथपठनानें ही प्राप्त होत नाहीं. विचारावरील अंधश्रद्धेचें बंधन केवळ विज्ञानाच्या अध्ययनानें नष्ट होऊं शकत नाहीं. त्याकरितां बौद्धिक संस्कृतीच प्राप्त व्हावी लागते, तत्त्वज्ञानाची बैठक बदलावी लागते, बौद्धिक समीक्षा करून मौलिक प्रमेयें तपासावीं लागतात. बुद्धधर्माच्या नाशानंतर भारतांत आजपर्यंत अशी वैज्ञानिक समीक्षा करणारी व्यापक प्रवृत्तीच उत्पन्न झाली नाहीं. पाश्चात्त्यांच्या संसर्गांत बौद्धिक नवजीवन निर्माण होण्याची शक्यता होती. परंतु आमच्या वैचारिक नेत्यांनीं सगळ्या जगाच्या उद्धाराचा मार्ग प्राचीन भारतच दाखवूं शकेल अशी हास्यास्पद भावना, अहंता निर्माण केली असल्यामुळें, नवा भविष्यकाळ निर्माण करणारी स्फूर्तीच त्या योगानें उत्पन्न होणें अशक्य झालें आहे. जुन्या जगाचे पाये खणल्याशिवाय हें डबघाईस आलेलें प्रचंड ओझें ढासळणार नाहीं आणि नव्या जीवनाला जागा देणार नाहीं.

माझें मागणें एवढेंच आहे कीं, सत्याचा शोध करण्यास आवश्यक असलेली अनिर्बंध प्रेरणा तुमच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावी असें वाटत असेल तर बौद्धिक चिकित्सा करण्यास आवश्यक असलेलें धैर्य हृदयांत बाळगा. विचारपूस न करतां श्रद्धा ठेवूं नका. शब्दप्रामाण्याच्या विरुद्ध बंड करण्याचें धैर्य जर तुमच्यांत नसेल तर निदान शब्दप्रामाण्य कशावर आधारलेलें आहे, हें समजून घेण्याचा तरी प्रयत्न करा. अज्ञात व अज्ञेय शक्तींना सहज स्वेच्छेनें शरण जाण्याची प्रवृत्ति जोंपर्यंत तुमच्यामध्यें राहील तोंपर्यंत या भूलोकावरील मुक्ति तुम्हास लाभणार नाहीं. ज्यांच्या मनावरील व बुद्धीवरील बंधनें साफ तुटलीं आहेत, तेच क्रांति घडवूं शकतात. सुशिक्षित मन हें वैचारिक स्वातंत्र्य भोगणारें असतें. तें वैचारिक दृष्ट्या अशुद्ध असलेल्या मताचें समर्थन करण्याचा प्रयत्न करीत नाहीं. असल्या अर्धवट बुद्धिवादाला त्वरित रामराम ठोका.








अंधश्रद्धा आत्मप्रगतीचें सर्वांत मोठें बंधन होय. जोंपर्यंत भारतवर्ष अंधश्रद्धेला अध्यात्मिकतेच्या उच्च पीठावर राज्याभिषेक करीत राहील तोंपर्यंत दुर्गति, दैन्य, अपमान, अवनति व अधःपात यांतून बाहेर पडण्यास तो समर्थ होणार नाही. शब्द-प्रामाण्याच्या विरुद्ध बुद्धिवाद, श्रद्धेच्या विरुद्ध ज्ञान, परंपरेच्या विरुद्ध बंड असा पर्याय स्वीकारल्या-शिवाय भारताला नवजीवन लाभणार नाहीं. भूतकाळ कितीहि आकर्षक असला तरी त्याचें प्रेत थडग्यांत पुरलेलें तसेंच राहूं द्या. **कवि रवीन्द्रनाथ ठाकूर** यांच्या कवितेंतील आदर्श पुढें ठेवूं या. रवीन्द्रनाथ जेव्हां गूढवादी धार्मिक द्रष्टे म्हणून पुढें आले नव्हते तेव्हांची ती कविता आहे. धार्मिक गूढवादी म्हणून नव्हे तर ते कवि म्हणून चिरंजीव होणार आहेत. गूढवादी रवीन्द्रास जरी आपण हसलों तरी कवी रवीन्द्रापासून आपण शिकूं या:--

" Let us go forward, forward, Brothers !
To lag behind is to live for nothing !
What is the use of living a life which is death ? "

## असत्याची शिकार ( Lie-hunting ) हा माझा धंदा

खोट्याची शिकार करणें ( Lie-hunting ) हा माझा धंदा आहे. हा धंदा करणाऱ्याच्या नशिबीं निंदा ठरलेली. पण सत्य ही कल्पनाच अर्थशून्य व्हायची नसेल तर कोणीतरी खरें - सत्य सांगितलेंच पाहिजे. जेव्हांपासून मी स्वतः विचार करायचें शिकलों व खरें आणि खोटें यांच्यांतील फरक मला कळूं लागला, तेव्हांपासून असत्याची शिकार करण्याचें कार्य मी करीत आलों आहे. त्यामुळें मला लोकप्रियता अर्थातच मिळाली नाहीं ! देहदंड, क्लेश आणि त्याग हे सद्गुण आहेत असा उपदेश करणारे प्रत्यक्ष क्लेश आणि त्याग करणाराची चाड बाळगतांना दिसत नाहींत. माझा अशा उपदेशावर विश्वास नाहीं. मीहि त्याग केला आहे. पण तो कर्तव्य म्हणून नव्हे तर जो खेळ मी खेळायचें पत्करलें त्या खेळाचा एक भाग म्हणून ! त्या त्यागामुळें, मला हालअपेष्टाहि सहन कराव्या लागल्या आहेत. परंतु मला हुतात्म्याचा मानसिक गंड ( Martyr-complex ) नसल्यामुळें, त्यांत मी कांहीं विशेष यातना सोसल्या असें मला कधींच वाटलें नाहीं. काम करतां करतां, क्लेश माझ्या सहज वांट्याला आले. त्यांची जाहिरात किंवा बडेजाव झाला नाहीं.

माझी तशी जर प्रवृत्ति असती तर माझ्या ऐन तारुण्यांत माझ्या अंगीं ज्या शक्ती व सामर्थ्य आहेत त्यामुळें माझी स्वतःची प्रतिष्ठा व बडेजाव मी खूप वाढवून घेऊं शकलों असतों ! माझ्या देशाच्या चतुःसीमेबाहेर त्रिखंड राजकीय कीर्ति तर माझ्या सहज हाताशीं होती ! भौतिक दृष्ट्याच जर विचार करावयाचा, तर, जर मला वैयक्तिक मान व संपत्तीच मिळावयाची असती तर जो कोणताहि व्यवसाय मी पत्करला असता त्यांत मी अग्रगण्य ठरलों असतों. असें म्हणणें फाजील अहंकाराचें आहे असें मला वाटत नाहीं. त्या मार्गाऐवजीं मी दुसराच मार्ग पतकरला, कीं ज्यामुळें मायदेशाच्या बाहेर १५ वर्षें निर्वासित म्हणून काढल्यावर आज माझ्या नशीबीं माझ्या मायदेशीं सहा वर्षांचा खडतर तुरुंगवास आला आहे. या तुरुंगवासाच्या खडतर जीवनामुळ माझ्या आयुष्याचीं किती तरी वर्षें कमी होणार आहेत ! ...

असत्याची पारध करायचें माझें कार्य मी चालूंच ठेवणार. लोकप्रियतेच्या मागें लागायची माझ्या आयुष्यांतील वेळ आतां टळून गेली आहे ! शिवाय, लोकप्रियतेच्या ह्या शंकास्पद मानाला पात्र व्हायला माण-साला बौद्धिक बुद्दूपणा ( mediocrity ) लागतो, तो सुदैवानें माझ्याजवळ नाहीं.

— मानवेन्द्रनाथ रॉय, ' Some Random Reflections ' मधून.



अनुक्रमणिका








श्री. जवाहरलाल नेहरू

# मानवेन्द्रनाथ रॉय

त्यांची व माझी पहिली गांठ मॉस्कोमध्यें १९२७ च्या नोव्हेंबरमध्यें पडली. त्यांच्याविषयीं मी पुष्कळ ऐकलें होतें. त्यांनीं हिंदी प्रश्नावर जें चमकदार व तेजस्वी पुस्तक लिहिलें होतें तें मी वाचलें होतें. म्हणून त्यांच्या भेटीची मी कुतूहलपूर्वक वाट पहात होतोंच.—आणि माझी निराशा झाली नाहीं.

सहा फूट उंचीचे व धिप्पाड, दणगट बांध्याचे एम्. एन्. रॉय भारतीय माणसाचा एक उत्तम नमुना होता. बौद्धिक दृष्ट्या ते अत्यंत जागृत आणि तल्लख होते. कांहीं मिनिटेंच माझें त्यांच्याशीं संभाषण झालें. पण इतक्या थोड्या अवधीच्या संभाषणावरूनहि, त्यांच्या ठिकाणीं असाधारण कर्तृत्व असलें पाहिजे याची माझ्यावर छाप पडली. त्यांचें जीवन प्रामुख्यानें बौद्धिक होतें, हें उघडच होतें. तथापि त्यापेक्षांहि कांहीं अधिक त्यांच्या ठिकाणीं होतें. आपल्या विचाराप्रमाणें आपल्या आचारालाहि वळण द्यावयाचा प्रयत्न करणारे ते कृतिवीरहि असून, कृतीची जी जी संधि येईल ती पकडून तिचा उपयोग करायला ते सदैव उत्सुक होते. अर्थशास्त्र, राज्यशास्त्र आणि जीवन यांबद्दलचा जो मार्क्सवादी दृष्टिकोण त्यावर त्यांची दृढ निष्ठा असून, तदनुसार जें महान् ध्येय त्यांनीं आपल्या मनापुढें निश्चित केलें होतें त्याला त्यांनीं सर्वस्वीं वाहून घेतलें होतें. परंतु त्यांच्या ठिकाणीं बुद्धीचाहि अभिमान होता. दुसऱ्याच्या पाठीमागून चिकित्सा न करतां आंधळेपणें व निमूटपणें जाणाऱ्यांपैकीं ते नव्हते.

माझ्यावर त्यांची छाप पडून त्यांच्याविषयीं माझा अनुकूल ग्रह झाला एवढें खरें. परंतु माझ्याविषयीं मात्र त्यांना तसें वाटलें नसावें हें पुढें उघड दिसून आलें. नंतर पुढील कांहीं वर्षांतून त्यांनीं लेख लिहून त्यांतून माझ्यावर आणि माझ्यासारख्यावर अत्यंत कडक व कटु टीका केली. आह्मांला त्यांनीं 'पेटी बुर्झ्वा' ('क्षुद्र बुरुजे') असें नामाभिधान दिलें होतें. अर्थात् त्या नामाभिधानांत थोडेंफार तथ्यहि होतें. त्यांचे लेखांतील वाक्प्रहार कठोर आणि झणझणणारे होते. तथापि त्यांची व माझी जी थोडा वेळ का होईना भेट झाली त्या भेटीची स्मृति माझ्या मनांत नेहमींच ताजी राहिली आहे. त्यांच्याविषयीं एक प्रकारची आपुलकी व मृदु भावना माझ्या हृदयांत सदैव वसत आली आहे.

यानंतर कांहीं वर्षें लोटलीं. १९३१ सालीं एके दिवशीं, एक अनोळखी गृहस्थ मला भेटावयाला आले. ते दुसरेतिसरे कोणी नसून रॉयच होते हें पाहून मला आश्चर्यच वाटलें. ते माझ्याकडे येतील, अशी माझी अपेक्षा नव्हती. किंबहुना, ते हल्लीं हिंदुस्थानांत आहेत, याचीहि मला कल्पना नव्हती. परंतु त्यांना पाहिल्यावर मी लगेच ओळखलें. त्यांची भेट झाल्यामुळ मला आनंद झाला.

पंधरा वर्षांचा दीर्घ कालावधि बाहेर कंठून ते आपल्या मायभूमीला परत आले होते. ते परत आले तेहि अत्यंत विलक्षण परिस्थितींत. ब्रिटिश अधिकारी ज्यांचा अगदीं मनापासून द्वेष करीत

'Recent Essays and Writings' (आवृत्ति २ री, १९३७) या श्री. जवाहरलाल नेहरू यांच्या पुस्तकांतील 'M. N. Roy' या लेखाचा प्रस्तुत मराठी अनुवाद त्यांच्या संमतीनें येथें सादर केला आहे.—का. सं.



अनुक्रमणिका

अशांपैकीं रॉय एक होते. म्हणूनच ज्या भूमींत युनिअन जॅक निशाणाला अग्रपूजेचा मान होता, त्या भूमीस परत येणें म्हणजे तुरुंगवास व हालअपेष्टा ठरलेल्याच ! अर्थात् रॉयना याची पूर्ण जाणीव होती. आणि तरी देखील ते आले. सोव्हिएट युनिअनमधील त्या वेळीं बलाढ्य असलेल्या स्टॅलिन-गटाशीं त्यांचे धोरण व डावपेंच याबाबत मतभेद झाले होते. आणि स्पष्ट मतभेदांचें तेथें तर वावडें होतें ! म्हणून रॉय यांनीं रशिया सोडला.

पण रॉय स्वस्थ, निष्क्रिय बसणारे नव्हेत. कार्या-बद्दलची त्यांची प्रेरणा इतकी बलवत्तर होती कीं, ती दडपून टाकणें त्यांना शक्यच नव्हतें. तिनें त्यांना खेंचून नेलेंच. बौद्धिक आणि कृतिमय जीवनाला वाहिलेल्या या गृहस्थाच्या आतांपर्यंत आंतल्या आंत डांबून राहिलेल्या शक्तींनीं जोर करून त्याला अपरिहार्यपणें आपल्या मायदेशाकडे, तेथें त्याच्या करितां काय वाढून ठेवलें आहे याची त्यांना जाणीव असतांहि, ओढून नेलेंच !

ते येथें परत आल्यावर, जें घडेल असें त्यांना वाटलें होतें, तें कांहीं महिन्यांच्या आंतच घडून आलें. आम्हांपैकीं कोणीहि त्यांच्याकरितां कांहीं विशेष करूं शकत नव्हतें. तरीपण 'आपण स्वतः त्यांच्या थोडेंफार उपयोगीं पडून त्यांच्याबद्दल आप-णांस किती आदर वाटतो तें प्रकट करावें' अशी मला इच्छा होती. त्यांच्या बचावाकरितां एक समिति नेमली होती. त्या समितीचा मी सदस्य झालों. अशा समितींचा हिंदुस्थानांत सध्यांच्या परिस्थितींत कांहींहि उपयोग नसतो हें मला ठाऊक होतें व अशा समितींवर माझा विश्वासहि नव्हता. तथापि अशाहि बचावसमितीचा, रॉय यांच्याबद्दलचा आदर-भाव प्रकट करण्याच्या बुद्धीनेंच, मी सदस्य झालों.

आज रॉय बरेली सेंट्रल प्रिझनमध्यें पडून आहेत. गेलीं सुमारें २।२॥ वर्षें ते तुरुंगांत खित-पत पडले आहेत. ते आजारीहि आहेत. त्यांचा आजार गंभीर स्वरूपाचा आहे असें म्हणतात. बराच दीर्घ कालपर्यंत येथील उष्ण हवेची त्यांची संवय सुटली होती. पण आज त्यांना उत्तर हिंदु-स्थानच्या उन्हाळ्याची भयंकर उष्णता सहन करावी लागत आहे, आणि तीहि तुरुंगाच्या कष्टमय, उद्वेग-जनक परिसरांत ! आमच्यापैकीं कांहींना तुरुंगांत ज्या सोयी-सवलती मिळत असत, त्याहि त्यांना बंद आहेत. त्यांना पुस्तकें व लेखनसाहित्य देण्यावरहि कडक नियंत्रण आहे, असें दिसतें. बौद्धिक जीव-नाला वाहिलेल्या माणसाला तर हें भयंकर दिव्यच होय !

असे ते सुकून जात आहेत. त्यांचें प्रतिभा-शाली, तेजस्वी तरुण जीवन ! आतांपर्यंतच्या त्यांच्या कर्तबगारीवरून त्या जीवनाबद्दल किती भव्य आशा निर्माण झाल्या होत्या ! पण आज तें तरुण जीवन बिचारें घसरगुंडीला लागलें असून त्याचा केव्हां कडेलोट होईल हें सांगवत नाहीं ! हिंदुस्थानच्या चालू पिढींतील एका अत्यंत धैर्यशाली आणि कर्तब-गार पुरुषावर अशी नियति येऊन गुदरली आहे. आपण मनुष्यबळाच्या बाबतींत आधींच दरिद्री आहोंत. आपल्या देशाकरितां कांहीं मोठें करून दाखवायची ज्यांना कुवत आणि कर्तबगारी आहे, त्यांचीं आयुष्यें अशीं फुकट जायची पाळी यावी, ही घटना किती दुःखदायक आहे ! दुसरी-कडे पहावें तों ज्या लोकांना कांहीं बुद्धि, ध्येय किंवा सुसंस्कृत भावना आहे असा त्यांच्यावर कोणी आरोपहि करणार नाहीं, असे लोक सत्तेच्या व अधिकाराच्या जागेवर जाऊन बसले आहेत ! परंतु रॉयसारख्यांचें जीवन फुकट गेलें असें म्हणणें चूक आहे. त्यांची सध्या चालू असलेली शान्त, निस्तब्ध ध्येयसेवा ही घराच्या छपरांवर उभे राहून आरोळ्या मारून गाजावाजा करणाऱ्या अनेकांच्या-पेक्षां अधिक चांगली व परिणामकारक आहे.








श्री. व. भ. कर्णिक

# मेक्सिको ते मॉस्को--!

कॉ. रॉय मेक्सिकोमध्यें अवघीं अडीच वर्षें होते. पण अडीच वर्षांच्या अल्प कालावधींत त्या परक्या देशामध्यें त्यांनीं जें कार्य केलें त्याचा वृत्तांत कादंबरीमध्यें शोभण्यासारखा आहे.

१९१७ मध्यें कॉ. रॉय मेक्सिकोला पोंचले ते पळून गेलेल्या गुन्हेगारासारखे. १९१५ मध्यें हिंदी क्रांतीसाठीं जर्मनीमार्फतीनें शस्त्रास्त्रें गोळा करण्यासाठीं म्हणून त्यांनीं हिंदुस्थानचा किनारा सोडला. त्यावेळीं पहिल्या युद्धाची घनचक्कर चालूं होती. आणि देशामध्यें अनेक ठिकाणीं सशस्त्र क्रांतीचे प्रयत्न सुरूं होते. बंगालमधील सशस्त्र क्रांतीच्या या उठावांत कॉ. रॉय पुढारीपणानें काम करीत होते. त्या उठावाला शस्त्रास्त्रांचा पुरवठा हवा होता. तो मिळवण्याच्या कामीं कॉ. रॉय यांची योजना झाली आणि त्या निमित्तानें त्यांचें पृथ्वीपर्यटन सुरूं झालें.

पोलिसांची नजर चुकवीत त्यांनीं या काळांत जावा, सुमात्रा, मलाया, चीन, जपान, फिलिपिन्स इत्यादि देशांतून प्रवास केला. या वेगवेगळ्या देशांतील जर्मन वकील व इतर अधिकारी यांच्या गांठीभेटी घेऊन शस्त्रांची मदत मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. त्यांच्या प्रयत्नांना थोडेंबहुत यश देखील आलें आणि शस्त्रास्त्रांनीं भरलेली एक बोट ते हिंदुस्थानकडे रवाना करूं शकले. ती बोट पूर्व बंगालमधील चिनमुरा बंदरापर्यंत येऊनहि पोचली. पण पुढें शस्त्रास्त्रें उतरवण्याची सोय होऊं शकली नाहीं म्हणून तो बेत फसला !

त्यानंतर हिंदुस्थानच्या ईशान्येकडून चिनी पुढाऱ्यांच्या मदतीनें देशामध्यें शस्त्रास्त्रें पाठविण्याचा मनसुबा त्यांनीं रचला. त्या निमित्तानें कॉ. रॉय यांची चिनी प्रजासत्ताक क्रांतीचे पुढारी सन-यत्-सेन यांच्याशीं गांठ पडली. त्यांच्या मार्फतीनें व कांहीं चिनी सेनाधिकाऱ्यांच्या मदतीनें शस्त्रास्त्रांचा मोठा सांठा मिळविण्याची सर्व योजना त्यांनीं तयार केली. पण योजनेच्या सिद्धतेसाठीं पैशाची जी मदत हवी होती ती देण्याचें आपल्या अधिकारांत नाहीं, म्हणून जर्मन प्रतिनिधींनीं नाकारलें. त्यामुळें असें ठरलें कीं याबाबत कॉ. रॉय यांनीं बर्लिनमधील उच्च सेनाधिकाऱ्यांची गांठ घ्यावी व त्यांची समजूत घालून आवश्यक ती आर्थिक मदत मिळवावी. या योजनेप्रमाणें त्यांनीं अमेरिकामार्गें बर्लिनला जावें असें ठरलें.

ब्रिटिश सरकारविरुद्ध सशस्त्र क्रांतीची सिद्धता करणाऱ्या या क्रांतिवीराला ब्रिटिश सरकारच्या व त्यांच्या दोस्तांच्या हुकमतीखालील पूर्वेकडील या साऱ्या देशांतून पोलिसांच्या तावडींत न सांपडतां प्रवास करणें सोपें नव्हतें. या प्रवासांत त्यांच्यावर अनेक विघ्नें आलीं, अनेक वेळां त्यांना अनेक साहसें करावीं लागलीं. त्या सर्वांचा इतिहास जर कधींकाळीं सांगितला गेला तर ती एक रोमहर्षक कहाणी होईल. पॅसिफिक महासागराचें उल्लंघन हें देखील एक साहसच होतें. सुरवातीला मालाच्या बोटींतून लपून गेलेला एक प्रवासी म्हणून हा प्रवास करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण त्यामध्येंहि कांहीं विघ्न उपस्थित झालें. म्हणून अखेर पॅरिसला उच्च धार्मिक शिक्षणासाठीं जाणारा पांदिचरी येथील एक ख्रिश्चन मिशनरी म्हणून त्यांनीं हा प्रवास केला.

'फादर मार्टिन म्हणून' अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर उतरल्यानंतर अमेरिकेमध्यें हिंदी क्रांतिकारकांची जी संघटना होती व जिच्या मार्फतीनें त्यांचा पुढचा बर्लिनचा प्रवास घडावयाचा होता तिच्या शोधांत कॉ. रॉय न्यू यॉर्क येथें येऊन दाखल

कॉ. रॉय यांनीं लिहिलेल्या आत्मचरित्रपर लेखांच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे - लेखक.







झाले. तेथें त्यांनीं हिंदी क्रांतिकारक समितीच्या पुढाऱ्यांच्या गांठीभेटी घेतल्या, जर्मन सरकारच्या प्रतिनिधींशींहि सल्लामसलती केल्या, पण बर्लिनला जाणें हें जें त्यांचें उद्दिष्ट होतें तें साध्य होईना.

अमेरिकेंतील या वास्तव्यांत कॉ. रॉय यांना नव्या दृष्टीचा लाभ झाला. जुन्या वैयक्तिक साहसावर आधारलेल्या शस्त्रक्रांतीच्या मार्गावरील त्यांचा विश्वास उडाला आणि परकीय राज्यसत्ता उलथून पाडणें एवढेंच जें त्यांचें आजवरचें उद्दिष्ट होतें त्या उद्दिष्टाचा अपुरेपणा त्यांच्या लक्षांत येऊं लागला. समाजवादाकडे त्यांची दृष्टि वळली आणि थोड्याच दिवसांच्या अभ्यासानंतर त्या नवीन सामाजिक क्रांतीच्या तत्त्वज्ञानानें त्यांच्या मनाची पकड घेतली. याच सुमारास इतके दिवस तटस्थ राहिलेल्या अमेरिकेनें जर्मनीविरुद्ध युद्ध जाहीर केलें. त्यामुळें जर्मन हेरांची व हस्तकांची धरपकड सुरूं झाली. त्याचबरोबर युद्धांतील दोस्त जें ब्रिटिशसरकार त्याच्याविरुद्ध कट करणाऱ्या हिंदी क्रांतिकारकांकडेहि पोलिसांची नजर फिरली.

याच धरपकडींत कॉ. रॉय यांना न्यू यॉर्क येथें अटक झाली. एक रात्र त्यांना पोलिसठाण्यांत काढावी लागली. तरुण वय आणि विशेष पुरावा हातांत नाहीं म्हणून दुसरे दिवशीं त्यांची जामीनावर सुटका झाली. बेकायदेशीर रीतीनें देशामध्यें प्रवेश केला म्हणून अमेरिकेंतून उचलबांगडी होणें व ब्रिटिश पोलिसांच्या संरक्षणानिशीं हिंदुस्थानला परत पाठविला जाणें ही गोष्ट या खटल्यांतून निष्पन्न होणार होती. ती नको म्हणून कॉ. रॉय यांनीं पळून जाण्याचें ठरविलें. तो प्रयत्न यशस्वी झाला आणि पळून गेलेला एक गुन्हेगार म्हणून १९१७ मध्यें एक दिवस ते मेक्सिकोमध्यें येऊन दाखल झाले.

मेक्सिकोकडे वळण्यापूर्वी कॅनडाला जावें कीं काय असा एक विचार कॉ. रॉय यांच्या मनांत उद्भवला होता. पण कॅनडा ब्रिटिश साम्राज्यामध्यें आहे म्हणून नको, व मेक्सिकोमध्यें युकाटन प्रांतामध्यें समाजसत्तावादी राज्यव्यवस्थेचा प्रयोग चालूं आहे असें ऐकलें होतें म्हणून तो देश ठीक, असें वाटलें म्हणून त्यांचे पाय मेक्सिकोकडे वळले. तो प्रयोग करणारे त्या प्रांताचे गव्हर्नर जनरल अल्वाराडो यांना अमेरिकेंतील स्टॅनफर्ड विश्वविद्यालयाचे प्रमुख डॉ. डेव्हिड स्टार जॉर्डन यांनीं दिलेलें एक ओळखपत्र कॉ. रॉय यांच्याजवळ होतें. हें ओळखपत्र एवढेंच एक भांडवल घेऊन कॉ. रॉय यांनीं मेक्सिकोमध्यें प्रवेश केला.

कॉ. रॉय मेक्सिकोमध्यें दाखल झाले ते उत्तरेकडील प्रदेशांत. तेथून युकाटान प्रांत जवळजवळ दोन हजार मैल दूर होता. मेक्सिकोमध्यें त्या वेळीं बंडाळी चालूं होती. मध्यवर्ती सरकार मेक्सिको शहरीं नांदत होतें, पण त्या सरकारचा अंमल शहराबाहेर फारसा चालत नव्हता. प्रांतोप्रांतीं वेगवेगळे सेनाधिकारी होते आणि ते सोईला येईल त्याप्रमाणें मध्यवर्ती सरकारपुढें मान तुकवीत असत अगर त्याचे हुकूम धाब्यावर बसवीत असत. त्या शिवाय देशामध्यें अनेक पुंड बंडखोर होते. त्यांची पुंडाई ठिकठिकाणीं माजली होती. त्यामुळें प्रवास करणेंहि फार धोक्याचें होतें. म्हणून कॉ. रॉय यांनीं युकाटानला जाण्याचा बेत रद्द केला. आणि त्या देशाची राजधानी जें मेक्सिको शहर तिकडेच आपला मोर्चा वळवला. मेक्सिको शहर देखील हजार मैल दूर होते आणि तेथे रेल्वेनें पोचायला त्यांना तीन दिवस लागले.

कॉ. रॉय मेक्सिकोला पोचले त्यावेळीं त्यांच्या जवळचे पैसे जवळजवळ संपले होते. शहरांत कुणीहि ओळखीचें नव्हतें आणि शिवाय भाषाहि येत नव्हती. अशा परिस्थितींत दुसरा कुणीही इसम गांगरून गेला असता. पण थोड्या दिवसांत कॉ. रॉय यांनीं या परिस्थितींतून मार्ग काढला.








त्यांनीं तपास केला त्यावरून त्यांना असें कळलें कीं ज्या ज. अल्वाराडोला दिलेलें ओळखपत्र त्यांच्याजवळ होतें त्यांचा जावई मेक्सिकोमध्येंच संरक्षणमंत्र्याच्या हुद्द्यावर होता. त्याला त्यांनीं भेटायचें ठरविलें. ही भेट फार महत्त्वाची ठरली. पहिल्याच भेटींत कॉ. रॉय यांच्याबद्दल संरक्षण-मंत्र्याचें मत इतकें चांगलें झालें कीं त्यानें या हिंदी क्रांतिकारकाला सर्वतोपरी मदत करण्याचें ठरविलें. त्यानें कॉ. रॉय यांची, शहरांतील व देशांतील पहिल्या नंबरचें जें दैनिक होतें त्याच्या संपादकाशीं, गांठ घालून दिली. या वर्तमानपत्रांत संपादकाच्या सांगण्यावरून कॉ. रॉय यांनीं हिंदुस्थानांतील परि-स्थितीबद्दल कांहीं लेख लिहिले. या लेखांनीं शहरां-तील अनेक राजकारणी व सुशिक्षित गृहस्थांचें लक्ष लेखकाकडे वेधलें गेलें.

याच सुमारास दुसऱ्या दिशेनेंहि कॉ. रॉय यांना मदत येऊन पोचली. अमेरिका युद्धांत पडल्याकारणा-नें जर्मन प्रतिनिधींना आपलें कार्यक्षेत्र बदलावें लागलें. त्यांच्यापैकीं कांहींजणांनीं मेक्सिकोमध्यें मुक्काम ठोकला. मेक्सिकोचें सरकार युद्धामध्यें तटस्थ होतें. शिवाय अमेरिकेशीं नेहमीचें भांडण, त्यामुळें त्याचा कल थोडाबहुत जर्मनीकडेच झुकलेला असे. त्यामुळें जर्मन हस्तकांच्या कार्याला मेक्सिको ही मोठी अनुकूल जागा होती. त्यांना कॉ. रॉय यांचा पत्ता लागताच त्यांनीं त्यांना गांठलें आणि त्यांच्याशी पूर्वीचे संबंध प्रस्थापित केले. जर्मनीच्या मार्फतीनें शस्त्रास्त्रें मिळवून हिंदुस्थानांत सशस्त्र क्रांति घडवून आणण्याचा विचार पूर्वीइतका तीव्र स्वरूपांत जरी मनांत वावरत नसला तरी तो अजिबात नष्ट झाला नव्हता. त्यामुळें जर्मन हस्तकांची गांठ पडतांच तो विचार पुन्हा बळावला. त्या दिशेनें कॉ. रॉय यांनीं कांहीं खटपटी देखील करायला सुरुवात केली. चीनला त्यांनीं एकदोन प्रतिनिधी पाठविले, अमेरिकेंतील हिंदी क्रांतिकारकांशीं देखील संधान जुळविलें. पण ज्या मंडळींना हाताशीं धरलें ती मंडळी तेवढी निर्धाराची निघाली नाहीं. त्यामुळें या प्रयत्नांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. कॉ. रॉय यांचा स्वतःचा बर्लिनला जाण्याचा प्रयत्नहि असाच आगंतुक कारणामुळें फसला. त्यामुळें अखेरी-स त्यांनीं ते प्रयत्न सोडून दिलें. या घटनेमुळें एकच फायदा झाला आणि तो म्हणजे कॉ. रॉय यांची पैशाची ददात मिटली. जर्मन प्रतिनिधींनीं कॉ. रॉय यांना खूप पैसे दिले. या पैशाचा उपयोग नंतर कॉ. रॉय यांनीं मेक्सिकोंतील समाजवादी चळव-ळीच्या उभारणीसाठीं व रशियन राज्यक्रांतीच्या मदतीसाठीं केला.

जर्मन प्रतिनिधीशीं जो संबंध जडला त्याचा दुसराहि एक फायदा झाला. मेक्सिकोंतील जर्मन वकिलातीमध्यें जे जर्मन अधिकारी होते त्यांच्याशीं कॉ. रॉय यांचे स्नेहसंबंध जुळले. त्या स्नेहसंबंधा-मुळें त्यांच्या ओळखी वाढल्या. मेक्सिकन् राज-कारणांतील अनेक प्रमुख व्यक्तींशीं त्यांचा संबंध आला. अशाच एका वकिलातींतील मोठ्या मेज-वानीच्या प्रसंगीं कॉ. रॉय यांची मेक्सिकोचे अध्यक्ष कॅरांझा यांच्याशीं पहिली गांठभेट झाली. या भेटीचे पुढें दाट मैत्रीमध्यें रूपांतर झालें आणि त्या मैत्रीच्या बळावर पुढें कॉ. रॉय यांना अनेक गोष्टी करतां आल्या.

इतर रीतींनेंहि कॉ. रॉय यांचे मेक्सिकोतील सामाजिक आणि राजकीय संबंध वाढत चालले होते. एल्. पेब्लो या दैनिकाच्या संपादकांशीं तर आतां त्यांचे घनिष्ठ संबंध जमले होते. त्याच्या मार्फतीनें इतर अनेक लेखक, कवी, चित्रकार, राजकीय कार्यकर्ते वगैरेंशीं त्यांच्या ओळखी झाल्या. या ओळखीच्या मंडळीमध्यें ला मुजेर मॉडर्ना या स्त्रियांच्या मासिकाची स्त्री-संपा-दिका होती. ती एकेकाळी अध्यक्ष करंझा यांची खाजगी चिटणीस होती. तिच्यामुळेंहि कॉ.










रॉय यांचें मेक्सिकन सरकारदरबारांतील दळणवळण वाढलें. या सर्व मंडळींशीं जो सहवास घडला, त्यानें कॉ. रॉय यांच्या जीवनाला एक वेगळें वळण लागलें. युरोपिअन संस्कृतीची खरी गोडी त्यांना या मंडळींच्या संगतींत लागली. नृत्य, संगीत आदि कलांकडे त्यांनी आजवर कधींच लक्ष पुरविलें नव्हतें. मेक्सिकोमध्येंच त्यांना या कलांबद्दल आवड उत्पन्न झाली. आणि पुढें अनेक राजकीय व सामाजिक कार्यांमध्यें जरी त्यांचें सारें आयुष्य खर्चीं पडलें तरी त्या कलांबद्दलची त्यांची आवड कधींहि कमी झाली नाहीं.

युरोपिअन इतिहासाचा आणि वाङ्मयाचा त्यांनी खरा अभ्यास असा या दिवसांतच केला. या अभ्यासामुळें त्यांच्या डोक्यावरील राष्ट्रवादाचें पटल पुरें दूर झालें. शास्त्रीय दृष्टिकोण आणि चिकित्सक बुद्धि यांची त्यांना आवश्यकता पटली. मार्क्सवादाचा त्यांनीं नुकताच अंगीकार केलेला होता. तरीदेखील वर उल्लेखिलेल्या अभ्यासामुळें ते मार्क्सवादाचे आंधळे भक्त बनले नाहींत. याच वेळीं ते स्पॅनिश, फ्रेंच व जर्मन या भाषा शिकले. याच सुमारास त्यांचें पहिलें पुस्तक प्रसिद्ध झालें. तें त्यांनी स्पॅनिश भाषेमध्यें लिहिलें होतें. पुस्तकाचें नांव "The way to World Peace" असें होतें व त्यामध्यें त्यांनीं अमेरिकेनें उद्घोषित केलेल्या मन्‌रो सिद्धांताची चिकित्सा केली होती.

मेक्सिकोला पोचल्यापासून कॉ. रॉय यांनीं समाजवादी मंडळींच्याविषयीं चवकशी चालवली होतीच. त्यावेळीं मेक्सिकोमध्यें एक लहानसा समाजवादी पक्ष होता. पक्ष नांवानें समाजवादी होता, पण विचारानें व कृतीनें अनार्किस्ट पंथाचा होता. त्यामुळें पाचपंचवीस सभासदांपलीकडे त्याची मजल कधींहि गेली नव्हती. पक्षामध्यें एकदोन बुद्धिजीवी सभासद होते, पण कामगारांना सगळ्याच पांढरपेशा लोकांबद्दल अविश्वास वाटत होता. त्यामुळें समाजवाद पटलेला अशी समाजामध्यें अनेक वजनदार मंडळी असतांनाहि त्यांचा त्या पक्षाला उपयोग होत नव्हता. शिवाय कायदेमंडळांतील कार्यावरहि पक्षाचा विश्वास नव्हता. या सर्व कारणांमुळें पक्षाचें समाजामध्यें मुळीं देखील वजन नव्हतें.

पक्षाशी संबंध येतांच कॉ. रॉय यांनी ही परिस्थिति बदलायला सुरवात केली. त्यांनीं सुरवातीला पक्षाची वैचारिक भूमिका शुद्ध केली. त्यानंतर कामगार-वर्गाबहिरील समाजवादी व्यक्तींची पक्षाला जोड मिळवून दिली. तसेंच पक्षानें देशापुढील आजच्या प्रश्नांचाहि कसा विचार केला पाहिजे व ते प्रश्न सोडविण्याचे प्रयत्न करूनच समाजवादाच्या दिशेनें पाऊल कसें टाकता येतें तें पक्षाला दाखवून दिलें. कॉ. रॉय यांच्या या प्रयत्नामुळें पक्षाचें स्वरूप अजिबात बदलून गेलें. लहानसा गट म्हणून जो पक्ष केवळ कसाबसा जगत होता त्याला कॉ. रॉय यांच्या या प्रयत्नामुळें समाजामध्यें एकदम महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें. या कायापालटाला कायदेशीर स्वरूप देण्यासाठीं पक्षाची पहिली परिषद् १९१८ मध्यें भरली व त्या परिषदेंत कॉ. रॉय यांची जनरल सेक्रेटरी म्हणून निवड झाली.

अध्यक्ष कॅरांझा यांचें सरकार यावेळीं अत्यंत अडचणींत होतें. नव्या राज्यघटनेनुसार तेलाच्या खाणीच्या धंद्यावर सरकारनें जे निर्बंध लादले होते ते अमेरिकन भांडवलदारांना जाचक ठरत होते. त्यामुळें आपल्या सरकारचें दडपण ते सारखेंच कॅरांझा यांच्या सरकारवर आणीत होते. आपल्या नागरिकांच्या मालमत्तेचें रक्षण करण्यासाठीं अमेरिका मेक्सिकोवर चाल करील अशीहि त्या वेळीं धास्ती वाटत होती. कॅरांझा-सरकारला अंतर्गत शत्रूहि पुष्कळ होते. या अडचणीच्या वेळीं कॉ. रॉय यांनीं कॅरांझा यांना बहुमोल मदत केली. जनतेचा पाठिंबा कसा मिळवावा हें दाखवून दिलें








आणि समाजवादी पक्षाला सरकारच्या पाठीशीं उभें केलें. सरकारनेंहि कॉ. रॉय यांच्या सल्ल्यानुसार जनतेच्या हिताच्या कांहीं गोष्टी केल्या आणि अखेर समाजवादी पक्षाचे एक पुढारी कॅले यांना कामगार-मंत्री नेमलें. याखेरीज अमेरिकेच्या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठीं दक्षिण अमेरिकेंतील साऱ्या स्वतंत्र राष्ट्रांची एकजूट उभारण्याची एक कल्पनाहि कॉ. रॉय यांनीं कॅरांझा यांना सुचविली. कल्पना कॅरांझा यांना पसंत पडली आणि तिला मूर्त स्वरूप देण्याचें कार्यहि त्यांनीं कॉ. रॉय यांच्यावरच सोपविलें.

या सर्व कार्यामुळें एक वर्षाच्या आंतच कॉ. रॉय यांना अध्यक्षांचे बिनसरकारी सल्लागार हा दर्जा प्राप्त झाला. सर्व महत्त्वाच्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रश्नांच्या बाबतींत त्यांचा सल्ला विचारला जात असे आणि विशेषकरून देशांतील सामाजिक धोरणें त्यांच्या सल्ल्यानुसार आखलीं जात असत. अशा रीतीनें मेक्सिकोमध्यें सामाजिक क्रांति घडवून आणण्याच्या उद्योगांत गुंतले असतांना कॉ. रॉय यांची रशियन राज्यक्रांतीचा एक पुढारी मायकेल बोरोडिन याच्याशीं गांठ पडली.

बोरोडिन मेक्सिकोमध्यें आला त्यावेळीं अतिशय अडचणींत होता. रशियन सरकारचा व कम्युनिस्ट इंटरनॅशनलचा प्रतिनिधि म्हणून तो आला होता. झारशाहींतील बरेचसें जडजवाहीर त्याच्याजवळ होतें व तें विकून रशियन सरकारचे जे प्रतिनिधी अमेरिकेमध्यें होते त्यांना व पश्चिम गोलार्धांत जी साम्यवादी चळवळ वाढवायची होती तिला मदत करण्याची जबाबदारी त्याच्यावर सोंपविण्यांत आली होती. बेकायदेशीर रीतीनें प्रवास करतांना तो एके ठिकाणीं पकडला गेला आणि जडजवाहिराच्या पेट्या पाठीमागें ठेवून त्याला तिथून पळावें लागलें. त्यामुळें मेक्सिको-शहरामध्यें दाखल झाला त्या वेळीं तो अगदीं निष्कांचन होता. कॉ. रॉय यांची गांठ पडली म्हणूनच अडचणींतून त्याची सुटका झाली. कॉ. रॉय यांनीं त्याला स्वत:ला व त्याच्या कुटुंबियांना पैसे पुरविले, एवढेंच नव्हे तर अमेरिकेमध्यें ठिकठिकाणीं जे रशियन सरकारचे प्रतिनिधी अडचणींत पडले होते त्यांनाहि सढळ हातानें पैशाची मदत केली. मॉस्कोनें आजवर पुष्कळांना पुष्कळ पैसा पुरविला आहे. पण मॉस्कोला व मॉस्कोच्या प्रतिनिधींना पैसा पुरविण्याचें भाग्य कॉ. रॉय यांच्यासारखें एखाद्यालाच लाभलें असेल. कॉ. रॉय यांचा बोरोडिनवर दुसराहि एक उपकार झाला आहे. जडजवाहिराच्या पेट्यांचा बरेच दिवस पत्ता लागत नव्हता. त्यामुळें मॉस्कोमध्यें बोरोडिनचे जे शत्रू होते त्यांनीं बोरोडिननें त्यांचा अपहार केला असा त्याच्यावर आरोप केला. कॉ. रॉय यांनीं खातरजमा केली म्हणूनच बोरोडिनची त्या आरोपांतून सुटका झाली. नाहींतर त्याच वेळीं बोरोडिनला देहांताची शिक्षा झाली असती !

दक्षिण अमेरिकेंतील स्वतंत्र राज्याकडून सोव्हिएट रशियाला मान्यता मिळविणें व त्या देशांत साम्यवादी चळवळ उभारणें हीं दोन कामें देखील बोरोडिनवर सोपवण्यास आलीं होतीं. हीं दोन्ही कामें पार पाडण्याच्या बाबतींतहि त्याला कॉ. रॉय यांचें अतोनात साहाय्य झालें. कॉ. रॉय यांनीं पुढाकार घेऊन व सर्व कार्यकर्त्यांची समजूत घालून समाजवादी पक्षाचें साम्यवादी पक्षांत रूपांतर केलें. रशियाबाहेर स्थापन झालेला तोच पहिला साम्यवादी पक्ष होय. कॉ. रॉय हे त्या पक्षाचे जनक होते. मेक्सिकन सरकारनें कायदेशीर रीतीनें नसली तरी प्रत्यक्षांत सोव्हिएट रशियाला जी मान्यता दिली ती देखील कॉ. रॉय यांच्या प्रयत्नामुळेंच. या मान्यतेचा त्या दिवसांत रशियाला खूप उपयोग झाला.

इतकें कार्य ज्यानें केलें व एवढी मदत ज्यानें केली त्या मनुष्याचें नांव बोरोडिननें लेनिनच्या कानावर घालावें यांत नवल नाहीं. बोरोडिननें कॉ. रॉय यांच्या पांडित्याची व कुशाग्रबुद्धीचीहि खूप










वाखाणणी केली होती. त्यामुळें लेनिननें, त्यांनीं मॉस्कोला यावें असें सुचविलें. १९२० च्या मे–जून मध्यें कम्युनिस्ट इंटरनॅशनलची दुसरी जागतिक परिषद् भरणार होती. त्या परिषदेला कॉ. रॉय यांनीं हजर रहावें असें लेनिननें त्यांना मुद्दाम आग्रहाचें आमंत्रण दिलें.

आमंत्रण मिळाल्यानंतर कॉ. रॉय यांच्यापुढें मोठा पेंच पडला. मॉस्कोला यावयाचें म्हणजे मेक्सिको-मधील काम अर्धवट टाकायला हवें. मेक्सिकोमधील काम वाढून त्याचा संबंध दक्षिण अमेरिकेभर प्रसार होईल अशीं चिन्हें दिसत होतीं. शिवाय त्या देशावर आणि देशांतील लोकांवर कॉ. रॉय यांचें प्रेम बसलें होतें. त्यामुळें तो देश सोडून जाणें त्यांच्या जिवावर आलें होतें. पण उलट पक्षीं मॉस्कोला गेल्यानंतर मोठ्या क्षेत्रांत काम करण्याची संधी त्यांना लाभणार होती. सबंध आशियाखंडभर सामाजिक क्रांतीची लाट पसरवतां येईल असें विलोभनीय चित्र बोरोडिननें त्यांच्या डोळ्यापुढें उभें केलें. त्यानेंहि जेव्हां त्यांच्या मनाचा निश्चय होईना, तेव्हां बोरोडिन त्यांना म्हणाला: "आपल्या स्वत:च्या देशालाहि तूं विसरतां कामा नयेस. स्वदेशाच्या बाबतींतहि तुझीं कांहीं कर्तव्यें आहेत. आणि मॉस्को वाटेवर आहे. तिथून तुला हिंदुस्थानांत जातां येईल आणि तिथें सामाजिक क्रांति घडवून आणतां येईल." बोरोडिनच्या या उद्गारानंतर कॉ. रॉय यांना उत्तर उरलें नाहीं आणि त्यांनीं मोठ्या जड अंत:-करणानें मॉस्कोला जाण्याचें ठरविलें.

मॉस्कोला जाण्यासाठीं कॉ. रॉय नोव्हेंबर १९१९ मध्यें निघाले. सरळ मार्ग म्हणजे न्यू यॉर्कवरून होता. पण कॉ. रॉय यांना तिकडे जाणें शक्य नव्हतें. तसेंच ब्रिटिश हुकमतीखालील प्रदेश देखील त्यांना टाळावयाचे होते. कारण हिंदुस्थान सोडून चार वर्षें लोटलीं तरी ब्रिटिश हेर त्यांच्या मागावर होतेच. मेक्सिकोमध्येंहि त्यांना पळवून नेण्याचे एकदोन प्रयत्न झालें. त्यामुळें सरळ रस्त्यानें व उघड नांवानें त्यांना प्रवास करणें शक्य नव्हतें. यावेळी अध्यक्ष कॅरांझा यांचें त्यांच्यावरील प्रेम उपयोगी पडलें. कॅरांझा यानीं स्वत:चे खास प्रतिनिधि म्हणून त्यांची नेमणूक केली आणि राजदूतांच्या सर्व खास सवलती त्यांना मिळतील अशी सोय केली. त्यामुळें कॉ. रॉय यांचा प्रवास निर्विघ्नपणें पार पडला. मेक्सिकोंतून ते प्रथम स्पेनमध्यें गेले. स्पेनमधून इटली व इटली-तून स्वित्झर्लंडमार्गें ते बर्लिनला येऊन दाखल झाले. तीनचार वर्षांपूर्वीं कांहीं वेगळ्याच कारणा-साठीं त्यांना बर्लिनला जावयाचें होतें. त्यावेळीं कैसर-च्या ज्या प्रतिनिधीला त्यांना भेटावयाचें होतें त्यांचा आता युद्धानंतर मागमूसहि राहिला नव्हता. पूर्वीं बर्लिन हेंच त्यांचें उद्दिष्ट होतें. आतां बर्लिन हें केवळ वाटेवरील मुक्कामाचें ठिकाण बनलें होतें. क्रांति हें अद्याप देखील त्यांच्या जीवनाचें ध्येय होतें. पण ध्येयाची कल्पना जास्त स्पष्ट झाल्याकारणा-नें आणि त्या कल्पनेनुसार साधनें बदलल्याकारणानें आज बर्लिनला न थांबतां त्यांना पुढें मॉस्कोला जावयाचें होतें. कॉ. रॉय यांचें वैशिष्ट्य हें कीं ते जसें बर्लिनला थांबले नाहींत तसें ते मॉस्कोलाहि कायमचे थांबले नाहींत. त्यांचा प्रवास अनंत होता. आणि त्या प्रवासामध्यें त्यांना मॉस्कोच्याहि पली-कडे जावें लागलें!

या अनंत प्रवासाची शिदोरी ते जन्मभर गोळा करीत होते. पण त्या शिदोरीचा मोठा भाग त्यांनीं मेक्सिकोमधील आपल्या अडीच वर्षांच्या वास्त-व्यांत संपादन केला. म्हणूनच मेक्सिकोमध्ये घाल-विलेल्या या अडीच वर्षांच्या त्यांच्या जीवनेतिहासास कमालीचें महत्त्व आहे. त्यांनीं त्यांना नवीन राजकीय दृष्टि दिली. एवढेंच नव्हे, तर सर्वांगीण मानव्याचें दर्शन घडवून त्या मानव्याच्या पूर्तीसाठीं अविरत झगडण्याची स्फूर्ति दिली.








श्री. फिलिप स्प्रॅट : अनु०– श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# मार्क्सवादाच्या पुढें--!

मार्क्सवादाचा सिद्धान्त असा आहे कीं, संस्कृति ( Civilisation ) जगांत एकच आहे आणि भारत, चीन, इस्लाम, खिश्चनत्व इत्यादि ज्या संस्कृती समान दर्जाच्या म्हणून आपण समजतों त्यांत विकासक्रम आहे व एका संस्कृतिमालेंतीलच ते भाग होत; खिश्चनत्व ही त्या मालेंतील सर्वांत प्रगत अवस्था आहे. यावरून असें निघतें कीं, भारत चीन इत्यादिकांनीं एकतर यूरोपचें अनुकरण तरी करावें किंवा अवनत अवस्थेंत कुचमत पडावें !

मार्क्सवादाचा आणखी एक सिद्धान्त असा आहे कीं, सामाजिक प्रगतीची प्रक्रिया सुरूं व्हावयास मौलिक परिवर्तन सुरूं व्हावें लागतें. विशेषतः सांस्कृतिक 'डोलारा' ('Superstructure') म्हणून ज्यास म्हणतात तोहि बदलावा लागतो. उदाहरणार्थ, सगळे मार्क्सवादी असें मानतात कीं, आधुनिक जगाला धर्म निरुपयोगी झाला आहे आणि शक्य तितक्या लवकर तो नष्ट व्हावा अशी वेळ येऊन ठेपली आहे. जगाबद्दलचें धर्मविरोधी तत्त्वज्ञान भौतिकवाद होय. तोच आतां खरा म्हणून स्वीकारण्याची वेळ आहे. मार्क्सवादाच्या दृष्टीनें भौतिकवादहि सापेक्षतयाच खरा आहे.

आर्थिक व सामाजिक अधिष्ठानाच्या योगानें सांस्कृतिक डोलारा नियंत्रित होत असतो, या सिद्धांतावरूनच सापेक्षतावाद सिद्ध होतो. त्याप्रमाणें असें मानावें लागतें कीं, विज्ञान व तत्त्वज्ञान यांतील विचार खरे किंवा खोटे आहेत, असें म्हणतां येत नाहीं. ते विशिष्ट सामाजिकतेस सोईचे आहेत कीं नाहींत, एवढेंच पाहावयाचें असतें. यावरून विरोधविकासवाद आणखी असें सुचवितो कीं, राजकीय पक्षांना तात्त्विक व वैज्ञानिक वादांचा निर्णय करण्याचा अधिकार आहे, आणि सर्व प्रकारचे वाद वस्तुतः राजकीयच असतात.

## मार्क्सवादांतील दोन प्रवृत्ती

मार्क्सवाद दोन विरुद्ध टोकांच्या स्वरूपांत अस्तित्वांत दिसतो आणि या दोन प्रकारांचीं अवांतर विविध संमिश्रणेंहि आढळतात. एका टोकाला मार्क्सवाद हें एक शुद्ध तत्त्वज्ञान म्हणून साधारणपणें दिसून येतें. हें तत्त्वज्ञान विद्यापीठांस शोभणारी अलिप्त वृत्ति कमीजास्त प्रमाणांत ठेवून सामाजिक परिवर्तनाचा अभ्यास करतें. येथेंहि एवढें मात्र ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, पुरोगामितेच्या कल्पनेला असलेली आपली सहानुभूति मार्क्सवादी लोक कधींहि झाकूं शकत नाहींत.

ही पुरोगामिता आणि आधुनिक युगाच्या प्रभातकालापासून पाश्चात्त्यांच्यामध्यें सर्वत्र आढळून येणारी पुरोगामितेची कल्पना यांत खूप साम्य आहे. म्हणजे असें कीं, भौतिक समृद्धि, व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक व आर्थिक समता, राजकीय लोकशाही इत्यादिकांच्या दिशेनें प्रगति म्हणजे पुरोगामिता होय. ही अशा दिशांनीं होणारी प्रगति 'नैसर्गिक' पद्धतीनें होते, असाहि या तत्त्वज्ञानाचा भावार्थ आहे. 'नैसर्गिक' म्हणजे 'अनिवार्य' असेंच नाहीं.

आतां दुसऱ्या विरुद्ध टोकाला जो मार्क्सवादाचा प्रकार दिसतो, त्यांत केवळ व्यावहारिक राजकारण येतें. जोंपर्यंत आपण असें समजतों कीं, मार्क्सवादी राजकारणापासून वस्तुतः लोकशाहीचें तत्त्व अलग करतां येत नाहीं, तोंपर्यंत शुद्ध तत्त्वज्ञान व व्यवहारी राजकारण हीं दोन परस्परविरोधी टोकाचीं आहेत असें लक्षांत येत नाहीं. क्रांतीची कल्पना धरून राजकारण पाहिलें म्हणजे दोन विरुद्ध टोकें उघडकीस येतात.

लेनिनच्या उदयानंतर, वाटेल त्या प्रकारानें राज्य बळकावण्याचें एक तंत्र म्हणून मार्क्सवाद पुढें आला. स्टालिनला महत्त्व आल्यानंतर याचीच तार्किक परिणति झाली. मार्क्सवादाची शुद्ध तात्त्विक बाजू व्यावहारिक व संधिसाधु राजकारणाचें अंग बनली. पूर्वींचे मार्क्सवादी म्हणत होते कीं मार्क्सवादी तत्त्वज्ञान ज्या पुरोगामितेचा पुरस्कार करतें, ती पुरोगामिता म्हणजे

उदारमतवादाचें स्थिरावलेलें व सफल झालेलें स्वरूप होय. स्टालिनवाद या गोष्टीची उपेक्षा करूं लागला आणि कांहीं थोडीं पावलें टाकल्यानंतर उदार व मानव्य-प्रधान अशा या पूर्वपरंपरेचा तो कडवा शत्रु बनला.

जुने मार्क्सवादी स्वतःस समाजाचे नागरिक समजत. लेनिनवादी व स्टालिनवादी पक्के समाज-विरोधी बनून समाजाचे अंतक बनले, समाजाच्या विनाशाला त्यांनीं वाहून घेतलें.

जेव्हां एम्. एन्. रॉय मार्क्सवाद शिकले तेव्हां रशियन व जर्मन कम्युनिस्टांमध्यें ज्यांनीं जुनी मार्क्स-वादी परंपरा राखली होती, अशीं पुष्कळ माणसें होतीं. ते स्टालिनवादी नव्हते. रॉय यांनीं ही पूर्वपरंपरा आत्मसात् केली होती. वाटेल त्या प्रकारानें राज्य बळ-कावण्याचें एक तंत्र म्हणून जो मार्क्सवाद पुढें आला, त्यामध्यें रॉय यांना विशेष गंमत कधींच वाटली नाहीं. अगदीं सामान्यपणें मार्क्सवादाच्या चौकटींत बसणाऱ्या राजकीय व आर्थिक परिवर्तनाचे जे ढोबळ परिणाम घडतात, त्यांच्यावर रॉय यांची मदार होती.

## निर्वसाहतीकरण

लेनिनशीं रॉयचा जो पहिलाच स्नेहपूर्ण मतभेद झाला, तेव्हांपासूनच हा विशेष उघडकीस येतो. लेनिन-ला भांडवलशाही जग नष्ट कसें करावें, याचीच मुख्यतः काळजी होती. त्याकरितांच त्यानें आपली अशी समजूत करून घेतली होती कीं, हिंदुस्थानांतील भांडवलदार राष्ट्रवादी बंडाचा ब्रिटनविरोधी उठाव करूं शकेल, निदान तशा तऱ्हेच्या कारस्थानांत त्याला ओढतां येईल. रॉय यांचें निराळेंच मत होतें. त्यांनीं आपलें मत वस्तुस्थितीचें यथार्थ ज्ञान करून बनविलें होतें. ब्रिटन-च्या विनाशापेक्षां भारताच्या प्रगतीची काळजी त्यांना अधिक होती. रॉयनीं लेनिनला सांगितलें कीं, भारतीय भांडवलदार राष्ट्रवादी बंडाचा उठाव कधींच करणार नाहीं, तो खरीखुरी सत्ता क्रमाक्रमानें हस्तगत करील. 'निर्वसाहतीकरणा' चा मुद्दा रॉयचें एक पाखंड म्हणून निंदेचा विषय झाला होता. या पाखंडाचा हाच अभि-प्राय होता. इतिहासानें रॉयचें म्हणणें खरें करून दाखविलें आहे.

रॉय यांच्या या दूरदर्शीत्वांतूनच घटनासमितीची कल्पना निघाली. हिंदी राष्ट्रवाद्यांच्या पुढें ही कल्पना मांडून त्यांनीं असें सांगितलें होतें कीं, यामुळें आपले उद्देश ब्रिटनला नीट समजतील आणि घटना-समितीच्या निर्मितीनें ब्रिटनवर जास्तींत जास्त दडपण पडेल. रॉयना माहीत होतें कीं, ब्रिटनमधील उदार-मतवाद्यांना घटनासमितीस विरोध करणें फार जड जाईल.

इ. स. १९२८ सालीं रशियाचें सत्तास्पर्धेचें राज-कारण फारच वाढलें; स्टालिन डाव्या बाजूला खूपच झुकला. सत्ता बळकावण्याच्या तंत्राचें माहात्म्य त्यानें अधिक वाढविलें. रॉयनें त्याला विरोध केला. रॉयचा मार्क्सवाद व्यापक होता. राज्य बळकावण्याचें तंत्र हें फॅसिस्टांत मान्यता पावलेलें साधन होय, हें ध्यानांत घेऊन या डोळ्यासमोर घडणाऱ्या राजकारणी घडा-मोडींचा इत्यर्थ लक्षांत घेऊनच रॉयनीं स्टालिनला विरोध केला. रॉयला बहिष्कृत व्हावें लागलें.

इ. स. १९३४ सालीं स्टालिननें धोरण बदललें. त्यानें माघार घेतली. निदान तोंडदेखलेपणानें तरी 'संयुक्त आघाडीचें' धोरण अंगीकारून उदारमतवादी परंपरेचें मूल्य मान्य केलें. हें पाहून रॉय यांनीं स्टालिनला पाठिंबा दिला. स्टालिनबद्दल रॉयना आदर होता; म्हणून त्या हुकूमशहाला त्यांनीं आपलें आशास्थान बनविलें होतें. दुसऱ्या महायुद्धानंतर हा हुकूमशहा आपल्या पूर्वपदावर येईपर्यंतच ही आशा टिकली.

इ. स. १९३० सालीं हिंदुस्थानांत येण्याच्या पूर्वी रॉय यांचीं पुष्कळ वर्षें मुख्यतः जर्मनींत गेलीं. त्यांनीं नाझी चळवळीच्या प्राथमिक अवस्था प्रत्यक्ष अवलोकिल्या होत्या; हिट्लरचीहि भेट झाली होती; हिट्लरचा व त्यांचा एकदां एकत्र खाना झाला होता; तेव्हां घडलेली एक चमत्कारिक गोष्ट ते कित्येक वेळां सांगत असत.

## हिंदी राष्ट्रवाद्यांबद्दल साशंकता

सत्ताप्राप्तीनंतर नाझी आणि कम्युनिस्ट चळवळी एकाच दिशेनें वाहूं लागल्या. पूर्वी जेव्हां त्या परस्पर विरोधी गतीनें जात होत्या, तेव्हां त्या फार निराळ्या दिसत होत्या. बरवर पाहिलें तर कम्युनिस्ट चळवळ राजकीय प्रचारावर भर देते, असें दिसतें. नाझी लोक तर प्रथमपासूनच विरोधी लोकांचा कांटा काढण्या-करितां मारामाऱ्या व खून यांनाच चटावले होते. त्यांनीं या गोष्टी मोठ्या प्रमाणांत केल्या. या गोष्टी न झाकतां त्या गोष्टींबाबत ते बढाया मारीत.








रॉय यांना याचा फार वीट आला. यामुळें तर राष्ट्रवाद हा प्रतिगामी आहे, या मार्क्सवादाच्या सिद्धान्तावरील त्यांची श्रद्धा दृढावली. गांधींचें अनुयायित्व पत्करलेल्या राष्ट्रवादाबद्दल सुद्धां ते साशंक झाले. त्यांना असें वाटूं लागलें कीं, खादीवाले देखील ब्राउन् शर्टवाल्यांसारखे बनण्याची शक्यता आहे. हिट्लरच्या विरोधी सुरूं झालेलें युद्ध रॉयना पवित्र धर्मयुद्ध वाटत होतें. तेव्हां कॉंग्रेसनें तटस्थतेचेंच धोरण पत्करल्यामुळें गांधीवाद व नाझीवाद यांच्यांतल्या वैचारिक सहानुभूतीचा तो परिणाम असावा, असेंहि त्यांना वाटलें.

दुसरी गोष्ट अशी कीं, युद्धकालीं ब्रिटनमध्यें जे सामाजिक बदल होऊं लागले त्यांचाहि रॉयच्या मनावर अनुकूल परिणाम झाला. त्यावेळीं हिंदुस्थानांत जे ब्रिटिश अधिकारी त्यांना भेटले त्या अधिकाऱ्यांच्या उदारमतवादी दृष्टिकोणाकडे पाहून तर ते विस्मितच झाले. रॉय यांना युद्धाच्या अखेरच्या कालांत ब्रिटन हिंदी राष्ट्रवादापेक्षां अधिक पुरोगामी वाटूं लागलें. नेहरू किंवा जिना यांच्या हातीं ॲट्लीनें हिंदुस्थान सोंपविला; यापेक्षां ॲट्लीला अधिक चांगला पुरोगामी मार्ग सांपडला नाहीं, याबद्दल रॉय यांना वाईट वाटत होतें.

परंतु अमेरिकेबद्दल रॉयचा ग्रह वाईट होता. रॉय १९१६ च्या सुमारास अमेरिकेंत होते. तेव्हां विल्सननें निवडणुकींतील आपलें आश्वासन मोडून युद्धांत शिरण्याची तयारी चालविली होती. या लहानशा मुक्कामांत त्यांना जें प्रत्यक्ष निरीक्षण करावयास मिळालें त्यापेक्षां मार्क्सवादी पांडित्याचा परिणाम होऊन अमेरिकेबद्दल त्यांचें वाईट मत बनलें. मार्क्सवादास धरून असें म्हटलें जातें कीं भांडवलशाही हें युद्धाचें कारण होय. या कल्पनेस अनुसरून रशियन राष्ट्रवादी हितसंबंधाच्या दृष्टिकोणांतून मार्क्सवादी बऱ्या प्रस्थांनीं रॉयचा असा ग्रह करून दिला होता कीं, हिट्लरच्या जर्मनीप्रमाणें जागतिक प्रतिगामी शक्तींचें केंद्र अमेरिका बनली आहे किंवा बनणारच !

रुझ्वेल्ट पंडित नव्हता हें दुर्दैव म्हणायला पाहिजे. तो अनुभवानें चालणारा साधा अमेरिकन होता. त्यामुळें रशियन व जर्मन डाव्या गटाच्या बुद्धिवादी पांडित्यांत मुरलेल्या व सुशिक्षित अशा रॉयच्या मनावर त्याचा प्रभाव पडूं शकला नाहीं. अमेरिकेबद्दलचा रॉयचा विरोधी ग्रह कधींहि बदलला नाहीं. अगदीं अलीकडे मात्र त्यांना असें वाटूं लागलें होतें कीं, रशियन गट व अमेरिकन गट या दोघांपैकीं अमेरिकन गटाच्या हातांत विश्वप्रभुत्व गेलें तर त्यांत कमी अनर्थ होईल.

## कम्युनिझमशीं संबंधविच्छेद

स्टालिनच्या डाव्या राजकारणाचें संकट कशा प्रकारचें आहे, हें ध्यानांत आल्यावर युद्धाच्या समाप्तीनंतर रॉय यांनीं कम्युनिझम्च्या ध्येयवादाशीं असलेला संबंध तोडून टाकला. या वेळीं त्यांना स्टालिनच्या एका बोलण्याची आठवण होऊं लागली. एकदा स्टालिन, रॉय व इटालिअन कम्युनिस्ट पुढारी तोग्लेत्ति ( Togliatti ) हे तिघेच एकत्र असतांना स्टालिननें म्हटलें कीं, सगळेच कम्युनिस्ट पक्ष निरुपयोगी आहेत; कम्युनिझम्चें विश्वराज्य स्थापन करावयास केवळ लाल लष्कर हें साधनच समर्थ होईल !

हा सिद्धांत स्टालिनला हुबेहुब शोभणारा आहे. राज्य किंवा सत्ता वाटेल त्या साधनानें बळकावण्याची कल्पना अंमलांत आणणारा मार्क्सवादी नेता स्टालिनच होय. रॉयनीं असें सिद्ध केलें आहे कीं, रशिया युरोपपेक्षां फार मागासलेला देश आहे; कम्युनिझमचा ३० वर्षे प्रयोग झाल्यानंतरहि तो तसाच मागासलेला राहिला आहे म्हणून रशियानें युरोपवर अधिराज्य स्थापलें तर युरोपची अधिक पिछेहाट होईल.

परंतु याच सुमारास रॉय यांचा स्वतःच्या उदारमतानुसारी मार्क्सवादावरीलहि विश्वास ढासळूं लागला. आर्थिक-सामाजिक अधिष्ठानाच्या अधीन सांस्कृतिक महालाचें अस्तित्व असतें या सिद्धान्ताचें किंवा मार्क्सनें अधिक सूक्ष्मार्थी पदांनीं सांगितलेला 'वस्तूच्या अधीन जाणीव असते' या सिद्धान्ताचें त्यांनीं खंडन केलं. त्यांनीं सांगितलें कीं, मानवी मन स्वतंत्र व सर्जनशील असतें. ही नवी अंतर्दृष्टि मार्क्सच्या ' मनुष्य हा मूळ आहे ' या अर्धवट विसरलेल्या परिभाषेनें व्यक्त करतां येते. या परिवर्तनाचा परिणाम असा झाला. " मनुष्यास सत्याची प्राप्ति होऊं शकत नाहीं, आणि म्हणून सत्याची मातबरी वाटण्याचें कारण नाहीं, प्रत्यक्ष व्यवहारांत काय फळ मिळतें यालाच महत्त्व आहे," अशा प्रकारचा मार्क्सचा सापेक्षतावाद रॉयनीं अजीबात टाकला. ज्यांच्या योगानें जीवन सार्थ होतें, व्यवहारांत ज्यांची पूर्ण गरज आहे, अशा महान्








अंतिम ध्येयांपैकीं सत्य हें एक आहे, असें म्हणून रॉय यांनीं सत्यावर पूर्ण भर दिला.

या परिवर्तनानें दुसऱ्या एका निर्णयाला रॉय येऊन पोहोंचले. तो असा : मानवी समाजाच्या भविष्यकालीन विकासाचा जो आराखडा मार्क्सवादानें सांगितला त्या-पेक्षां दुसऱ्याहि अन्य मार्गांनीं व प्रकारांनीं सामाजिक विकास होऊं शकतो. उदाहरणार्थ, हिंदुस्थानपुढें मार्क्स-वादाप्रमाणें दोनच मार्ग मोकळे आहेत : एक तर भांड-वलशाहीचा भयंकर परंतु धोपट मार्ग. किंवा दुसरा, रशियांत अवेळीं घडलेल्या क्रांतीचा मार्ग. ही तिरस्कर-णीय क्रांति जगावर लादण्याची रशियाची इच्छा आहे. हिंदुस्थान, हे दोन्ही प्रकार टाळून, प्रगति करूं शकेल. रॉयनीं मार्क्सच्या नियतीपासून स्वतःची सुटका करून घेतली; लेनिनच्यापूर्वी प्रसिद्ध असलेल्या मार्क्सवादा-ची उदार तत्त्वांनीं पूर्ण असलेली अशी पार्श्वभूमि ध्यानांत धरली; आणि अशी योजना सांगितली कीं भारतीय समाजाची नवरचना केली तर ती उदारमत-वादी तत्त्वांच्या परंपरेंतील मूल्यांचें रक्षण करून उच्च-तर भौतिक जीवनमान व समता निर्माण करूं शकेल.

मार्क्सवादी परिभाषेप्रमाणें हिंदुस्थानांत भांडवल-दारी लोकशाही तांत्रिक रूपानें आली असली तरी सामाजिक दृष्टीनें भारतीय मन मध्ययुगांतच वावरत आहे. भांडवलशाहींत ज्या प्रकारची लोकशाही क्रांति होते तिचीं सुलक्षणें प्रकट होतील असा बदल हिंदु-स्थानांत व्हावयास पाहिजे. त्यामुळेंच भारताची खरी सुधारणा होईल. इ. स. १९१७ सालापर्यंत रशिया मध्ययुगांतच होता. लेनिननें भांडवलदारींतील लोक-शाही क्रांति व समाजवादी क्रांति या दोहोंचा संयोग घडवून आणण्याचा प्रयत्न केल्यामुळें भांडवलदारी लोकशाही क्रांतींतील मानवी प्रगतीचीं शुद्ध मूल्यें गमवावीं लागलीं. ही प्रगतीचीं शुद्ध मूल्यें भारतास संपादन करतां येतील. परंतु इ. स. १९१७ सालचा रशिया किंवा इ. स. १७९३ सालचा फ्रान्स ज्या दुदवाच्या हातीं सांपडला त्या दुर्दैवाला शरण जाण्याचें कारण पडणार नाहीं, असें रॉय यांना वाटत होतें.

## मनुष्य स्वतंत्र आहे

रॉय यांनीं भारताचा जो निराळा मार्ग ठरविला त्यांत मार्क्सच्या नियतिवादाच्या पोलादी चौकटींतील योजने-चा संबंध तोडून टाकला. एवढेंच नव्हें तर त्याप्रमाणें या मार्गानें जगालाहि अधिक उन्नतीचा मार्ग सांपडेल, असेंहि त्यांनीं आश्वासन दिलें. भांडवलदारी लोकशाही-क्रांतीनंतरच हा नवा मार्ग खुला होतो व त्यांत तत्त्वतः धर्मसंस्थेला स्थान राहात नाहीं. मार्क्सवादांतील धर्मसंस्थाविरोधाची कल्पना रॉय यांनीं शेवटपर्यंत सोडली नव्हती.

राष्ट्रवादाशीं असलेला रॉयचा विरोध मार्क्सवादाचेंच फळ होतें. तो शेवटपर्यंत कायम राहिला. रॉयना जें अगदीं निराळ्या प्रकारचें शिक्षण मिळालें त्याचीच ही विकृति होय, असें म्हणतां येत नाहीं. जगांतील दोन ( फ्रेंच व रशियन ) राज्यक्रांत्या डागाळल्या गेल्या. त्याचें मुख्य कारण, राष्ट्रवादाचें संरक्षण व वाढ त्या क्रांत्यांनीं केली, हें होय. वस्तुतः त्या क्रान्त्या विश्वव्यापी तत्त्वांच्या नांवानें सुरूं झाल्या होत्या. वर्तमानकालांतहि युद्धोत्तर युरोपमध्यें विलक्षण सामाजिक प्रगति घडून येऊं शकेल इतकी अनुकूल परिस्थिति तयार झाली होती. परंतु संकुचित राष्ट्रवादामुळेंच मुख्यतः अशा परि-स्थितीचा फायदा मिळूं शकला नाहीं. मुळांत कम्यु-निझम् राष्ट्रवादाच्या विरोधी होता. परंतु हल्लीं कम्यु-निझमनें ढोंगीपणानें राष्ट्रवादाचा अंगीकार केला आहे. राष्ट्रवादी लढायांच्या ललकाऱ्या घेतवून कम्युनिझमच्या छापेखालीं आशियांतलीं अनेक राष्ट्रें येऊं लागलीं आहेत. रॉय यांचें असें म्हणणें आहे कीं, ह्या राष्ट्रवाद-रूपी चिकटलेल्या पूर्वग्रहाच्या तावडींतून मनुष्य बाहेर पडूं शकतो, असें हिंदुस्थान दाखवूं शकेल.

"आपण प्रगतिपथांत सारखें पुढें जात राहण्याच्या योगा-नें आपल्याशीं मत्सरानें स्पर्धा करणाऱ्याची बाधा आप-णांस होऊं शकत नाहीं" हें मार्क्सवादी तत्त्व, राष्ट्रवादाची माणसांना गरज नाहीं, अशा निर्णयाच्या मुळाशीं आहे. हें तत्त्व स्पष्ट रीतीनें क्वचितच सांगितलें जातें. परंतु हें तत्त्व खरें नाहीं. मात्र तें मार्क्सवाद्याला वाद-विवादांत वापरण्याचा मोह उत्पन्न करील असें आहे. सामाजिक व्यवहारांत युद्धाला स्थान असावें, ही गोष्ट अणुस्फोटाचा शोध लागल्यानंतरच्या काळांतील समाज-स्थितींत अत्यंत संशयास्पद झाली आहे. अशा वेळीं राष्ट्रवादाची गरज नाहीं हें मोहक तत्त्व उपयोगी पडतें. या मुद्द्यावर मार्क्सवादी रॉय शुद्ध भूमिकेवरूनच गांधी-वाद्यांशीं हस्तांदोलन करीत असतांना दिसतात.

मार्क्सवाद नेहमीं राजकारणपरायणच दिसतो.






त्याचें हें स्वरूप लेनिनच्या व स्टालीनच्या राज्यसत्ता बळकावण्याच्या धोरणांत अधिक प्रकट होतें व लोकशाहीस प्राधान्य देणाऱ्या मार्क्सवादांत कमी प्रकट होतें. रॉय हे या दुसऱ्या प्रकारालाच महत्त्व देत होते. जीवनाच्या अखेरच्या वर्षांत तर ते अधिक पुढें गेले. त्यांनीं राजकारणाचा त्याग केला. आपल्या मित्रांना पक्षविसर्जनाची कल्पना त्यांनीं पटविली आणि विचार-प्रसाराच्या कामालाच वाहून घेण्याचा उपदेश दिला.

रॉयची ही अखेरची कृति त्यांच्या मनुष्यप्राण्यावरील श्रद्धेची खूण आहे. राजकीय पक्षांचें अस्तित्व असें सूचित करतें की, माणसांना योग्य मार्गावर वळवून आणण्याकरितां त्यांना भावनांनीं विवश केलें पाहिजे आणि फायद्याची लालूच दाखविली पाहिजे. हुकूमशाही पक्षांचें अस्तित्व असें ध्वनित करतें कीं, माणसांना योग्य मार्गावर जबरदस्तीनेंच आणणें शक्य आहे. पक्षनिष्ठ राजकारणाच्या त्यागाच्या मुळाशीं एक श्रेष्ठ मानवनिष्ठ श्रद्धा आहे : माणसें स्वतःच्या विवेकानें मार्ग निवडूं शकतात व त्या मार्गानें क्रमणा करूं शकतात. त्यांना बुद्धिद्वारा प्राप्त झालेला समान मानवी हिताचा साक्षात्कार आणि तदनुरूप निष्ठा सन्मार्ग शोधण्यास प्रवृत्त करते, असा त्या श्रद्धेचा अर्थ आहे.

अशा प्रकारें रॉय यांचे विचार जरी साधारणपणें मार्क्सवादी दिसत असले तरी रॉय यांची विकास-पद्धतीसंबंधीं, इतिहाससंबंधीं व मानवी भवितव्यासंबंधीं असलेली विचारसरणी प्रथमपासूनच मार्क्सहून किंचित् भिन्न होती व ती पायरीपायरीनें मार्क्सपासून फार दूर गेली. बोल्शेविक लोकांच्या मार्क्सवादापासून तर ती आणखी अधिक दूर गेली आहे. रॉय यांचे विचार फार व्यापक होत गेले. ही व्यापकता गतिशीलतेमध्यें विसर्जन पावणार काय ? हें अजून कळावयाचें आहे.

---

## द्रष्टा आणि राजकारणी

श्री. मानवेन्द्रनाथ रॉय यांच्या मृत्यूनंतर अनेकांनीं इतका अव्वल दर्जाचा बुद्धिवादी हिंदी राजकारणांत हतप्रभ कां ठरावा ह्याबद्दल सखेदाश्चर्य व्यक्त केलें आहे. परंतु लोकप्रिय राजकीय नेता होण्याचा रॉय यांनीं स्वतः प्रयत्न केला कीं नाहीं, शंकाच आहे. लोकप्रिय नेता होण्यास लागणारे विशिष्ट गुण (आणि अवगुण) रॉय यांच्यामध्यें होते कीं नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर ज्यांना ते उपेक्षित ठरले असें वाटतें त्यांनीं दिलें पाहिजे. एफ्. एस्. ऑलिव्हर ( १८६४ ते १९३४ ) ह्यांच्या 'The Endless Adventure' ह्या पुस्तकांत राजकारणी लोकांच्या स्तुतिपर ('In Praise of Politicians') एक प्रकरण आहे. त्यामधील पुढील उतारा राजकारणी व द्रष्टा ह्यांमधील भेद स्पष्ट करतो. त्यामुळें रॉय राजकारणांत यशस्वी कां ठरले नाहींत आणि तरीहि त्यांचें बरोबर स्थान कोणतें हें लक्षांत येण्यास मदत होईल. ऑलिव्हर म्हणतात : "दुर्दैवानें राजकारणांत ढोंगधत्तुऱ्यांना खूप पीक आलेलें असतें. आणि ज्या कोणा राजकारणी मुत्सद्द्याला यशस्वी व्हावयाचें असेल त्यानें या ढोंगधत्तुऱ्यांना लवून कुर्निसात केलाच पाहिजे ! असा कुर्निसात करणें ज्यांच्या जिवावर येतें अशांपैकीं तुम्ही जर असाल तर तुम्हीं राजकारणापासून अगदीं दूर राहणेंच बरें. मग राजकारणी पुरुषाऐवजीं एक द्रष्टा ( prophet ) म्हणून तुम्हीं आपलें आसन मांडावें. द्रष्टा म्हणून तुम्ही जी कांहीं भविष्यवाणी पेरून ठेवाल, तिला कदाचित् भविष्यकाळांत फळें येणें शक्य आहे. परंतु राजकारणी म्हणून तुम्ही निष्प्रभच ठराल. कोणताहि काळ जरी घेतला तरी त्या काळीं तुमच्या देशबांधवांपैकीं बहुतेकांची श्रद्धा भाविकपणानें व निष्ठेनें निरनिराळ्या गोष्टींना वाहिलेली असते. त्यापैकीं कांहीं गोष्टी श्रद्धा ठेवण्यास कदाचित् योग्य असतील. पण इतर तर नुसते खुळचट भ्रम असतात आणि त्यांवर लोक भाबडेपणानें विश्वास ठेवीत असतात. जर कोणी एखादा ज्याचा या खुळचटपणावर विश्वास नसेल असा येऊन लोकांचें नेतृत्व करूं म्हणेल तर त्याचें लोक कदापि ऐकून घेणार नाहींत ! ज्या विभूतींचें वा ध्येयांचें अमक्या वेळीं स्तोम माजलें आहे, त्या विभूतींकडे व ध्येयांकडे तुम्हीं जर जीभ बाहेर काढून आपली चीड व्यक्त केलीत, तर आटपलेंच ! तुम्हांला बेकार म्हणून हिंडावें लागेल ! म्हणून प्रचलित लोकमताची जशी अपेक्षा असेल त्या अपेक्षेनुसार जो स्वतःच्या मनाविरुद्ध गुडघे वांकवून कुर्निसात करील किंवा आनंदानें टाळ्या वाजवील तोच खरा शहाणा मुत्सद्दी होय."

— अ. के. भागवत








प्रा. गोवर्धन पारीख

# रशियन राज्यक्रांति



एम्. एन्. रॉय – इंटरनॅशनल अग्रेरियन इन्स्टिट्यूट, मास्को, पुढें १९२६ सालीं भाषण करतांना

भाई मानवेंद्रनाथ रॉय यांचा रशियन क्रांतीशीं प्रथम सुमारें दहा वर्षें महत्त्वाचा प्रत्यक्ष संबंध होता आणि एकंदरींत सुमारें तीस वर्षें जिव्हाळ्याचा वैचारिक संबंध राहिला. १९१९–२० मध्यें मेक्सिकोहून मॉस्कोंत आल्यापासून १९३० मध्यें भारताला परत येण्यासाठीं निघेपर्यंत त्या क्रांतीच्या प्रमुख धुरीणांमध्यें त्यांची गणना होत होती. आणि त्यानंतर सुमारें १९४६–४७ पर्यंत जगांतील हाताच्या बोटावर मोजतां येण्याजोग्या













अनुक्रमणिका

तिच्या श्रेष्ठ पुरस्कर्त्यांपैकीं ते एक होते. या क्रांतीशीं त्यांचा प्रत्यक्ष संघटनात्मक संबंध सहाव्या जागतिक ( कम्युनिस्ट ) कॉंग्रेसनंतर संपला; तथापि सातव्या कॉंग्रेसनें पर्यायानें त्यांचेंच वैचारिक नेतृत्व मान्य केलें. यानंतर सुमारें वीस वर्षें त्यांनीं केलेला रशियन क्रांतीचा पुरस्कार हा वस्तुनिष्ठतेचें एक अपूर्व व असामान्य उदाहरण होय. " सामान्य माणसें जिच्यामुळें मोठीं आहेत असा आभास निर्माण होतो आणि मोठीं माणसें भलतीकडेच वहावत जातात " अशा विकृतीचा त्यांच्या लेखनास यत्किंचित् स्पर्शहि झाल्याचें आढळत नाहीं. आणि या वस्तुनिष्ठतेंतूनच क्रांतीविषयींचा त्यांचा दृष्टिकोण १९४७–४८ च्या सुमारास बदलला; व तिचें यथार्थ मूल्यमापन झालें. यामुळेंच रॉय हे क्रांतिविरोधी न बनतां या क्रांतीच्या पुढें गेले. ते मार्क्सवादाचे ' विरोधक ' वा साम्यवादाचे ' शत्रू ' न बनतां त्याची यथार्थ समीक्षा करुन व त्यांतील इष्ट तें जमेस धरुन नव्या, व्यापक व मूलगामी सामाजिक तत्त्वज्ञानाची उभारणी करूं शकले. त्यांची समीक्षा सर्जनशील ठरली आणि तिच्या योगानें एकोणिसाव्या शतकांत मार्क्सवादामुळें दृष्टिपथांत आलेलीं क्षितिजें विसाव्या शतकांतील नवमानवतावादामुळें अधिक व्यापक बनलीं. या वैचारिक संक्रमणाचा काळ म्हणजे १९३६ मध्यें रॉय तुरुंगांतून सुटून आल्यानंतरचा दहाबारा वर्षांचा काळ होय. या काळांत रशियन क्रांतीबद्दल त्यांनीं वेळोवेळीं व्यक्त केलेले महत्त्वाचे विचार त्यांच्या " रशियन क्रांति " या ग्रंथांत ग्रथित केलेले आहेत. त्या विचारांचा थोडक्यांत परिचय करुन देणें हा प्रस्तुत लेखाचा हेतु आहे. रशियन क्रांतीशीं रॉय यांच्या आलेल्या प्रत्यक्ष संबंधाची चर्चा येथें करतां येणार नाहीं. त्यासंबंधीं पुरेशी माहितीहि एकत्रित उपलब्ध नाहीं. आणि कधीं तशी ती उपलब्ध होऊं शकेल कीं नाहीं हाहि एक प्रश्नच आहे !

**पहिलें महत्त्वाचें लेखन**

तुरुंगांतून सुटल्यानंतरचें रशियन क्रांतीविषयीचें रॉय यांचें पहिलें महत्त्वाचें लेखन म्हणजे १९३७ सालीं या क्रांतीच्या विसाव्या वर्षदिनाच्या निमित्तानें त्यांनीं केलेलें समालोचन हें होय. रशियांत स्टालिनचें नेतृत्व कायम होऊन नियोजनयुग सुरू झालें होतें. दोन पंच-वार्षिक योजना पुऱ्या झाल्या होत्या. देशांत विरोधक-निःपात, राजकीय खटले इत्यादि सुरू होते. बाहेर भांडवलशाही राष्ट्रांशीं संबंध जोडले जात होते. यामुळें रशियांत हुकूमशाही जन्माला येत आहे, क्रांतीच्या धुरीणांना एकामागून एक नष्ट केलें जात आहे, क्रांति समाजवादाकडून राष्ट्रवादाकडे झुकूं लागली आहे, –वगैरे स्वरूपाचे आक्षेप घेण्यांत येऊं लागले होते. राजकीय खटल्यांमध्यें क्रांतीच्या जुन्या व नाणावलेल्या पुढाऱ्यांचे बळी पडूं लागल्यामुळें समर्थकांची देखील गोंधळल्यासारखी अवस्था झाली होती. अशा वेळीं क्रांतीचें स्वरूप स्पष्ट करुन तिजविषयींच्या गैरसमजांचें निराकरण करण्याची आणि टीकाकारांचा परामर्ष घेण्याची गरज होती. आणि या हेतूनेंच त्यांनीं हें लेखन केलें असावें असें म्हणावयास हरकत नाहीं.

रशियन क्रांति ही शुद्ध कामगार किंवा समाजवादी क्रांति नव्हे, ती संमिश्र स्वरुपाची आहे. ती यशस्वी होण्याचें मुख्य कारण म्हणजे शेतकऱ्यांचा तिला मिळा-लेला पाठिंबा हें होय. ह्या पाठिंब्यामुळेंच नंतरच्या यादवींतहि तिला तग धरता आली. म्हणून क्रांतीच्या योगानें प्रस्थापित झालेल्या राज्ययंत्राचें वर्णन ' कामगार हुकूमत ' या संज्ञेनें करतां यावयाचें नाहीं. किंबहुना कोण-तीहि प्रत्यक्ष क्रांति विशिष्ट तात्त्विक (Theoretical) प्रकारांपैकीं एकाद्या प्रकारांत पूर्णपणें बसवूं पहाणें किंवा तिच्या योगानें निर्माण होणारें राज्य पूर्वनिर्णीत स्वरुपा-चेंच असणार, असें मानणें चुकीचें आहे. क्रांतीच्या या स्वरुपाची जाणीव १९२१ सालींच लेनिनच्या ' नव्या आर्थिक धोरणा-( New Economic Policy )' मध्यें व्यक्त झालेली आढळते. आणि हें धोरण केवळ आर्थिकच नव्हे तर राजकीय धोरण देखील होतें. आर्थिक रचनेच्या कार्यात निरनिराळ्या वर्गांना राजकीय संरक्षण देऊन त्यांचें सहकार्य मिळविणें व त्या आधारावर समाजवादाकडे प्रगति करणें हा त्या धोरणाचा हेतु होता. हें धोरण पक्षाच्या पूर्णपणें पचनीं पडण्याच्या आंतच दुर्दैवानें लेनिनचें निधन झालें. उलट, त्याच काळांत युरोपांतील समाजवादी क्रांतीचे सर्व प्रयत्न फसले. औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रां-मध्यें क्रांति पराभूत झाल्यामुळें रशियन क्रांतीपुढें अत्यंत महत्त्वाचा प्रश्न निर्माण झाला. अन्य राष्ट्रांत क्रांति घडवून आणण्याचे प्रयत्न करुन, ट्रॉट्स्कीच्या सतत सुरू रहाणाऱ्या क्रांतीच्या तत्त्वाचा स्वीकार करावयाचा



अनुक्रमणिका






कीं एका राष्ट्रांतच समाजवादाचा प्रयोग करण्याचें स्टालिनचें धोरण स्वीकारावयाचें, हा तो प्रश्न होय. क्रांतीच्या युरोपांतील पराभवामुळें ट्रॉट्स्कीच्या भूमिकेची अव्यवहार्यता स्पष्ट होती. म्हणून स्टालिनचें धोरण मान्य झालें.

एका राष्ट्रांत समाजवादाचा प्रयोग यशस्वी करण्याचें जें धोरण क्रांतीनें स्वीकारलें, त्याच्या अर्थाचा योग्य उलगडा रॉय यांनीं करून दिला. या धोरणांतील पहिलें महत्त्वाचें सूत्र म्हणजे तो प्रयोग करतां येण्यासारखी परिस्थिति कायम ठेवणें, क्रांतीचें रक्षण करणें हें होय. क्रांतीच्या संरक्षणाचा प्रश्न यशस्वीपणानें सोडविण्यासाठीं विशिष्ट स्वरूपाचा औद्योगिक विकास अत्यंत झपाट्यानें करणें आवश्यक झालें. हा विकास परकीय भांडवलाच्या साहाय्यानें करणें अशक्य होतें. यामुळें त्यासाठीं आवश्यक भांडवलनिर्मिति करण्याची जबाबदारी मुख्यत्वें देशांतील प्रमुख व्यवसायावर म्हणजे शेतीवरच पडली आणि त्यांतून सामुदायिक शेतीचा प्रयोग व तो यशस्वी करण्यासाठीं आवश्यक तो कणखरपणा क्रांतीस स्वीकारावा लागला. त्याबरोबरच हा प्रयोग चालूं असतांना भीति किंवा दौर्बल्य यांची बाह्य जगाला शंकाहि येऊं न देतां युद्ध टाळणें जरूर झालें. तें टाळण्यासाठीं भांडवलशाही राष्ट्रांची एकजूट न होऊं देणें आवश्यक होतें. जर्मनींतील फॅसिझमच्या उदयामुळें फ्रान्सला वाटूं लागलेल्या भीतींतून रशियाला ही संधि मिळाली. आणि रशिया–फ्रान्स यांच्या परस्परसंरक्षणाच्या करारानें अशा प्रकारच्या प्रयत्नांना परिणामकारक शह दिला गेला. या प्रयत्नांना 'राष्ट्रवादी' किंवा 'क्रांतिविरोधी' म्हणून संबोधणें चूक आहे अशी समज रॉय यांनीं टीकाकारांना दिली. क्रांतीचा आधार टिकवून धरण्याचे आणि समर्थ बनण्याचेच ते प्रयत्न होत. त्यांच्यामुळें रशियन क्रांतीचें अन्य राष्ट्रांतील जनतेकडे दुर्लक्ष झालें नाहीं. जागतिक क्रांतीचा प्रश्न सोडवण्याचे प्रयत्न याचवेळीं 'तिसरी इंटरनॅशनल' करीत होती हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

अशा प्रकारें टीकाकारांना उत्तर देत असतांनाच क्रांतीच्या समर्थकांनाहि त्यांनीं कांहीं अत्यंत महत्त्वाच्या सूचना केल्या. रशियांत निर्माण झालेली समाजव्यवस्था विशिष्ट परिस्थितींत निर्माण झाली आहे. ती 'समाजवादी' आहे असा आग्रह धरणें आणि त्याचें समर्थन करण्यासाठीं 'समाजवाद' व 'साम्यवाद' यांत भेद करूं पहाणें यांत विशेष अर्थ नाहीं ही रॉय यांची पहिली महत्त्वाची सूचना होय. त्याबरोबरच रशियांत निर्माण झालेली राजवट ही 'कामगार-हुकमत' आहे हा आग्रह देखील व्यर्थ आहे असा इषाराहि त्यांनीं दिला आणि कामगार-हुकमतीवांचून समाजवाद प्रस्थापित करतां येणें शक्य आहे हा रशियन क्रांतीपासून घ्यावयाचा महत्त्वाचा बोध आहे हेंहि त्यांनीं स्पष्ट केलें. त्याचप्रमाणें राज्यद्रोहाच्या खटल्यासंबंधीं लिहितांना, "कणखरपणा हा क्रांतीच्या यशासाठीं आवश्यक असला तरीदेखील मतभेद केवळ कणखरपणाच्या साहाय्यानें मिटवूं पहाणें योग्य नव्हे. ते व्यक्त करण्याचें, त्यांची खुलेपणानें चर्चा करण्याचें स्वातंत्र्य असणें अत्यंत आवश्यक आहे. हें स्वातंत्र्य अबाधित राखल्यानेंच पक्षाचें अंतर्गत वातावरण निरोगी होऊं शकेल आणि मतभेद असणारांना क्रांतीचे विरोधक बनण्याचें कारण उरणार नाहीं. म्हणून चर्चेचें स्वातंत्र्य कायम राखलें पाहिजे" असें त्यांनीं बजावलें. यावरून क्रांतीचें समर्थन करीत असतांना देखील त्यांची भूमिका अंधश्रद्धेची व भक्तीची नसून सत्यान्वेषणाची, चिकित्सक समर्थकाचीच होती, हें स्पष्ट झाल्यावांचून रहात नाहीं.

### 'लाल नेपोलियनवाद'

रशियन क्रांति व तदनंतरच्या घटनांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं रॉय यांनीं वापरलेली महत्त्वाची कल्पना म्हणजे "लाल नेपोलियनवाद" ही होय. एखाद्या ऐतिहासिक कालखंडांतील घटनांचा बोध त्या कालखंडांतील महत्त्वाच्या क्रांतिकारक घटनेनेंच होऊं शकतो. युरोपांत सर्वत्र आढळणाऱ्या सरंजामशाही व्यवस्थेस नष्ट करणारी क्रांति फ्रान्समध्यें प्रथम यशस्वी झाली आणि तिनें युरोपांत सगळीकडे ही जुनी समाजव्यवस्था खिळखिळी वा नष्ट करून टाकली. नेपोलियनच्या कार्यासंबंधींच्या चुकीच्या वा विपर्यस्त समजुतीमुळें ही गोष्ट अनेकांच्या ध्यानांत येऊं शकत नाहीं. नेपोलियन या व्यक्तीच्या कांहींहि महत्त्वाकांक्षा असल्या तरी 'नेपोलियनवाद' हें फ्रेंच क्रांतीचेंच अपत्य होय. क्रांतिकारी फ्रेंच शेतकऱ्यांमधूनच त्याची सेना उभारली गेली. आणि तिनें सबंध युरोपभर प्रतिक्रांति-







कारक शक्तींना नामोहरम केलें. जेथें जेथें हें सैन्य गेलें तेथें तेथें जुन्या सरंजामशाही समाजरचनेला प्राणघातक धक्का बसला. दुर्दैवानें सरंजामशाही पूर्ण नष्ट होण्यापूर्वींच आंतरराष्ट्रीय प्रतिक्रांतिकारक एकजुटीनें नेपोलियनचा पराभव झाला. तथापि त्यामुळें नेपोलियनवादाच्या क्रांतिकारक कामगिरीला बाध येत नाहीं.

विसाव्या शतकांतील अशा प्रकारची निर्णायक स्वरूपाची घटना म्हणजे रशियन क्रांति ही होय. विसाव्या शतकांत अद्ययावत् स्वरूपाचें सैन्य निर्माण करणें कठिण व जिकीरीचें काम आहे. रशियासारख्या मागासलेल्या देशांत तर या कार्याला बराच काळ लागणें अपरिहार्य आहे. आजच्या प्रतिक्रांतिवादी शक्ती कितीतरी समर्थ व सुसज्ज आहेत. ऐक्याची भावना त्यांच्या ठिकाणीं जागृत आहे. अशा अवस्थेंत क्रांतीचें केंद्र मजबूत करण व विरोधकाशीं सामना देण्याइतकें त्याचें सामर्थ्य वाढविणें या कार्याला कालावधि लागणें अपरिहार्य होतें. तथापि रशियन क्रांतीला देखील आपल्या विकासासाठीं 'नेपोलियनवादा'च्या दिशेनें जाणें प्राप्त आहे, हा सिद्धान्त रॉय यांनीं १९३७ सालींच मांडला. आणि नंतर दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वींच्या व युद्धारंभींच्या घटनांच्या आधारानें त्याला व्यापक व विस्तृत स्वरूप दिलें.

## रुसो-जर्मन करार, पोलंड व फिनलंड

केवळ क्रांतीच्या विरोधकांनाच नव्हे तर पुरस्कर्त्यांना देखील गोंधळांत टाकणाऱ्या या काळांतील महत्त्वाच्या घटना म्हणजे रूसोजर्मन करार आणि पोलंड व फिनलंडवर लाल सेनेनें केलेली चाल या होत. यांतील पहिली घटना तर इतकी आश्चर्यजनक होती कीं, त्यामुळें तिचा योग्य अर्थ लावण्याऐवजीं साम्यवाद व नाझीवाद हे साम्राज्यशाही नष्ट करण्यासाठीं एकत्र आले आहेत असा क्रांतीच्या पुरस्कर्त्यांनीं देखील प्रचार सुरू केला. उलट, हे दोन्ही एकाच माळेचे मणी होत असे विरोधक म्हणूं लागले. अशा परिस्थितींत रॉय यांनीं प्रस्तुत घटनेचा सांगितलेला अर्थ हा त्यांच्या सूक्ष्म व चिकित्सक दृष्टिकोणाचें एक अत्युत्कृष्ट उदाहरण म्हणून नमूद करण्यासारखा आहे. या घटनेमुळें रशियानें नाझींच्या पूर्वेकडील विस्ताराला आळा घातला आणि क्रांतीच्या रक्षणासाठीं पूर्वेस नाझीविरोधी फळी उभी करण्याच्या उपक्रमास आरंभ केला. इंग्लंड, फ्रान्स इत्यादि पाश्चात्त्य राष्ट्रें नाझीविरोधी लढ्यांत रशियाचें सहकार्य घेण्याबाबत उदासीन असल्यामुळें रशियाला या व्यतिरिक्त दुसरा मार्ग नव्हता. तथापि, या करारामुळें या भांडवलशाही राष्ट्रांची रशियाविरुद्ध नाझींशीं एकजूट होण्याचाहि संभव टाळला गेला आणि पुढील फॅसिझमविरोधी लढ्यांतील सहकार्याची शक्यता कायम राहिली. हा करार नाझी जर्मनी व सोव्हिएट रशियाच्या मैत्रीचा करार होय असें म्हणणारांनीं रॉय यांच्या स्पष्टीकरणाची ' स्टालिनच्या बिनपगारी एजंटानें दूरान्वयी स्पष्टीकरण ' म्हणून संभावना केली. तथापि लवकरच घडलेल्या इतिहासानें रॉय यांच्या टीकाकारांचें हंसें झालें हें सर्वांच्या परिचयाचें आहे.

पोलंड व फिनलंडमधील घटनांचें रॉय यांनीं केलेलें स्पष्टीकरण असेंच मार्मिकतेचें द्योतक होतें. लाल सैन्याची पोलंडवरील चाल हा पोलंडच्या सार्वभौमत्वावर हल्ला होता, या म्हणण्याचा फोलपणा स्पष्ट करून नाझींना क्रांतीच्या उंबरठ्यापर्यंत येऊन पोहोचूं न देण्याचा तो उपक्रम होता, हें रॉय यांनीं सिद्ध केलें. ही पोलंडवरील चाल नाझींना अपेक्षित नव्हती. रूसो-जर्मन कराराशीं तिचा संबंध नव्हता. त्याचप्रमाणें फिनलंड हें प्रतिक्रांतिकारक शक्तींचा बालेकिल्ला बनूं लागल्यामुळें आणि त्याच्याशीं समझोता करण्याचे सर्व प्रयत्न फसल्यामुळें त्यावरील आक्रमण अपरिहार्य झालें. ' फिनलंड हें रशियाचें कुलूप आहे; त्याची किल्ली मला द्या कीं मी रशियाचें दार उघडतों ' ही जर्मन सेनानी लुडेडॉर्फ याची उक्ति फिनलंडचें, क्रांतीच्या संरक्षणाच्या दृष्टीनें, महत्त्व स्पष्ट करते. हें आक्रमण इच्छित हेतू साध्य करण्यासाठीं आवश्यक असलेल्या मर्यादेंतच केलें गेलें, हेंहि ध्यानांत घेतलें पाहिजे. अशा प्रकारें बाह्य जगांत रशियन क्रांतीविरुद्ध गैरसमज प्रसृत करणाऱ्या या घटनांचा अर्थ स्पष्ट करून नाझींच्या विरुद्ध पूर्वेकडे प्रचंड फळी उभी करण्याचाच तो प्रयत्न होय आणि या दृष्टीनें नाझीविरोधी शक्तींनीं तो स्वागतार्हच समजला पाहिजे, असा स्पष्ट इशारा रॉय यांनीं दिला.

## ' लोकशाही ' राष्ट्रांस आवाहन

वरील इशारा देत असतांनाच, नाझीविरोधी युद्ध रशियाच्या सहकार्यावांचून यशस्वी होणें अशक्य आहे, हें सहकार्य तद्विषयक संशयाची वृत्ति सोडून दिल्यास



अनुक्रमणिका






सहज मिळूं शकेल आणि नाझीवाद नष्ट करण्यास उद्युक्त झालेल्या राष्ट्रांनीं तें मिळवलेंच पाहिजे, असें पाश्चात्त्य 'लोकशाही' राष्ट्रांना व त्यांतील नाझी-विरोधी शक्तींना रॉय यांनीं आवाहन केलें आणि विस्तृत तात्त्विक विवेचनाच्या आधारें त्याचें समर्थन केलें. विशेषतः फ्रान्सच्या पराभवानंतर युद्ध अखेर-पर्यंत लढविण्याच्या ब्रिटनच्या निर्णयाचें स्वागत करीत असतां, एकाकी व प्रसंगविशेषी वसाहतींतून युद्ध चालूं ठेवण्याच्या ब्रिटिशांच्या कल्पनेचें वैयर्थ्य स्पष्ट करीत असतांना, त्यांनीं अत्यंत मूलभूत स्वरूपाचा **यू. एस्. ए. ( अमेरिका ) कीं यू. एस्. एस्. आर. ( रशिया )** हा प्रश्न उपस्थित केला. लोकशाही आणि फॅसिझम् यामध्यें निवड करावयाची हें म्हणणें चुकीचें असून ज्या अर्थव्यवस्थेमुळें प्रातिनिधिक लोकशाही प्राणांतिक अरिष्टांत सांपडली आणि फॅसिझमूचा जन्म झाला त्या अर्थव्यवस्थेचें जतन करावयाचें कीं तिच्यांत मूलभूत स्वरूपाचा बदल करावयाचा हा खरा प्रश्न होय, ही या विवेचनांतील मध्यवर्ती कल्पना होती. आणि त्यामुळें 'अमेरिका कीं रशिया' ही दोन राष्ट्रांतील निवड नसून दोन दृष्टिकोणांतील निवड आहे आणि त्यांतील रशियाद्वारां व्यक्त होणारा दृष्टिकोण हाच फॅसिझमूच्या पराभवासाठीं परिणामकारक व प्रभावी ठरणारा दृष्टिकोण आहे – असा या विवेचनाचा अर्थ होता. त्याबरोबरच रशिया व जर्मनी यांचे दिसणारे सलोख्याचे संबंध हे वास्तव स्वरूपाचे नसून आज ना उद्यां त्यांच्यांत युद्ध होणारच, असें निश्चित मत त्यांनीं पूर्ण आत्मविश्वासान मांडलें होतें.

## इतिहासक्रम बदलणारी घटना !

अखेरीस ही अपेक्षा स्टालिनच्या शहाणपणाऐवजी हिट्लरच्या मूर्खपणामुळें पुरी झाली! नाझींनीं रशियावर चढाई केली. ब्रिटननें रशियाचें दोस्तराष्ट्र म्हणून स्वागत केलें. आणि रॉय यांनीं युद्धाविषयींचें केलेलें निदान यथार्थ ठरलें. 'हें युद्ध दोन राष्ट्रसमूहांतील वा साम्राज्यशाही युद्ध नाहीं; मरणोन्मुख झालेल्या समाज-रचनेच्या जीवनमरणाची ही लढाई आहे' हें तें निदान होय. आणि युद्धांत अखेरीस रशिया आल्या कारणानें नव्या समाजनिर्मितीचा, क्रांतीचा, लाल नेपोलियन-वादाचा मार्ग खुला झाला. रशियानें आधींच युद्धांत पडणें आवश्यक होतें. तथापि पाश्चात्त्य राष्ट्रांच्या भूमिके-विषयींच्या संशयामुळें त्यानें तसें केलें नाहीं. तरी-देखील हिट्लरच्या चुकीचा फायदा आतां क्रांतिवादी शक्तींनाच मिळणार होता. यामुळें क्रांतीच्या दृष्टीनें हा प्रसंग अत्यंत महत्त्वाचा, आजवरच्या इतिहासाला मह-त्त्वाची कलाटणी देणाराच म्हटला पाहिजे. फॅसिझम्-विरुद्ध सोव्हिएट रशियाशीं खांद्याला खांदा लावून लढणाऱ्या राष्ट्रांना जुन्या समाजव्यवस्थेचें संरक्षण करणें अशक्य होतें. रशियन क्रांति त्याच स्वरूपांत इतरत्र होण्याची अपेक्षा बाळगणें चूक आहे. तथापि ती रशियाबाहेर पसरण्याचा मार्ग अशा प्रकारें खुला झाल्या-मुळें रॉय यांनीं या घटनेविषयीं समाधान व्यक्त केलें. या घटनेमुळें नाझीविरोधी लढ्यांत महत्त्वाची काम-गिरी रशियाच बजावणार आणि युद्धोत्तर काळांत रशियाशीं सन्मान्य सलोख्याचे संबंध राखणें हेंच इष्ट होय, अशी युरोपियन राष्ट्रांची व विशेषतः ब्रिटनची खात्री पटणें सुलभ झालें. उलट, प्रस्थापित समाज-व्यवस्थेचें रक्षण करूं पहाणारा दृष्टिकोण मागें पड-ण्याची शक्यता निर्माण झाली. अशा प्रकारें युद्धाचा राजकीय शेवट १९३९ चें जग नाहींसें होण्यांतच घड-णार, हें स्पष्ट झालें.

## युद्धोत्तर राजकारण

युद्धाच्या राजकीय निर्णयाविषयींची ही अपेक्षा पुरी होण्यासाठीं युद्धांत सहकार्य केलेल्या राष्ट्रांनीं शांत-तेचा प्रश्न सलोख्यानें मिटविणें आवश्यक होतें. या-बाबत रॉय यांनीं युरोपीय युद्ध संपत असतांना मांड-लेले विचार अत्यंत मौलिक स्वरूपाचे आहेत. त्यांच्या मतानें लोकशाहीच्या कल्पनेची पुनः नव्यानें मांडणी करणें हाच शांततेचा प्रश्न सोडविण्याचा मार्ग होय. जुन्या अर्थव्यवस्थेवर आधारलेली व जुन्या प्रकारची लोकशाही अरिष्टमय परिस्थितींतून बाहेर पडूं शकणार नाहीं; इतकेंच नव्हे तर ती पुनः फॅसिझमला जन्म देण्याचा संभव आहे. हा संभव विजयी राष्ट्रांनीं टाळ-ण्याची गरज आहे. युद्धजन्य परिस्थितींत ब्रिटनमध्यें निर्माण झालेल्या मजूर-पक्षाच्या विजयाच्या शक्यते-मुळें रशिया व ब्रिटन जवळजवळ येण्याची शक्यता कितीतरी बळावली! आणि तो विजय मिळाल्यानंतर, रशियाचे पूर्वग्रह वा अमेरिकेचें वर्तन यामुळें रशियाच्या ठिकाणीं निर्माण होणारी वा वाढत जाणारी संशयी वृत्ति समजावून घेतली पाहिजे; तिच्यामुळें चिडून न








जातां सलोखा कायम राखला पाहिजे; आणि अशा प्रकारें ब्रिटन व रशिया यांनीं उभयतां मिळून युद्धोत्तर युरोपीय पुनर्रचनेच्या कार्याचें मार्गदर्शकत्व स्वीकारलें पाहिजे" असा सल्ला रॉयनीं मजूरपक्षाला दिला आहे. तीच परिस्थिति कायम राखण्याचें अमेरिकेचें धोरण आणि त्याच्याविरुद्ध दिशेनें ओढणारें रशियाचें धोरण, यांजमध्यें समतोलपणा राखण्याची जबाबदारी ब्रिटनवर पडणें अपरिहार्य होतें. ती जबाबदारी ब्रिटन कशा प्रकारें पार पाडील हें तेथील अंतर्गत परिस्थितीवर अवलंबून होतें. मजूरपक्षाच्या विजयामुळें त्यासंबंधींची आशा बळावली. युद्धामुळें युरोपांतील समाजव्यवस्था खिळखिळी बनली होती आणि तिच्यांत प्रगमनशील स्वरुपाचे बदल करण्याची शक्यता कितीतरी बळावली होती. ही संधि लोकशाही समाजवाद आणि साम्यवादी हुकूमशाही या विषयींच्या शुष्क चर्चेत वाया घालवणें हा क्रांतीच्या दृष्टीनें एक अक्षम्य गुन्हा होता. आणि नेमका हाच गुन्हा रशियन राज्यकर्त्यांनीं केला आणि युरोपीय नेतृत्वाची चालून आलेली हमखास संधि वाया घालवली! १९४२ सालींच युद्धोत्तर जग अमेरिका व रशिया यांच्यांत विभागलें जाईल असें रॉय यांनीं भाकित केलें होतें. परंतु त्या विभागणींत युरोपचें नेतृत्व रशियाकडेच येईल – किंबहुना येणें अपरिहार्य आहे – अशी त्यांची अपेक्षा होती. ही अपेक्षा पुरी होण्याऐवजीं युरोपचीच विभागणी करण्याचा आणि पूर्वेकडील शक्य तो भाग आपल्या कब्ज्यांत घेण्याचा उपक्रम रशियानें आरंभला. आणि त्याबरोबरच तिसऱ्या महायुद्धाची संभाव्यताहि चर्चिली जाऊं लागली. युद्धकाळांत रशियाचें अमर्यादपणें वाढलेलें युरोपांतील वजन आणि जगांत सगळीकडे त्याजबद्दल निर्माण झालेली सहानुभूति युद्ध संपतांच एका वर्षाच्या आंत रशियानें पूर्णपणें घालवली. आणि पुनश्च एकाकी बनण्याचा प्रसंग त्याजवर आला!

## पुनश्चिंतन

याच काळांत रॉय यांचें रशियन क्रांतीसंबंधीचें पुनश्चिंतन सुरु झालें. आणि त्याचाच परिणाम म्हणजे आरंभीं उल्लेख केलेलें वैचारिक संक्रमण हा होय. पूर्वीच्या पांचसांत वर्षांतील घटनांचा आढावा घेऊन युद्धांच्या व शांततेच्या काळांत क्रांतीच्या विकासाच्या चालून आलेल्या किती संधी रशियानें फुकट दवडल्या याचें त्यांनीं विश्लेषण केलें. रुसो-जर्मन करार हा पाश्चात्त्य राष्ट्रांच्या हिट्लरला येन केन प्रकारेण संतुष्ट ठेवण्याच्या उद्योगामुळेंच रशियावर लादला गेला–रशियाला तो करणें भाग पडलें, हें जरी मान्य केलें तरी फ्रान्सवर हिट्लरनें चढाई केली असतां राजकीय व लष्करी दोन्हींहि दृष्टींनीं रशियाला लढाईंत पडणें शक्य होतें, असें म्हणतां येईल. फ्रान्सच्या पराभवानंतर तर रशियाची तटस्थता व तज्जन्य नैतिक एकाकीपणा हा क्रांतीच्या दृष्टीनें अत्यंत धोक्याचा होऊं लागला होता. तथापि रशियन नेत्यांनीं तो सोडला नाहीं. हिट्लरच्या प्रमादामुळें त्यांना तो सोडावा लागला! नंतरच्या युद्धकाळांतील दुसरी महत्त्वाची घोडचूक म्हणजे दुसऱ्या आघाडीच्या मागणीचा प्रचार ही होय. ह्या मागणीमागील हेतु, पाश्चात्त्य राष्ट्रें नाझींशीं मनापासून लढूं इच्छित नाहींत म्हणून युरोपनें संरक्षणासाठीं रशियाकडेच पाहिलें पाहिजे, असा प्रचार करण्याचा होता. तथापि ब्रिटनविषयीं अशी शंका कोणाहि त्रयस्थाला येणें शक्य नव्हतें. यामुळें दुसऱ्या आघाडीबद्दलच्या या प्रचाराचा परिणाम अगदीं उलट झाला! रशिया दुर्बल असून एकट्यानें नाझींशीं सामना देण्याची कुवत त्याच्या ठिकाणीं नाहीं, हाच ग्रह त्यामुळें बळावत गेला. नाझींचा प्रत्यक्ष पराभव करण्याच्या दृष्टीनें निर्णायक स्वरूपाचा उपयोग दुसऱ्या आघाडीचा झाला, असें मुळींच म्हणतां येत नाहीं. पण प्रस्तुतच्या विजयाबाबतचें श्रेय मात्र त्यामुळें रशियाला मिळणें अशक्य झालें.

## रशियाची क्रांतिकारकता संपली

शांततेच्या काळांतहि अशाच चुका रशियन राज्यकर्त्यांनीं केल्याचें दाखवितां येईल. यांतील सर्वांत महत्त्वाची चूक म्हणजे युद्धोत्तर राजकारणाचा अर्थ सहानुभूतिपूर्वक समजावून घेण्याचा प्रयत्न न करतां, इंग्लंडमध्यें यशस्वी झालेल्या मजूर पक्षाचें युद्धोत्तर युरोपियन पुनर्रचनेच्या कार्यांत सहभागी म्हणून स्वागत करण्याऐवजीं त्यांच्या आंतरिक विरोधाचेंच धोरण त्यांनीं स्वीकारलें ही होय. आणि यामुळें रशिया नव्या युद्धाची तयारी करीत आहे, हें गृहीतकृत्य धरल्यावांचून रशियन परराष्ट्रीय धोरणाचा अर्थच लागेनासा झाला. आपल्या कब्ज्यांत आलेल्या युरोपांत संरक्षणक्षमता व लष्करी








सामर्थ्य निर्माण करण्याचा आणि बाहेरील युरोपीय राष्ट्रांतील कोणत्याहि पुनर्रचनेच्या प्रयोगांना 'खो' देण्याचा उपक्रम रशियानें आरंभला. हें धोरण 'लाल नेपोलियनवादां'त जरी बसूं शकलें तरी त्याला क्रांतिकारक अर्थ राहिला नाहीं, असें स्पष्ट मत रॉय यांनीं व्यक्त केलें. आणि पुढें मार्शलयोजनेच्या वेळीं युरोपीय ऐक्याला रशियानें केलेल्या विरोधामुळें याच निदानाला पुष्टि मिळाली. वसाहतींतील राष्ट्रवादाचा कसलेंहि तारतम्य न बाळगतां पुरस्कार करण्याचें रशियाचें धोरण हाहि याच चुकांचा एक परिपाक होय. "राष्ट्रीय–समाजवादाचा अनुभव आलेल्या युरोपचें नेतृत्व घेण्यास राष्ट्रवादाकडे झुकलेला साम्यवाद समर्थ ठरणें अशक्य आहे; आपल्या लष्करी विजयामुळें धुंद झालेल्या नेपोलियनला कोठें थांबावें हें समजलें नाहीं; त्यामुळें युरोपचा मुक्तिदाता बनण्याऐवजी तो एक झोटिंगशहा बनला." असें रॉय यांचें ठाम मत झालें. "लोकशाहीची सहानुभूति गमावून बसलेल्या साम्यवादाच्या बाबतींत देखील याच इतिहासाची पुनरावृत्ति होण्याचा संभव निर्माण झाला आहे; क्रांतिकारक परिस्थितींत असलेला युरोप रशियाच्या पूर्वनिर्णीत (pre-determined) क्रांतिमार्गांत बसूं शकत नाहीं; म्हणून युरोपचा मुक्तिदाता बनण्याऐवजीं स्वातंत्र्याचा शत्रु म्हणून उल्लेखिला जाण्याचा प्रसंग स्टालिनवर येण्याचा संभव आहे; त्याच्या धोरणांतील क्रांतिकारकता नाहींशी होत असून तें नव्या युद्धाकडे नेणारें धोरण बनूं पहात आहे; ही जागतिक राजकारणांतील एक अत्यंत मोठी शोकांतिकाच होय" असा निर्णय या चिंतनांतून रॉय यांनीं काढला. यानंतर अमेरिका व रशिया यांच्यातील कलहाला त्यांच्या मतानें क्रांतिकारक महत्त्व न रहातां तो दोन प्रमुख सत्ता-यंत्रणां-(power-structures) मधील कलह बनला. आणि त्यांत अंतर्भूत असलेल्या अर्थशून्य कलहाची संभाव्यता टाळणें, ही प्रगमनशील शक्तींची महत्त्वाची जबाबदारी झाली.

## क्रांतिद्रोह कीं 'गर्भपात'?

या निर्णयामुळें रॉय हे केवळ रशियाविरोधाच्या भूमिकेवर गेले नाहींत; तर या घटनेची कारणपरंपरा शोधून काढण्याचा उपक्रम त्यांनीं केला. या उपक्रमाचें त्यांच्याच शब्दांत दिग्दर्शन करून थांबणें इष्ट होईल. ते म्हणतातः

"व्यक्तिशः स्टालिननें किंवा स्टालिनवादी राजवटीनें क्रांतीचा विश्वासघात केला, या विचाराशीं मी या क्षणापर्यंतहि सहमत होऊं शकत नाहीं. विश्वासघात झाला नाहीं; गर्भपात झाला आहे! मार्क्सवादाच्या इतिहासवादांतील तर्कदोषांमुळें रशियन राज्यक्रांतीचा गर्भपात झाला आहे. हे तर्कदोष अनुभवानें उघडकीस आणले आहेत. लेनिनला मार्क्सवादी क्रांतिविषयक सिद्धांतांतील वैगुण्यें स्पष्टपणें दिसलीं होतीं कीं काय, हें केव्हांच कळण्याची शक्यता उरली नाहीं. कांहींहि असलें तरी, लेनिननें क्रांतीच्या प्रारंभकालांतच क्रांतीला निराळ्या मार्गांत खेचलें यांत शंका नाहीं. युद्धसमाप्तीनंतरच्या काळांत रशियनांना पुनः पुनः झपाट्यानें जी जी संधि प्राप्त झाली ती ती त्यांनीं गमावली. त्या संधीमध्यें क्रांतीच्या विस्ताराला व विकासाला अनुकूल असें वातावरण लाभलें होतें. तत्पूर्वी मला निश्चितपणें वाटतें कीं, स्टालिन प्रसंगानुसार व्यावहारिक मुत्सद्दीपणानें वागे. मार्क्सवादी तात्त्विक विचारसरणी उपेक्षून, क्रांतीचा कायापालट त्यानें जाणूनबुजून घडवून आणला. १९२६ सालीं रशियन कम्युनिस्टांच्या मेळाव्यापुढें भाषण करतांना स्टालिननें मार्क्सच्याच आधारानें असें घोषित केलें कीं, तात्त्विक विचारांची बैठक अनुभवाच्या प्रकाशास अनुसरून बदलणें आवश्यक असतें, हें बुद्धिमान् मार्क्सवाद्यांनीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. याचेळीं ट्रॉट्स्की, कामेनेव, झिनोविफ् इत्यादि सर्वच क्रांतिनेते स्टालिनच्या धोरणास विरोध करीत होते. हें धोरण मार्क्सवादी तत्त्वापासून च्युत झालें आहे, यामुळें क्रांतीचा विश्वासघात होईल, अशी टीका ते करूं लागले होते. मला दोन वर्षांपूर्वीपर्यंत असा विश्वास होता कीं, स्टालिनचें धोरण वीस वर्षांपूर्वीं त्यानें घोषित केलेल्या विचारास धरून चाललें होतें; या धोरणांत आर्थिक, राजकीय, परराष्ट्रीय व लष्करी या सर्व बाबींचा समावेश होता. टणक धोरण व आश्चर्यजनक वाटणारा वस्तुवादीपणा त्यानें केव्हां, कां व कसा सोडला आणि तो सत्तास्पर्धेच्या राजकारणांत गुंतून अधःपतित केव्हां, कां व कसा झाला, हे मोठे गमतीदार प्रश्न आहेत!

"या गर्भपाताचीं अधिक मूलगामी कारणें सांगतां येतात. उदाहरणार्थ, मूळच्या मार्क्सवादामध्येंच तर्कदोष







आहेत; अनुयायांनीं त्याला ग्रंथप्रामाण्य किंवा सांप्रदायिकता आणली; कम्युनिझम् हें ध्येय स्वर्गासारखें शुद्ध काल्पनिक आहे; त्यांतील समाजहिताची कल्पना अमूर्त असून तिच्या पोटीं अनर्थकारक परिणाम सांठलेले आहेत; लेनिनवादी विचारसरणींत राज्यसत्तेचें स्तोम फार माजलें इत्यादि – हीं अशीं मूलगामीं कारणें सोडलीं तरी रशियन राज्यक्रांतीचा गर्भपात कसा झाला, ही गोष्ट स्टालिननें केलेल्या एकमेव प्रमादावरूनच नेमकी उघडकीस येते. अत्यंत कठीण आणीबाणीच्या प्रसंगीं चुकीचे अंदाज बांधून त्यानें वेळ फार गमावला. म्हणजे असें कीं फ्रान्सचा पाडाव होण्याच्या अगोदरच तो थोपविण्याकरितां शत्रूस तत्क्षणीं टोला लगावणें जरूर होतें. त्या भयंकर प्रमादाची व्यापकता माझ्याहि ध्यानांत त्यावेळीं आली नाहीं. त्या गंभीर प्रमादामुळें जर्मन आक्रमकांना रशिया पादक्रांत करणेंहि शक्य झालें असतें. अंतर्गत यादवीच्या अत्यंत अंधकारमय दिवसापासून या गंभीरतम संकटकालापर्यंत रशियन राज्यकर्त्यांनीं कणखरपणाचें गमावला होता – त्यांची घाबरगुंडीच उडाली होती. कल्पित कथांनीं रंगविलेल्या मध्ययुगीन वीरांचे पोवाडे अनन्यभावानें गाण्यापर्यंत त्यांची मजल गेली. राष्ट्रवादी अहंकारासहि ते चेतवूं लागले. त्यांनीं कामगारक्रांतीच्या भव्य भावुक चैतन्याला युद्धकाळांत ग्रहण लावलें.

"तेव्हांपासून आजतागायत या क्रांतिकारक रशियाला कम्युनिझमचें महत्त्व बाह्यात्कारी देखावा करण्यापेक्षां अधिक उरलें नाहीं.

"या अनुभवापासून मिळणारा धडा शिकण्याशिवाय आतां गत्यंतरच राहिलें नाहीं. ध्येयवाद या दृष्टीनें तत्त्वज्ञानांत व कल्पनेंत कम्युनिझमचें जें चित्र रंगविलेलें सांपडतें तें अंमलबजावणीच्या वेळीं तसें आकर्षक रहात नाहीं. म्हणून श्रमजीवी कष्टाळू जनतेच्या श्रद्धेचीहि तें सहज पकड घेऊं शकत नाहीं. रशियन क्रांति हा गर्भपात आहे असें म्हणण्याचें हेंच कारण आहे कीं, कम्युनिझमच्या लाल झेंड्याखालीं ती क्रांति विश्वक्रांति बनूं शकत नाहीं.

" विजयी फासिस्ट हुकूमशाहीशीं जीवनमरणाचा लढा लढत असतांना ज्या नव्या शक्ती वाढीस लागल्या व नवे विचार विकास पावले त्या शक्ती व ते विचार आतां आधुनिक संस्कृतीच्या संकटावरहि प्रभाव गाजवूं लागले आहेत. सोविएट यूनियनचे नेते व जगांत अन्यत्र पसरलेले त्यांचे कम्युनिस्ट अनुयायी या शक्तींच्या व या विचारांच्या बरोबर प्रगति करण्यास असमर्थ ठरले आहेत." – The Russian Revolution XIV-XVII.

## धर्म आणि समाज

कोणताहि मानवसमाज वैचारिक विकासाच्या कोणत्या टप्प्यावर आहे, हें त्या समाजाच्या धर्मावरून सूचित होतें. धर्माचा मुख्य आधार म्हणजे अज्ञान, भ्रामक समजुती आणि दूषित पूर्वग्रह हीं होत. तथापि धर्म ही देखील अपरिवर्तनीय गोष्ट नव्हे. सर्वच सामाजिक आविष्कारांप्रमाणें धर्म देखील सारखा बदलत असतो. सामाजिक जीवनाची भौतिक परिस्थिति जशी बदलते तसे धर्माचे प्रकार बदलतात. म्हणूनच कोणत्याहि लोकसमूहाची सामाजिक प्रगति मोजावयाची असेल तर ती मोजावयाचें विश्वसनीय साधन त्या लोकसमूहाचा धर्म हें होय...

एकेश्वरवादी धर्म केन्द्रित समाजाच्या प्रस्थापनेच्या प्रयत्नाचा निदर्शक आहे. नाना जातींचे लोकसमूह पाशवी शक्तीनें मूळ एकत्र आलेले एकमेकांशीं भांडत असतात; त्यांच्या जुन्या धार्मिक चालीरीती, रूढी, जुने धार्मिक समारंभ, परंपरा मोडकळीस आलेल्या असतात. त्यांच्यावर हल्ला करून, एकेश्वरवाद त्यांच्या उद्ध्वस्त अवशेषावर आधारलेल्या एका नवीन केन्द्रित समाजाची स्थापना करतो. मग जुन्या काळच्या भुताखेतांवरील रानटी श्रद्धांऐवजीं एकेश्वरी धर्मातील शास्त्रोक्त आज्ञांना भाव येतो. पूर्वीच्या अनेकदेवतावादी पंथांतील काव्यमय कल्पनारम्य मूर्तिपूजेच्या जागीं एका सर्वोच्च आदिशक्तीवरील अंधश्रद्धेला प्रामाण्य येतें.

— मानवेंद्रनाथ रॉय – 'Religion and Superstition' मधून








श्री. व. अ. कर्णिक

# डॉ. महमूदच्या वेषांतील एम्. एन्. रॉय

डॉ. **महमूद** या भूमिकेंतील **कॉ. रॉय** यांचा अवतार अवघा सात महिन्यांचा होता. १९३० च्या डिसेंबरच्या १५-१६ तारखेच्या सुमारास ते हिंदुस्थानांत आले आणि पुढच्या जुलैच्या २१ तारखेस ते मुंबईंत पकडले गेले. या सात महिन्याच्या गुप्त संचारांत ते डॉ. महमूद या एकाच नांवानें वावरत होते असें नव्हें. संयुक्तप्रांतामध्यें ते बानर्जी या नांवानें ओळखले जात असत. परंतु मुंबईंतच जास्त काळ गेला आणि मुंबईंतच जास्त लोकांशीं संबंध आला म्हणून या कालखंडांतील **कॉ. रॉय** यांचे **डॉ. महमूद** या नांवानेंच जनतेला स्मरण आहे.

सुरवातीचे अडीच-तीन महिने डॉ. महमूद या नांवानें कॉ. रॉय जवळजवळ उघड रीतीनें वावरत होते. या दिवसांत ते त्या नांवानें मुंबईंतील व हिंदुस्थानांतील अनेक राजकारणी व्यक्तींना भेटले व त्यांच्याशीं राजकारणाची व इतर अनेक विषयांची त्यांनीं चर्चा केली. त्या दिवसांत ते लहानसहान सभांना देखील हजर रहात आणि जरूर पडल्यास छोटीशीं भाषणें देखील करीत.

पहिले कांहीं दिवस प्रख्यात क्रांतिकारक कॉ. रॉय हे हिंदुस्थानांत येऊन दाखल झाले आहेत याची हिंदी पोलिसांना बातमी लागलेली नव्हती. युरोपमधील गुप्त हेरांकडून ही बातमी त्यांना पोंचेपर्यंत महिना-दीडमहिना उलटून गेला. शिवाय त्यांच्याजवळ कॉ. रॉय यांचा अलीकडचा फोटो नव्हता. त्यामुळें व्यक्ति बरोबर हुडकून काढणेंहि त्यांना फार कठीण जात होतें. त्यामुळें पहिल्या या दिवसांत कॉ. रॉय उघड उघड फिरूं शकत असत.

फेब्रुवारीच्या अखेरीस डॉ. महमूद या वेषांतील कॉ. रॉय यांची मॉस्को व बर्लिन येथें त्यांना भेटलेल्या एका गृहस्थाशीं गांठ पडली. भेट झाल्याबरोबर त्यानें कॉ. रॉय यांच्याबद्दल इतका भक्तिभाव प्रगट केला आणि त्यांच्या कार्याबद्दल इतकी आस्था प्रदर्शित केली कीं, जमलेल्या सर्व मंडळींना एक नवा सहकारी लाभल्याचा आनंद झाला. पण या आकस्मिक भेटीमुळेंच कॉ. रॉय अखेर पोलिसांच्या पंजांत सांपडले !

या सद्गृहस्थाचें कम्युनिस्ट पक्षाच्या मंडळीमध्येंहि बसणेंउठणें होतें. आणि ती मंडळीहि पोलिसांइतकीच कॉ. रॉय यांच्या मागावर होती. कम्युनिस्ट इंटरनॅशनलमधून फुटून निघालेल्या कॉ. रॉय यांचें हिंदुस्थानांत बस्तान बसूं नये, असा त्यांचा मूळ उद्देश होता. त्या उद्देशपूर्तीसाठीं कॉ. रॉय पोलिसांच्या तावडींत सांपडले तरी देखील त्या मंडळींना हवें होतें. त्यामुळें मुंबईंतील कांहीं कार्यकर्त्यांच्या बरोबर काम करणारे डॉ. महमूद हेच कॉ. रॉय होत असें जेव्हां त्या सद्गृहस्थाकडून त्यांना कळलें तेव्हां कॉ. रॉय आपल्या कब्ज्यांत सांपडले या स्वरूपाचा त्यांना आनंद झाला आणि डॉ. महमूद हेंच कॉ. रॉय असें त्यांनीं ओरडाओरड करून जिकडेतिकडे सांगायला सुरवात केली ! पोलिसांना ही मोठीच महत्त्वाची बातमी मिळाली. मग डॉ. महमूद यांची शिकार करण्याचे त्यांचे प्रयत्न जोरानें सुरूं झाले. त्यानंतर मात्र कॉ. रॉय यांना उघड रीतीनें वावरणें अशक्य झालें.

---

प्रस्तुत लेखाचे लेखक श्री. **कर्णिक** हे **मानवेंद्रनाथ रॉय** यांना या काळांत भारतांत लाभलेले पहिले महत्त्वाचे सहकारी. रॉय हे भारतांत आल्यानंतर कर्णिक यांच्याशीं त्यांची भेट पहिल्या आठदहा दिवसांतच झाली. लेखांत उल्लेख केलेल्या चर्चा श्री. कर्णिक यांच्या हनुमान् टेरेसमधील निवासस्थानींच होत असत. मानवेंद्रनाथ रॉय यांना या काळांत व तेव्हांपासून अखेरपर्यंत त्यांच्या कार्यांत एकनिष्ठेनें सहकार्य देणारे म्हणून कर्णिक रॉयवाद्यांत ओळखले जातात—का. सं०

## कॉ. तय्यब शेख

कॉ. रॉय यांना हिंदुस्थानांत येऊन काम सुरूं करण्यासाठीं जी पूर्वतयारी हवी होती ती तयारी करण्यामध्यें ज्या तीन व्यक्तींचा हात होता त्यांच्यामध्यें कॉ. तय्यब शेख यांचा बहुमानानें उल्लेख केला पाहिजे. दुसरे दोघे जण कॉ. रॉय यांना लवकर सोडून गेले. कॉ. शेख मात्र शेवटपर्यंत कॉ. रॉय यांचे एक अत्यंत विश्वासू असे सहकारी होते. कॉ. शेख यांची कॉ. रॉय यांच्याशीं बर्लिनमध्यें गांठ पडली आणि तेव्हांपासून त्यांच्यामध्यें शिष्य-गुरूचें नातें निर्माण झालें. कॉ. शेख हे कॉ. रॉय यांच्या अगोदर सहा महिने हिंदुस्थानांत येऊन दाखल झाले. आल्यापासून त्यांनीं मोठ्या उत्साहानें आणि धडाडीनें कॉ. रॉय यांच्या विचारांचा व वाङ्मयाचा प्रचार चालविला होता. या प्रचारामुळें त्या विचारसरणीप्रमाणें काम करूं इच्छिणाऱ्या मंडळींचा एक लहानसा गट देखील तयार झाला होता. त्यामुळें कॉ. रॉय आले त्या वेळीं त्यांना कामाला अगदींच एकाकी सुरवात करावी लागली नाहीं.

## जनतेच्या हक्काबद्दलचा ठराव

कॉ. रॉय हिंदुस्थानांत आले त्यावेळीं ते कम्युनिस्ट इंटरनॅशनलमधून बाहेर पडून वर्ष उलटून गेलें होतें. हिंदी राष्ट्रीय चळवळीचें उद्दिष्ट व हिंदी राष्ट्रीय कॉंग्रेसचें स्वरूप याविषयींचे त्यांचे विचार आणि कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे विचार यांच्यामध्यें जमीन-अस्मानाचा फरक होता. कामगारक्रांति हें राष्ट्रीय चळवळीचें उद्दिष्ट असावें आणि तें उद्दिष्ट गांठण्यासाठीं राष्ट्रीय कॉंग्रेस छिन्नविच्छिन्न करून तिच्या जागीं एक नवीन साम्राज्यशाहीविरोधी आघाडी तयार करावी असें कम्युनिस्टांचें म्हणणें होतें. तर, कॉंग्रेस ही एक क्रांतिवादी चळवळ आहे म्हणून जनतेला तिच्यामध्यें ओढून तिला अधिक क्रांतिकारक बनवावें व तिच्या मार्फतीनें बहुसंख्य जनतेला हवी असलेली राष्ट्रीय क्रांति घडवून आणावी असें कॉ. रॉय यांचें मत होतें. डॉ. महमूद म्हणून काम करायला त्यांना जे सात महिने लाभले त्या मुदतींत त्यांनीं या दिशेनें खूप महत्वाचें कार्य केलें.

राष्ट्रीय कॉंग्रेसच्या अव्वल दर्जाच्या पुढाऱ्यांच्या गांठीभेटी घेऊन आपला राष्ट्रीय क्रांतीचा कार्यक्रम त्यांच्या गळीं उतरवण्याचा त्यांचा पहिला प्रयत्न होता. या कामासाठीं त्यांनीं डॉ. महमूद म्हणून सरदार वल्लभभाई पटेल यांची गांठ घेतली. पण सरदारांना त्यांचे म्हणणें पटलें नाहीं. पं. जवाहरलाल नेहरू यांची मात्र ते पुष्कळशी समजूत घालूं शकले. राष्ट्रीय कॉंग्रेसच्या पाठीशीं जनतेची शक्ति उभी करावयाची तर तिच्या कार्यक्रमामध्यें जनतेच्या मागण्यांचा अंतर्भाव हवा हें डॉ. महमूद यांचें म्हणणें पं. नेहरूंना पटलें. या बोलण्यांतूनच कराची-कॉंग्रेसचा जनतेच्या हक्काबद्दलचा ठराव तयार झाला. म. गांधी ठरावाबद्दल सुरवातीला विशेष उत्सुक नव्हते, पण पं. नेहरूंच्या आग्रहावरून त्यांनीं अखेर त्याला मान्यता दिली आणि कॉंग्रेसनें तो ठराव मंजूर केला. कॉ. रॉय हे स्वत: कॉंग्रेसच्या अधिवेशनाला हजर होते. सर्वसाधारण मंडळी त्यांना डॉ. महमूद म्हणून ओळखत. पण पं. नेहरू, श्री. सुभाषचंद्र बोस आदिकरून निवडक लोकांना त्यांच्या खऱ्या स्वरूपाची कल्पना होती.

पुढाऱ्यांची समजूत घालण्याचे जसे डॉ. महमूद यांचे प्रयत्न चालूं होते तशीच कार्यकर्त्यांमध्यें जागृति करण्याचीहि त्यांची खटपट चालू होती. कार्यकर्त्यांमधील जागृतीवरच त्यांचा अधिक विश्वास होता. या दृष्टीनें डॉ. महमूद त्या दिवसांत शेकडों कार्यकर्त्यांना भेटले असतील ! कार्यकर्ता मग तो कितीहि खालच्या पायरीवरील असो, त्याच्याशीं युक्तिवाद करून त्याची समजूत घालण्यांत त्यांचा हातखंडा असे. कॉंग्रेसमधील तरुण कार्यकर्त्यांना क्रांतिप्रवण करण्यासाठीं त्यांनीं त्या दिवसांत लिखाणहि खूप केलें. वेगवेगळ्या वर्तमानपत्रांत ते वेगवेगळ्या नांवांनीं लिहीत. शिवाय हस्तपत्रकें, जाहीरनामे वगैरे तर आठवड्यागणिक बाहेर पडत. खेरीज








'मासेस' नांवाचें एक नियतकालिकहि ते प्रसिद्ध करीत असत. या सर्व प्रयत्नांमुळें थोडेच दिवसांत त्यांच्याभोंवतीं निष्ठावंत कार्यकर्त्यांचा एक गट निर्माण झाला आणि तो पुढें 'रॉयग्रुप' या नांवानें प्रसिद्ध झाला. या गटाला कॉ. रॉय यांचें नेतृत्व फक्त चारपाच महिनेच लाभले. पण तें नेतृत्व इतकें प्रभावी होतें कीं पुढें कॉ. रॉय यांना सहा वर्षें तुरुंगांत काढावीं लागलीं तरी तो गट विस्कळित तर झाला नाहींच पण दिवसानुदिवस वाढतच गेला.

**तरुणांचें नेतृत्व**

मार्क्सवाद व साम्यवाद यांनीं सुशिक्षित तरुणांना घातलेली मोहिनी आजच्यापेक्षां ह्या काळांत कितीतरी पटीनें अधिक होती ! रशियन क्रांतीचें आसुरी स्वरूप तोंवर प्रगट झालेलें नव्हतें. तिच्या आकर्षक स्वरूपाचीच लोकांना माहिती होती. त्यामुळे गांधीवादावरील विश्वास उडतांच तरुण एकदम साम्यवादाकडे उडी घेत. आणि त्यांचा साम्यवाद म्हणजे पुस्तकें वाचून, अभ्यास करून आत्मसात् केलेला साम्यवाद नव्हता, तर इथल्या साम्यवादी पक्षाच्या प्रचारकांनीं पोपटपंचीच्या बळावर कसाबसा त्यांच्या डोक्यांत कोंबलेला अर्धवट आणि अर्धकच्चा असा साम्यवाद होता. त्यांना कॉ. रॉय यांचा खोल अभ्यासाचा आणि परिपक्व विचारांचा साम्यवाद समजणें आणि पचणें फार कठीण होतें. शिवाय कॉ. रॉय हे ब्रिटिश साम्राज्यशाहीचे हस्तक आहेत असें कम्युनिस्टांच्या येथील गुरूंनीं त्यांना शिकवलें होतें. त्यामुळें या लोकांची समजूत घालणें, त्यांच्या शंकाकुशंका दूर करणें, वरवर क्रांतिकारक भासणाऱ्या पण परिणामी अपक्रांतिकारक ठरणाऱ्या कार्यक्रमापासून त्यांना परावृत्त करणें हें महाकठीण काम होतें ! पण डॉ. महमूद त्या कामाला डरले नाहींत. दररोज सकाळसंध्याकाळ त्यांची अनेक तरुणांशीं चर्चा होत असे आणि त्यांच्यापैकीं कांहीं तरुणांना तरी अखेर कॉ. रॉय यांचीं मतें व विचारसरणी पटली व नंतर ते त्यांच्या नेतृत्वाखालीं त्यांनीं उभारलेल्या चळवळीमध्यें काम करूं लागले.

राष्ट्रीय चळवळीला जरी डॉ. महमूद प्रधान महत्त्व देत होते तरी इतर चळवळींकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें नाहीं. ते हिंदुस्थानांत आले त्या वेळीं कामगारचळवळीची शकलें झालेलीं होतीं. साम्यवाद्यांच्या आग्रही वृत्तीमुळें व अतिजहाल धोरणामुळें कामगारसंघ फूट पडून दुबळे झाले होते. डॉ. महमूद यांनीं कामगारसंघ म्हणजे काय व ते कसे चालवले पाहिजेत याबद्दल कामगार-चळवळींतील कार्यकर्त्यांना शिक्षण द्यावयाला सुरवात केली. त्यांच्या त्या वेळच्या तालमींत तयार झालेले कांहीं कार्यकर्ते आज देखील कामगारचळवळींत काम करीत आहेत. तसेंच कामगार-संघामध्यें पुन्हां परत एकजूट व्हावी असेंहि त्यांनीं जोराचे प्रयत्न केले. त्या प्रयत्नांना त्या वेळीं यश आलें नाहीं. पण पुढें सहासात वर्षांनंतर जेव्हां एकजूट घडून आली त्यावेळीं ती बहुशः डॉ. महमूद यांनी त्या काळांत जो जाहीरनामा तयार केला होता त्याच्या आधारानेंच घडून आली.

अज्ञातवासांत लपूनछपून रहावयाचें त्यामुळें डॉ. महमूद यांना देशामध्यें फारसें हिंडतां आलें नाहीं. तरी देखील ते एकदा कराचीला जाऊन आले व संयुक्तप्रांतांतही त्यांनीं बराच प्रवास केला. पकडले गेले त्याच दिवशीं रात्रीं ते दक्षिणेच्या प्रवासाला निघणार होते, पण तो कार्यक्रम पुरा होऊं शकला नाहीं. मंडळींना भेटण्याच्या बाबतींतही तीच अडचण वेळोवेळीं आड येत असे. केवळ पोलीसांचीच नजर चुकवायची असती तर एवढें कठीण गेलें नसतें. पण साम्यवाद्यांच्या नजरेचीहि त्यांना काळजी घ्यावी लागे. कारण त्यांनाहि डॉ. महमूद नकोसे झालेले होते !

पोलिसांच्या ससेमिऱ्यामुळें डॉ. महमूद यांना राहण्याच्या जागा सारख्या बदलाव्या लागत. पुष्कळ वेळा राहण्याची नीट सोय होत नसे आणि मग नोकरांच्या खोल्यामध्यें अगर गोडाऊनमध्यें त्यांना चारचार पांचपांच दिवस काढावे लागत ! खाण्यापिण्याची तर नेहमीं आबाळ होई. कधींमधीं








ज्याच्या घरीं रहावयाचें तो जेवणाखाण्याची सोय करी. पण तशी सोय झाली नाहीं तर चहा, शेव-चिवड्यावर वेळ भागवून न्यावी लागे. अशा कष्टामध्यें दिवस काढावे लागत होते तरी डॉ. महमूद यांच्या मनाचा तोल कधींहि ढळला नाहीं, त्यांनीं आपली येण्याची वेळ कधीं चुकवली नाहीं किंवा बोलत असतांना आपल्या अडचणींचा कधीं कुणाला पत्ता लागूं दिला नाहीं !

निष्ठावंत अशीं माणसें गोळा करण्याचें डॉ. महमूद यांचें कसब मोठें विलक्षण होतें. अज्ञातवासांत रहात असतांना जर्मनीमधील त्यांच्या एक सह-कारिणी **श्रीमती लू** या त्यांना भेटायला म्हणून मुद्दाम युरोपहून आल्या. त्या वेळीं पोलिसांना अगदीं खात्री वाटत होती कीं त्यांची व डॉ. महमूद यांची ज्या वेळीं भेट होईल त्यावेळीं आपलें सावज आपल्या जाळयांत सांपडेल. म्हणून श्रीमती लू यांच्या हालचालींवर त्यांनीं अगदीं करडी नजर ठेवली होती. पण डॉ. महमूद यांचे सहकारी इतके चतुर होते कीं, त्यांनीं त्या दोघांची गांठ तर घालून दिलीच पण पोलिसला त्यांचा पत्ता लागूं दिला नाही ! एक वेळच नाहीं तर पांचसात वेळां अशा दोघांच्या गांठीभेटी झाल्या. या प्रकारामुळें पोलिस शेवटीं इतके चिडले कीं त्यांनीं श्री. लू यांना अखेर हद्दपार केलें.

**कठोर कर्तव्यबुद्धि**

हिंदुस्थानांत परत आल्यानंतर आज ना उद्यां आपल्याला अटक होणार हें कॉ. रॉय यांना ठाऊक होतें. कानपूर- केस व मीरत- केस या दोन्ही खटल्यां-तील वॉरंटें तयार होतीं, आणि अटक झाल्यानंतर दीर्घमुदतीची शिक्षा होणार याचीहि त्यांना कल्पना होती. त्यामुळें ‘ तुम्ही हिंदुस्थानांत जाऊं नका ’ असें यूरोपमधील त्यांचे पुष्कळ सहकारी त्यांना सांगत होते. पण देशामध्यें सामाजिक क्रांतीचें आंदोलन वाढीला लागलें आहे , त्याला मदत करणें आपलें कर्तव्य होय या जाणिवेनें ते हिंदुस्थानांत परत आले. चळवळीमध्यें उघड रीतीनें भाग घेण्याची संधि लाभण्यासाठीं आठदहा वर्षांचा तुरुंगवास पतकरावा लागेल हें कॉ. रॉय यांना ठाऊक होतें. पण तुरुंगांत रवानगी होण्यापूर्वीं आपले विचार थोडेबहुत तरी पसरविण्याची संधि लाभावी अशी त्यांची फार इच्छा होती. विचार पेरले कीं ते वाढीला लागतील अशी त्यांची खात्री होती. म्हणून डॉ. महमूद म्हणून जे सात महिने त्यांना काम करायला लाभले त्या सात महिन्यांत त्यांनीं हे विचार पेरण्याचें काम अहर्निश केलें. त्या सात महिन्यांत कांहीं मंडळींनीं पोलिसांचा हात पोचणार नाहीं अशा सुरक्षित पण निर्जन स्थळीं त्यांची रहाण्याची सोय करण्याची तयारी दर्शविली. त्या सर्वांना त्यांचें नेहमीचें उत्तर हें असें कीं , “ सुरक्षित रहावयाचें तर युरोप सोडून इथें येण्याचें कारण नव्हतें. चळवळ जिथें वाढत आहे तिथें राहून मला त्या चळवळीला वळण लावण्याचें कार्य करावयाचें आहे. मग तुरुंगवास नशीबीं आला तरी त्याला माझी तयारी आहे. ” या निर्धाराप्रमाणें ते शेवट-पर्यंत मुंबई, लखनौ, कराचीसारख्या राष्ट्रीय आंदोलना-च्या केंद्रस्थानीं राहिले. पोलीस पकडतील म्हणून ते कुठेंतरी सुरक्षित स्थळीं जाऊन दडून राहिले नाहींत.

२१ जुलै १९३१ रोजीं भल्या पहाटे मुंबई येथें पोलिसांनीं डॉ. महमूद यांना अटक केली. त्या वेळीं या त्रिखंड कीर्तीच्या क्रांतिकारकाला अटक करून त्याचा आपण कायमचा कांटा काढला असें ब्रिटिश राजवटीला वाटलें. पण त्यांना ठाऊक नव्हतें कीं त्या क्रांतिकारकानें आपल्या विचारसरणीचें बीज अगोदरच पेरून ठेवलें होतें, आणि त्या बीजामधून लवकरच एक वृक्ष वाढीला लागणार होता. डॉ. महमूद पकडले गेले, पण त्यांनीं पेरलेल्या विचारांना ठिकठिकाणीं अंकुर फुटले आणि रॉयवादी विचारसरणी राष्ट्रीय आंदोलनामध्यें मोठ्या प्रभावानें तळपूं लागली.










श्री. द्वा. भ. कर्णिक

# रॉय यांचें मध्यवर्ती विधिमंडळांत गाजलेलें पत्र !

**कानपूर बोल्शेव्हिक कटाचा खटला** म्हणून जो खटला तीस वर्षांपूर्वी या देशांत गाजला गेला त्या खटल्याच्या निमित्तानें **श्री. एम्. एन्. रॉय** यांचें नांव प्रथम प्रामुख्यानें हिंदी लोकांसमोर आलें. या खटल्यांत तेच प्रमुख आरोपी असावयाचे. पण त्यावेळीं त्यांचें वास्तव्य मॉस्कोंत असल्यामुळें ब्रिटिश साम्राज्यवादी सरकारला त्यांच्यावर झडप घालतां आली नाहीं. पण त्या खटल्यांत गोवण्यांत आलेल्या चार व्यक्तींवर ' राजाविरुद्ध बंड ' करण्याच्या हेतूनें कट केल्याचा जो आरोप ठेवण्यांत आला त्याचा आधार रॉय यांचीं त्यांना आलेलीं पत्रें हाच होता. मानवेन्द्रनाथ हे त्यावेळीं कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे पूर्व – विभागाचे सूत्रधार होते. साहजिकच कम्युनिझमचा प्रचार करणें हाच त्यांच्या पत्रव्यवहाराचा हेतु नसे, तर या देशांत कम्युनिस्ट इंटरनॅशनलची शाखा संघटित करण्याचाहि ते प्रयत्न करीत होते. ब्रिटिश सरकारच्या दृष्टीनें हा प्रयत्न राजद्रोहाच्या स्वरूपाचा नव्हता तर ब्रिटिश सम्राटाचें उच्चाटन करून सशस्त्र क्रांतीच्या मार्गानें बोल्शेव्हिझम् प्रस्थापित करण्याचाहि सरकारला त्यांत वास आला. कानपूर कटाच्या खटल्यांत चार आरोपी होते. (१) नलिनीभूषण दासगुप्ता (२) शौकत उस्मानी (३) मुझफर अहमद (४) श्रीपाद अमृत डांगे. हिंदुस्थानांत मूळ धरूं पाहणाऱ्या सामुदायिक चळवळींतील हे चौघेहि कार्यकर्ते होते. त्यांच्या विचाराची प्रेरणा अर्थातच सोव्हिएट राज्यक्रांति ही होती. कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाबद्दल त्यांना आस्था वाटूं लागली होती व या देशाची स्वातंत्र्याची चळवळ सनदशीर मार्गापुरतीच मर्यादित न करतां सामुदायिक उठावाचाहि अवलंब करून त्या चळवळींत तेज निर्माण केलें पाहिजे अशीहि अस्फुट जाणीव त्यांना होऊं लागली होती. त्यांच्या मनांत या नवविचारांचीं बीजें जर कोणीं अंकुरित केलीं असतील तर ती रॉय यांनीं. रॉय यांना हिंदुस्थानांतील **कम्युनिस्ट चळवळीचे प्रणेते** मानलें जातें तें त्यांनीं केलेल्या या कामगिरीमुळेंच. आजचे कम्युनिस्ट रॉय यांचें हें ऋण मान्य करणार नाहींत. जुन्यापुराण्या वैभवांचें वलय आपल्या सभोंवतीं उभें करण्यांत रॉय यांनाहि कधीं भूषण न वाटल्यामुळें त्यांनींहि उत्तर आयुष्यांत हा दावा केला नाहीं. पण जुन्या इतिहासाचें कुणी संशोधन केलें तर कोणाहि निःपक्षपाती इसमाला क्रांतिकारी कामकरी वा शेतकरी चळवळींतील रॉय यांची कामगिरी दृष्टीआड करतां येणार नाहीं.

एम्. एन्. रॉय या नांवाला २४ ते २८ सालच्या दरम्यान केवढें लोकविलक्षण महत्त्व प्राप्त झालें होतें तें पहावयाचें असेल तर कानपूर कटाचा खटला, मीरत कटाचा खटला आणि १९२८ सालीं ब्रिटिश सरकारनें मध्यवर्ती असेंब्लींत सार्वजनिक सुरक्षेसाठीं ( परदेशीयांचें उच्चाटण करणारा ) जो कायदा आणला होता तो–या सर्वांकडे आपल्याला लक्ष द्यावें लागेल. मध्यवर्ती असेंब्लीचे त्यावेळचे अहवाल पाहिले तर एक गोष्ट प्रामुख्यानें आपल्या नजरेंत भरेल कीं वरील काळा कायदा मंजूर करून घेण्यासाठीं त्यावेळच्या ब्रिटिश सरकारनें एकच बागुलबोवा उभा केला आणि तो म्हणजे एम्. एन्. रॉय यांचें पत्र होय.

सार्वजनिक सुरक्षा–कायदा मध्यवर्ती असेंब्लीपुढें मांडतांना त्यावेळचे हिंदुस्थान सरकारचे गृहमंत्री ना. जे. क्रेरर यांनीं कम्युनिस्ट चळवळीच्या








संकटाची भयसूचक घंटा वाजवितांना एम्. एन्. रॉय यांच्या पत्राचाच प्रामुख्यानें उल्लेख केला. रॉय यांच्या पत्राला त्यापूर्वीच्या झिनोव्हीव्ह यांच्या पत्रा-इतकेंच ऐतिहासिक महत्त्व त्यावेळीं देण्यांत आलें. झिनोव्हीव्ह यांच्या पत्रामुळें ब्रिटनमधील मजूर-सरकार कोलमडून पडलें. रॉय यांचें पत्र हिंदुस्थान सरकारनें अशा रीतीनें रंगविलें कीं जणुं कांहीं त्यांच्या प्रभावानें ब्रिटिश सम्राटाचें हिंदुस्थानांतील राज्य उलथून पडेल !

एम्. एन्. रॉय यांचें म्हणून जें पत्र ना. क्रेरर यांनीं मध्यवर्ती असेंब्लीपुढें मांडलें तें पत्र हेंहि रॉय यांच्या जीवनांतील अनेक रहस्यमय घटनां-प्रमाणेंच एक न उलगडलेलें रहस्य राहिलेलें आहे. सरकारच्या मताप्रमाणें क्रांतिकारक चळवळीची उभारणी कशी करावी याचा मार्ग दाखविणारें हें पत्र रॉय यांनीं मॉस्कोमधून आपल्या हिंदी सहकाऱ्यांना पाठविलें. रॉय यांच्या या पत्रांत हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्ष कशा रीतीनें संघटित करण्यांत यावा हें सूचित करण्यांत आलें होतें. त्यांनीं असें म्हटलें होतें कीं हिंदुस्थानांत कम्युनिस्ट पक्ष कायदेशीर रीत्या अस्तित्वांत आणणें आवश्यक असलें तरी सरकार या पक्षाला उघड रीतीनें काम करूं देणार नाहीं. म्हणून हिंदी कम्युनिस्ट पक्षानें भूमिगत संघटनेचें यंत्रहि त्याच वेळीं तयार केलें पाहिजे. उघड कार्य करण्यासाठीं कामकरी - शेतकरी-पक्ष या नांवाची एकादी संघटना तयार करण्यांत यावी असेंहि त्यांनीं सुचविलें होतें. त्यानंतर पक्षाचें उद्दिष्ट काय असावें, पक्षाचा अंतिम व तात्कालिक कार्यक्रम काय असावा याचीहि त्यांनीं रूपरेखा प्रगट केली होती.

हें रॉय यांचें मुख्य पत्र. त्या पत्राला जोडून जी एक चिठ्ठी रॉय यांनीं लिहिली होती, ती खालील-प्रमाणें होती !

" प्रिय मुझफर,

हें पत्र घेऊन येणाऱ्या इसमाबरोबर एखादी चिठ्ठी दे म्हणजे त्यानें आपलें कार्य पार पाडलें किंवा नाहीं हें मला कळून येईल. आपल्याला या इसमाची किती मदत होऊं शकेल याबद्दल तुझें मतहि कळव. "

या पत्रावर रॉय यांची सही नव्हती. पण सरकारचें म्हणणें असें कीं " रॉय यांनीं आपल्या हस्ताक्षरांत त्या पत्रावर जी थोडीशी खोडाखोड केली होती तें हस्ताक्षर एम्. एन्. रॉय यांच्या हस्ताक्षराचे जे नमुने सरकारनें पूर्वी पकडले होते त्यांच्याशीं जुळतें. म्हणून हें एम्. एन्. रॉय यांचेंच पत्र होय. "

मध्यवर्ती असेंब्लींत ज्या कारणासाठीं या पत्राचा उल्लेख करण्यांत आला होता तें लक्षांत घेऊन त्यावेळच्या विरोधी पक्षीयांनीं या पत्राच्या सत्यते-बद्दलच आक्षेप घेतला. विरोधी पक्षाचे नेते श्री. मोतीलाल नेहरू यांनीं कायदेपंडिताची भूमिका घेऊन सरकारच्या भूमिकेची कठोरपणें चीरफाड केली. त्यांनीं हें दाखवून दिलें कीं रॉय यांचें मुख्य पत्र ३० डिसेंबर १९२७ चें आहे. त्या पत्रासोबत रॉय यांनीं मुझफर अहमद यांना जें खाजगी पत्र लिहिलें होतें त्यावर तारीख ५ फेब्रुवारी १९२८ अशी होती. आणि एडनहून टाकण्यांत आलेल्या या पत्रावर पोस्टाचा शिक्का १६ मे १९२८ चा होता. डिसेंबरमध्यें लिहिलेलें पत्र आठ महिन्यां-नंतर विशिष्ट कारणासाठीं सरकारनें लोकांपुढें आणावें याबद्दल पंडित जवाहरलाल नेहरू यांनींहि त्या सुमाराला एक निवेदन प्रसिद्ध करून आपला तिरस्कार व्यक्त केला होता.

रॉय-पत्राबद्दल पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं खालील प्रकारचें निवेदन प्रसिद्ध केलें होतें :

" 'लीग अगेन्स्ट इंपीरियालिझम'च्या बर्लिनमधील कचेरीकडून मला एक तार आली आहे आणि तींत असें म्हटलें कीं, श्री. रॉय यांच्याकडून म्हणून










आलेल्या पत्राचा जो उल्लेख करण्यांत येत आहे तें पत्र धादांत खोटें आहे असें अधिकृतपणें जाहीर करण्याचा आम्हांला आदेश देण्यांत आला आहे.

" तें पत्र खरें कीं खोटें हें मी सांगूं शकत नाहीं. हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट पक्षानें कोणत्या पद्धतीनें कार्य करावें याविषयीं रॉय यांचीं काय मतें आहेत हेंहि मला माहीत नाहीं. पण केव्हां तरी डिसेंबरमध्यें लिहिलेल्या पत्राला आठ महिन्यानंतर जी प्रसिद्धि देण्यांत येत आहे ती घटना मला घृणास्पद वाटते. ज्या पद्धतीनें व ज्या आविर्भावानें ही प्रसिद्धि देण्यांत येत आहे त्यामुळेंहि संशय अधिकच बळावतो. "

रॉय यांच्या या पत्राला रूटरनेंच प्रथम प्रसिद्धि दिली. आपल्या सिमला येथील वार्ताहराकडून हें पत्र मिळालें असाहि रूटरच्या तारेंत उल्लेख होता. त्यानंतर रूटरनें दुसरी एक तार पाठविली. त्यांत असें म्हटलें होतें : " एम्. एन्. रॉय यांनीं हिंदी राष्ट्रसभेच्या लंडन येथील शाखेला असें कळविलें आहे कीं आपल्या नांवानें रूटरनें जें पत्र प्रसिद्ध केलें आहे तें आपण लिहिलेलें नाहीं. "

श्री. जमनादास मेहता यांनीं असेंब्लींत भाषण करतांना मॉस्कोहून आलेली एक तार वाचून दाखविली. २८ ऑगस्ट १९२८ ची ही तार होती. त्या तारेंत असें म्हटलें होतें कीं " मॉस्को व हिंदुस्थान यांच्यामध्यें संबंध जोडण्याची कामगिरी पंडित जवाहरलाल नेहरू यांच्याकडे सोपविण्यांत आली आहे अशा आशयाचा जो प्रचार करण्यांत येत आहे तो धादांत खोटा आहे. श्री. रॉय यांनीं त्या गोष्टीचा तसेंच त्यांच्या म्हणून मानल्या जाणाऱ्या पत्राचा इन्कार केला आहे व तें पत्र खरें आहे हें सिद्ध करण्यांत यावें, असेंहि रॉय यांनीं हिंदुस्थान सरकारला आव्हान दिलें आहे. "

मध्यवर्ती असेंब्लींत रॉय यांच्या पत्राबद्दल जी विस्तृत चर्चा झाली ती अनेक दृष्टींनीं उद्बोधक तशीच मनोरंजकहि ठरेल. ना. केरर यांनीं रूटरच्या वरील तारेचाहि उल्लेख केला. ते म्हणाले कीं ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षानेंहि या तारेचा इन्कार केला आहे. त्यांनीं पुढें अशीहि माहिती दिली कीं, "ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षानें प्रथम रॉय यांच्यावर ठपका ठेवला होता कीं त्यांनीं हें पत्र लिहून हिंदुस्थान सरकारच्या हातीं दडपशाही करण्यासाठीं जणुं एक कोलीतच दिलें आहे. पण पुढें रॉय यांचा इन्कार आल्यानंतर ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षानें रॉय यांच्यावरील ठपका काढून घेतला." ( ना. केरर यांनीं दिलेल्या वरील माहितीवरून त्या सुमारास रॉय व कम्युनिस्ट पक्ष यांच्यामध्यें मतभेद व्हावयास सुरुवात झाली होती हें स्पष्ट होतें. रॉय यांनीं पुढें कम्युनिस्ट इंटरनॅशनलचा त्याग केला त्याला ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाचा त्यांच्याबद्दलचा हेवादावा हाहि एक प्रकारें कारणीभूत होता हें जगजाहीर आहे.) ना. केरर यांना रॉय यांच्या पत्राच्या सत्यतेबद्दल अणुमात्रहि संशय नव्हता. तें मुळीं ही सत्यता गृहीतच धरून चालले होते आणि कम्युनिस्ट चळवळ हळूंहळूं कसें उग्र रूप धारण करूं पहात आहे व या चळवळीला आंतरराष्ट्रीय पाठिंबा कसा मिळूं लागला आहे याची निर्विवाद साक्ष म्हणूनच ते रॉयपत्राकडे पहात होते.

सरकारला पाठिंबा देणाऱ्या लोकांसहि या पत्राच्या सत्यतेबद्दल किंतु वाटत नव्हता. सर हरिसिंग गौर यांनीं तर जाहीरच केलें : "एम्. एन्. रॉय यांचें पत्र खरें कीं खोटें याची मला पर्वा नाहीं. कारण त्यांचे हस्ताक्षर मला चिऱ्यावर लिहिल्यासारखें स्पष्ट दिसत आहे." मुंबईचे सुप्रसिद्ध गिरणीमालक सर व्हिक्टर ससून यांनीं या पत्राचा उल्लेख करून म्हटलें कीं "हें पत्र खरें किं खोटें हा महत्त्वाचा प्रश्न नाहीं. रॉय यांच्या आदेशानुसार कम्युनिस्ट चळवळ संघटित होत आहे याला खरें महत्त्व आहे." ते पुढें म्हणाले कीं पेकिंगच्या राष्ट्रीय सरकारनें तेथील कम्युनिस्ट मुख्य ठाण्यावर घाला घातला तेव्हां इतर कम्युनिस्ट

कागदपत्रांबरोबर रॉय यांच्या आदेशांच्या अनेक प्रतीहि मिळाल्या हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या वादविवादांत भाग घेणाऱ्या कांहीं सभासदांनीं हास्यास्पद सूचनाहि केल्या. श्री. अहमद यांनीं असा सवाल केला कीं रॉय यांनीं आपल्या हस्ताक्षरांत हिंदुस्थानसरकारला पत्र लिहून आपल्या पत्राचा इन्कार कां करूं नये ?

राष्ट्रवादी सभासदांच्या प्रतिक्रिया अर्थातच त्याविरुद्ध होत्या. सुरक्षा-कायदा त्यांना मंजूर नव्हता आणि म्हणून तो कायदा मंजूर करून घेण्यासाठीं रॉय यांच्या पत्राचा सरकार जो आधार घेऊं पहात होतें तो आधारच त्यांना काढून घ्यावयाचा होता. म्हणून मोतीलाल नेहरू, लाला लजपतराय, श्रीनिवास अय्यंगार, पंडित मदन मोहन मालवीय यांच्यापैकीं प्रत्येकानें रॉय यांच्या पत्राचा उल्लेख करून तें कसें धादांत खोटें आहे हेंच पटवून देण्याचा प्रयत्न केला. या राष्ट्रवादी पुढाऱ्यांना रॉय यांच्याबद्दल सहानुभूति होती असें नव्हे. रॉय यांच्या मतांशीं तर त्यांचा उभा दावा असे. पण रॉय यांना कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्यें किती असाधारण महत्त्व प्राप्त झालेलें आहे याची मात्र त्यांना जाणीव झालेली होती व रशियासारख्या देशांत मानाचें स्थान प्राप्त करून घेणाऱ्या या थोर हिंदी पुरुषाबद्दल साहजिकच त्यांना कुतूहलहि वाटत होतें. ही कुतूहलाची भावना प्रगट करतांना सरकावर कोरडे ओढावयाला मात्र ते विसरत नसत. श्री. दोरायस्वामी अय्यंगार यांनीं या प्रसंगीं भाषण करतांना म्हटलें : " प्रत्येक वेळीं कोणताहि दडपशाहीचा कायदा मंजूर करून घ्यावयाचा असला कीं एम्. एन्. रॉय यांचें पत्र सरकारनें आधीं आणलेंच म्हणून समजावें. बंगाल वटहुकूम काढावयाचा आहे; एम्. एन्. रॉय यांचें पत्र आल्याची कहाणी आम्हांला सांगण्यांत आली ! आतां सुरक्षा–कायदा तयार करावयाचा आहे; एम्. एन्. रॉय यांचा उल्लेख आलाच ! कधीं रिताच होणार नाहीं असा सांठा जणुं एम्. एन्. रॉय यांच्या रूपानें सरकारच्या हातीं आला आहे ! "

त्यानंतर बंगालमधील दोन राजबंद्यांनीं सरकारला सादर केलेला एक अर्ज एका सभासदानें वाचून दाखविला. श्री. रॉय यांच्याकडून आलेलीं कांहीं पत्रें त्यांच्याजवळ सांपडलीं म्हणून त्यांना स्थानबद्ध करण्यांत आलें होतें. दोन राजबंदी आपल्या अर्जांत लिहितात : " हे मानवेंद्रनाथ रॉय हे कोणी चंद्रलोकावरील पुरुष तर नव्हेत असेंच आम्हांला वाटूं लागलें आहे. आम्हांला खरोखर त्यांची माहिती नाहीं. आणि हिंदुस्थानांतील त्यांच्या हस्तकांबद्दल तर आम्हांला काडीचेंहि ज्ञान नाहीं. "

श्री. सी. एस्. रंगा अय्यर यांनीं असेंब्लींत अशाच तऱ्हेचें भाषण करतांना म्हटलें : " श्री. रॉय हे एक क्रांतिकारक असतील. मला त्याबद्दल निश्चित माहिती नाहीं. कारण त्यांना भेटण्याचें भाग्य मला लाभलेलें नाहीं. या देशांत कांहीं क्रांतिकारक आहेत. परदेशांतहि आपले कांहीं क्रांतिकारक रहात आहेत. त्यांना मायदेशीं पत्र पाठवून आपल्या विचारांचा प्रसार करण्याचाहि अधिकार नसावा काय ? "

हिंदुस्थान-सरकार हा अधिकार द्यावयाला तयार नव्हतें इतकेंच नव्हें तर हीं पत्रें हिंदुस्थान-सरकारला आक्षेपार्ह, राजद्रोहात्मक वाटत असत. कानपूर व मीरत कटाचे जे खटले त्या सरकारनें उभारले त्यांचा आधार म्हणजे रॉय यांचीं हीं पत्रेंच होत. तीं पत्रें ज्या कार्यकर्त्यांच्या हातीं आलीं व त्या पत्रांतील आदेशानुसार त्यांनीं या देशांत सामुदायिक चळवळीची उभारणी करण्याचा प्रयत्न केला त्यांना या दोन कटांच्या खटल्यांना तोंड द्यावें लागलें. हीं पत्रें लिहिल्याबद्दल श्री. एम्. एन्. रॉय यांनाहि कालांतरानें तितकेंच जबर शासन भोगावें लागलें.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. मा. पं. शिखरे

# तुरुंगांतील दैनंदिनी

“ **असत्याची पारध करणें हा माझा धंदा आहे**. या कार्याबद्दल माझे कोणी आभार मानणार नाहीं. पण सत्य ही जर केवळ पोकळ कल्पना राहावयाची नसेल, तर कोणीतरी सत्य हें बोलून दाखविलेंच पाहिजे. ” श्री. एम्. एन्. रॉय यांच्या राजकीय व इतर लेखनांतील मुख्य सूत्र कोणतें असें जर कोणी विचारलें तर वरील अवतरणाकडे बोट दाखवून त्या प्रश्नाचें उत्तर देतां येईल. सत्य म्हणजे काय ? असा प्रश्न करून तें पायलेटप्रमाणें पाठ वळवून निघून जात नाहींत, तर ठामपणानें सांगतात कीं “**सत्य** म्हणजे **वास्तवते**शीं मिळती-जुळती असणारी गोष्ट आणि वास्तवता म्हणजे **वस्तुनिष्ठ अस्तित्व.** अस्तित्व म्हणजे काय ? **बदल.** जें बदलत नाहीं, तें अस्तित्वांतच असूं शकत नाहीं. आणि म्हणून बदल म्हणजेच सत्य. बदलत राहणें म्हणजेच सत्य असणें. असे एकामागून एक तर्कशुद्ध निष्कर्ष काढीत ते एखाद्या प्रश्नाच्या गाभ्याला हात घालतात व तो उकलून दाखवितात. नकली दैवतांचा विध्वंस केल्याखेरीज सत्याची प्रतिष्ठापना करतां येणार नाहीं, ही खूणगांठ बांधूनच त्यांनीं असत्याची शिकार करण्याचा धंदा अंगिकारला होता. लौकिक दृष्टीनें हा धंदा त्यांना फायदेशीर झाला नाहीं. त्यांना लोकप्रियतेला आंचवावें लागलें !

“**एका बंदिवानाच्या डायरींतील पानें** ” या मथळ्याखालीं त्यांनीं जे प्रबंध लिहून प्रकाशित केले, त्यांत त्यांच्या मनाची तळमळ उत्कटतेनें व्यक्त झाली आहे. आत्मवृत्त लिहिण्याची कल्पना त्यांना मनापासून आवडत नसे. या प्रबंधांत त्यांनीं स्वतःच्या आयुष्यांतील प्रसंग अथवा स्वतःच्या मनाचा विकास वर्णिलेला नसून प्रसंगीं सुचलेल्या विचारांचीं तीं टिपणें आहेत. बरेलीच्या तुरुंगामधील त्यांच्या खोलींत एक दिवस मांजर शिरलें. त्याला त्यांनीं दूध प्यावयास दिलें व त्यामुळें त्या दोघांची मैत्री जमली. तें मांजर त्यांच्या खोलींतच राहूं लागलें. त्या मांजराच्या वर्तणुकीच्या मागें कोणत्या मानसिक क्रिया असल्या पाहिजेत याचा मानसशास्त्रदृष्ट्या विचार करतां करतां व टिपणें करतां करतां ‘ **एका मांजराच्या आठवणी** ’ (दि मेम्वॉर्स ऑफ ए कॅट’) या प्रबंधाचा आराखडा तयार झाला. विश्रांतीच्या वेळीं एका विचारांतून दुसरा विचार निघतो, दुसऱ्यांतून तिसरा अशी सांखळी तयार होत होत कितीतरी विषय त्या सांखळींत गुंफले व गुंतले जातात. हे विचार कांहीं पद्धतशीर, कांहीं विस्कळित, कांहीं पूर्ण, कांहीं अपूर्ण असे असतात. मनांतील हे विचार कागदावर उतरले गेले, म्हणजे ते कांहीं विशिष्ट सूत्रांत ओंवले गेले आहेत असें आढळून येतें. फुलमाळ्यानें आणून ठेवलेल्या हाऱ्यांतून अलगद एकादा दोरा ओढावा, तों संपूर्ण हार हातीं यावा, तसेंच कांहींसें या टिपणांबाबत झालें असावें. कारण ‘मांजराच्या आठवणीं’प्रमाणेंच “**हिंदी स्त्रीजीवनाचें ध्येय**” (‘The Ideal of Indian Womanhood’) व “ **तुरुंगांतून धाडलेलीं पत्रें** ” (‘Letters from Jail’ ) हे ग्रंथ या टिपणांतूनच तयार झाले आहेत.

‘ हिंदी राजकारणांतील रहस्यमय पुरुष ’ म्हणून ज्याचा लौकिक तुरुंगांतून सुटून येतांच चोहींकडे झाला, त्याच्या खासगी जीवनाबद्दलचें कुतूहल साहजिकच लोकांच्या मनांत उत्पन्न झालें. पण इतर प्रदर्शनवादी पुढाऱ्यांप्रमाणें श्री. रॉय यांनीं कधींहि आपलें खाजगी जीवन हा वर्तमानपत्री चर्चेचा व चिकित्सेचा विषय होऊं दिला नाहीं. खाजगी जीवन हें खाजगीच राहिलें पाहिजे असा त्यांचा कटाक्ष होता. त्यांचें वैचारिक जीवनांत मात्र कोणालाहि मुक्तद्वार असे. पण हें जीवन इतकें तेजाळ



अनुक्रमणिका

व दाहक असें, कीं त्यासन्निध जाणाऱ्याचा वैचारिक कायापालट तरी होई किंवा भयानें तो स्वत:ची लक्तरें सांवरीत तेथून घाईघाईनें निघून तरी जाई.

वरील तीन पुस्तकें म्हणजे श्री. रॉय यांच्या वैचारिक जीवनप्रासादाच्या पायऱ्याच आहेत. फावल्या वेळांत केलेलीं टिपणें असें जरी त्यांचें वर्णन केलें असलें तरी त्यांतील विचार इतके तर्कशुद्ध व प्रखर आहेत, कीं ते वाचतांना आतांपर्यंत मनांत रुजलेल्या कल्पना व मूल्यें झंझावातांत सांपडलेल्या वृक्षांप्रमाणें मुळांपासून गदगदा हलूं लागतात. भांबावून गेलेला वाचक पुस्तक बाजूला ठेवून स्वस्थ बसण्याचा प्रयत्न करूं लागतो, तों ते विचार मस्तकांत वाढत्या गतीनें पिंगा घालूं लागतात. सत्याचा ज्याला ध्यास आहे, त्याचें स्वरूप जाणण्याची ज्याला इच्छा आहे, त्यानेंच या पुस्तकांचें वाचन करावें.

पण तरी देखील हे प्रबंध म्हणजे कोणा वेदाभ्यासजड पंडितानें लिहिलेले आहेत व ते सामान्य माणसाला कळणें कठीण अशी कल्पना करून घेणें मात्र चुकीचें ठरेल. अगदीं सर्वांना हे विचार समजतील. ते विचार ज्यानें व्यक्त केले आहेत त्या पुरुषाच्या मनाचें प्रतिबिंबहि त्यांत पडलेलें त्याला दिसेल. आवेश, संताप, उपरोध, उपहास, सहानुभूति, आशा यांचा प्रत्यय वाचकाला येईल. 'तुरुंगांतून पाठविलेल्या पत्रां'त तर या महान् पुरुषाच्या मनोज्ञ व्यक्तिमत्त्वाचें किंचित् दर्शनहि होईल. कर्तव्यकठोर पण संवेदनक्षम अशा मनाबद्दल वाचकाला विलक्षण आकर्षण वाटेल. युरोपांतील जहाल चळवळीचा चित्रपट या पुस्तकांत आपल्या नजरेसमोरून जातो. त्या चळवळींत भाग घेऊन महापदास चढलेल्या अनेक पुढाऱ्यांचें अगदीं जवळून दर्शन आपणांस घडतें. जुन्या आठवणी, ताटातूट झालेले मित्र, भावी काळाची आशा, जग बदलून टाकण्याची महत्त्वाकांक्षा, हिंदी जनतेच्या उद्धाराची तळमळ या सर्वांचें उत्कट चित्रण या पुस्तकांत पाहावयास मिळतें. एके ठिकाणीं ते म्हणतात : "हें जग फार निर्दय आहे. आपल्यासारख्या निरुपद्रवी लोकांना किती त्रास भोगावा लागतो ! पण आपण हें जगच बदलून टाकूं ! " पूर्ण विकसित झालेल्या, प्रत्येक घडामोडीला प्रतिसाद देणाऱ्या, आधुनिक, संपन्न, संवेदनक्षम व तरल मनाचें दर्शन या पुस्तकांत घडतें.

'एका मांजराच्या आठवणी' व 'हिंदी स्त्रीजीवनाचा आदर्श' हीं पुस्तकें वरील पुस्तकांपेक्षां वेगळया स्वरूपाचीं आहेत. 'The Memoirs of a Cat' या पुस्तकांत 'Why One Is Born' व 'The Ideal of Indian Womanhood' या पुस्तकांत 'Some Random Reflections' या प्रबंधांचा समावेश करण्यांत आला आहे. भारतीय लोकांत वाढदिवस साजरा करण्याची चाल कां नाहीं या प्रश्नाचा विचार करून त्यांनीं "Why One Is Born" या प्रबंधांत जे निष्कर्ष काढले आहेत ते मननीय आहेत. ऐहिक गोष्टींबद्दलची भारतीयांची अनासक्ति ही त्यांच्यावर लादलेली आहे. परंपरा व धार्मिक तत्त्वप्रणाली यांच्या वर्चस्वामुळेंच जीवन उत्स्फूर्तपणें जगण्याला त्यांना प्रतिबंध होतो. परंतु जीवनाबद्दलची उदासीनता हा कांहीं सद्गुण नव्हे; वैचारिक स्वातंत्र्य, नैतिक उत्कर्ष एवढेंच नव्हे तर प्रामाणिक श्रद्धा हीं या उदासीनतेमुळें चेपली जातात असें सांगून ते म्हणतात : " हिंदी जनतेला जीवनांतील आनंदाचा उपभोग घेऊं द्या म्हणजे तें खऱ्या आध्यात्मिक मूल्यांनीं बहरून जाईल. भारतीयांना जीवनाची गोडी एकदां लागली म्हणजे एक आपत्ति म्हणून जीवनापासून दूर जाण्याऐवजीं ते जीवनाचा एक वरदान म्हणून स्वीकारच करतील. "

रॉय यांची जन्मकुंडली उपलब्ध नाहीं. त्यांच्या आईबापांचा ज्योतिषावर विश्वास नसावा, म्हणून त्यांनीं ती तयार केली नसावी. मानवी जीवनावर आकाशस्थ

ग्रहगोल वर्चस्व चालवीत असतात हा एक लोकभ्रम आहे असें म्हणून त्यांनीं या विषयाची कठोर तर्कानें तपासणी केली आहे व विज्ञानाच्या कसोटीस ज्योतिष-शास्त्र उतरत नाहीं, अतएव आपण या भ्रमांतून मुक्त झालें पाहिजे असें सांगितलें आहे. हा सर्वच प्रबंध वाचनीय व मननीय आहे. शैली सुबोध परंतु घाटदार आहे. मध्यान्हींच्या भर उन्हांत तळपत्या संगिनी घेऊन सैनिकांच्या पलटणीच ठेक्यांत पावलें टाकीत आपल्या मनश्चक्षूंसमोरून चालल्या आहेत असा भास हा प्रबंध वाचतांना आपल्याला होतो.

" हिंदी स्त्रीजीवनाचा आदर्श " या प्रबंधांत महात्मा गांधीजींच्या नैतिक तत्त्वप्रणालीचा प्रथम सडेतोड परामर्श घेण्यांत आला आहे, आणि नंतर भारतीय परंपरेनें हिंदी स्त्रियांपुढें जे आदर्श ठेवले आहेत ते किती नकली व ढोंगीपणाचे आहेत हें सिद्ध करून त्यांचा उगम प्रतिगामी सामाजिक तत्त्वज्ञानांत कसा आहे हें दाखविलें आहे. आधुनिक स्त्री ही पुरुषांबरोबर झगडत नसून जी सामाजिक रूढि व चौकट तिला पुरुषी वर्चस्वाखालीं चेपून ठेवते, तिच्याशीं झगडत आहे व आर्थिक स्वातंत्र्य हीच तिची मूलभूत मागणी असून सध्यांच्या ढांसळत्या सामाजिक पद्धतीमुळें तयार झालेली कोंडी फोडण्याचा एकच मार्ग म्हणजे भारतीय स्त्रीला आर्थिक स्वातंत्र्य मिळवून देणें हा होय असा निष्कर्ष श्री. रॉय यांनीं काढला आहे. हा प्रबंध म्हणजे त्यांच्या वादकुशलतेचा उत्तम नमुना आहे. त्यांतील विचार प्रत्येक स्त्रीस्वातंत्र्यवादी भारतीयानें वाचून मनन केले पाहिजे.

आवेश, उपहास, नकली दैवतांबद्दलचा तिरस्कार, लोकप्रियतेचा अधिक्षेप या श्री. रॉय यांच्या स्वभावांतील प्रवृत्तींचा आविष्कार ' Some Random Reflections ' या प्रबंधांत झालेला आढळतो. हिंदी राष्ट्रवादाचें तत्त्वज्ञान कसें फसवें व धोकेबाज आहे याचें उत्कृष्ट विवरण यांत आहे. राजकीय क्रांति ही सामाजिक पुनरुज्जीवनाची नांदी म्हणूनच होत असते हा महत्त्वाचा सिद्धांत मांडून त्यांनीं हिंदी राष्ट्रवादाची तपासणी केली आहे. राष्ट्रवाद हा समाजवादी कार्यक्रम अंगीकारूं शकत नाहीं, पण यशस्वी व्हावयाचें असेल तर राष्ट्रवादानें क्रांतिकारक सामाजिक दृष्टिकोण स्वीकारून लोकशाही स्वातंत्र्याची स्थापना केली पाहिजे असें ठाम मत त्यांनीं मांडलें आहे. या प्रबंधांतील कांहीं प्रमेयें व सिद्धान्त आज युद्धोत्तर-कालांत तितके बिनतोड वाटले नाहींत, तरी रॉय यांची त्या काळांतील विचारधारा समजूत घेण्याच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व आहेच. हीं प्रमेयें व सिद्धान्त आज कितपत बरोबर व ग्राह्य आहेत हें त्यांचे गेल्या कांहीं वर्षांतील लिखाण वाचूनच ठरवितां येईल.

रॉय यांनीं राजकारण, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र व इतिहास या विविध विषयांवर आपले विचार विस्तृतपणें मांडणारें विपुल लेखन केलें आहे. त्यांचें लेखन कालक्रमानें वाचल्यास त्यांच्या विचारांत कसा बदल होत गेला हें समजून येईल. सत्य हें एकसारखें विकसित होत असतें, बदलत असतें. विचारांना व कल्पनांना स्वतःची गति असते ह्या त्यांच्या मूलभूत सिद्धान्ताचा प्रत्यय त्यांच्या स्वतःच्या लेखनांतहि येतो. प्रस्तुत लेखांत त्यांच्या **'एका बंदीवानाच्या डायरींतील पानें'** या मथळ्याखालील तीन ग्रंथांचाच मात्र त्रोटक परामर्श घेण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचा हेतु श्री. रॉय यांच्या चैतन्यशील विचारांबद्दल जिज्ञासा निर्माण करणें एवढाच आहे. मागील पिढ्यांसाठीं त्यांनीं आपल्या विचारधनाचा वारसा ठेवला आहे. आजच्या आणीबाणीच्या व गोंधळाच्या कालखंडांत मार्गदर्शन होण्यासाठीं कोणालाहि या विचारांची मदत झाल्याखेरीज राहणार नाहीं.

---










श्री. वि. म. तारकुंडे

# कॉंग्रेस, रॉय व रॅडिकल पक्ष

सहा वर्षांच्या तुरुंगवासानंतर ता. २० नोव्हेंबर १९३६ रोजी मानवेन्द्रनाथ रॉय बंधमुक्त झाले. लगेच ते कॉंग्रेसमध्यें समाविष्ट झाले. पुढें सन १९३९च्या एप्रिल महिन्यांत त्यांनीं ' League of Radical Congressmen ' नांवाच्या कॉंग्रेसान्तर्गत गटाची स्थापना केली. नंतर कॉंग्रेसचा राजिनामा देऊन सन १९४०च्या डिसेंबर महिन्यांत ' रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी ' असा स्वतंत्र राजकीय पक्ष त्यांनीं निर्माण केला. पुढें ता. २९ डिसेंबर १९४८ रोजीं त्या राजकीय पक्षाचें विसर्जन करून त्यांनीं ' नव-मानवतावादी ' वैचारिक व सामाजिक आंदोलनाचा पाया घातला. १९३६ पासून १९४८ पर्यंतचा बारा वर्षांचा काळ हा रॉय यांच्या विचारपरिवर्तनाचा काळ गणतां येईल. या काळांत त्यांचे विचार परिपक्व झाले. विचारपरिवर्तन अनेकांचे होतें; परंतु अनुभवी व विचारी माणसाच्या विचारपरिवर्तनाला महत्त्व असतें. त्यांतून रॉय यांचा राजकीय अनुभव अगदींच असाधारण होता. त्यांची बुद्धि अतिशय कुशाग्र तशीच व्यापक होती. ती जितकी आकलनशील तितकीच सृजनशील होती. व त्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेला अचल बुद्धिनिष्ठेची जोड होती. अशा गुणसमुच्चयामुळें त्यांच्या विचार-परंपरेला ऐतिहासिक महत्त्व आहे.

हल्लींचा काळ हा क्रांतिकाळ आहे. आणि रॉय तर हाडामांसाचे क्रांतिवादी होते. परंतु कोणत्याहि यशस्वी सामाजिक क्रांतीला योग्य अशा वैचारिक क्रांतीचा पाया लागतो असा रॉय यांचा दृढ सिद्धान्त होता. तुरुंगांत असतांनाच इतिहासाच्या व तत्त्वज्ञानाच्या परिशीलनांतून त्यांनीं तो सिद्धान्त काढला होता. आधीं विचार मग आचार हाच मानवी प्रगतीचा मार्ग आहे. क्रान्तिकाळाचें मुख्य लक्षणच हें असतें कीं त्या काळांत ज्या विविध विचारमालिका प्रतिष्ठित व लोकप्रिय असतात त्या पुढील मार्गदर्शन करूं शकत नाहींत. रॉय यांनीं प्रथम राष्ट्रवादाची कास धरून धडाडीनें कार्यास प्रारंभ केला; पुढें राष्ट्रवादाचा उथळपणा लक्षांत येतांच त्यांनीं कम्युनिझम्‌चा स्वीकार करून तितक्याच हिरीरीनें कार्य केलें; नंतर कम्यूनिझम्‌मधील दोष दिसून येऊं लागतांच त्यांनीं आपला स्वतंत्र मार्ग आंखण्यास सुरवात केली; व बारा वर्षें तसा प्रयत्न करून शेवटीं नव-मानवता-वादाची उभारणी केली. एखादी आधींच लोकप्रिय झालेली विचारसरणी अंगीकारून राजकीय पुढारीपण मिळविण्याची कर्तबगारी त्यांच्यांत पूर्णांशानें होती. परंतु ते आपल्या बुद्धीशीं सदैव प्रामाणिक राहिले, व राजकीय पुढारीपणाचा व लोकप्रियतेचा सोपा मार्ग सोडून नवीन विचारप्रणाली निर्माण करणें व तिचा फैलाव करणें हीं दुर्घट कार्यें त्यांना हातीं घ्यावीं लागलीं. ते खरे क्रांतिवादी असल्यामुळेंच क्रान्तिपूर्व काळाचे पुढारी न होतां युगान्तराचे मार्गदर्शक झाले.

सन १९३६ सालीं हिंदी राजकारणांत उघडपणें पदार्पण करतेवेळीं रॉय यांची हिंदी राजकारणाविषयींचीं व पक्षोपपक्षाविषयींचीं मतें सारांशरूपानें खालीलप्रमाणें होतीं : ब्रिटिश नोकरशाहीच्या जागी हिंदी नोकरशाही प्रस्थापित करणें म्हणजे स्वातंत्र्य नव्हे या विचारास रॉय यांनीं यापूर्वींच चालना दिली होती. हिंदुस्थानला अन्तर्गत क्रान्तीची आवश्यकता आहे, व अशा क्रान्तीं-तूनच ब्रिटिश राजवटीचें उच्चाटन करण्याची लोक-शक्ति निर्माण होईल, असें त्यांचें म्हणणें होतें. परंतु हिंदुस्थानसारख्या कृषिप्रधान देशाला समाजवादी क्रान्तीचा आदेश देणें अकालीन आहे; त्यासाठीं लागणारा स्वतंत्र व करारी असा मजूरवर्ग हिंदु-स्तानांत नाहीं. उलट दीडशें वर्षांपूर्वीं फ्रान्समध्यें जशी लोकसत्ताक क्रान्ति झाली तशी क्रान्ति हिंदु-स्तानांत झाली पाहिजे. फरक हा कीं हल्लींच्या भांडवलशाहीच्या पडत्या युगांत हिंदी भांडवलदार वर्ग क्रान्तिवादी राहूं शकणार नाहीं; दलित वर्गांच्या भीतीनें तो ब्रिटिश राजवटीशीं तडजोड करण्याची












वृत्ति ठेवील म्हणून हिंदुस्तानांतील लोकसत्ताक क्रान्ति सुशिक्षित पण निर्धन अशा मध्यमवर्गानें शेतकरी, कामगार वगैरे इतर दलित समाजाच्या साहाय्यानें घडवून आणली पाहिजे. शिवाय रॉय यांचें असें मत होतें कीं काँग्रेसच्या राष्ट्रीय चळवळींत जरी हिंदी भांडवलशाहीचें प्राबल्य असलें तरी ती चळवळ बहुजनसमाजाची असल्यामुळें तिचें क्रांतिवादी आंदोलनांत रूपान्तर करणें शक्य आहे. त्यासाठीं रॉय यांच्या मतें मुख्यतः दोन गोष्टींची आवश्यकता होती: एक तर, काँग्रेसमध्यें काम करून शेतकरी व कामगार यांच्या आर्थिक स्वातंत्र्याचा कार्यक्रम काँग्रेस स्वीकारील असा प्रयत्न करावा. दुसरें असें कीं, हिंदी राष्ट्रीय चळवळ ही अंधश्रद्धा, कर्मवाद, धर्मभोळेपणा अशा स्वातंत्र्यविन्मुख प्राचीन विचारसरणीवर व अर्वाचीन प्रागतिक तत्त्वांच्या विद्वेषावर आधारली असल्यामुळें खऱ्या स्वातंत्र्यप्राप्तीस असमर्थ आहे; म्हणून ज्याप्रमाणें युरोपमध्यें फ्रेंच राज्यक्रान्तीपूर्वी 'रिनैसान्स'ची व्यक्तिस्वातंत्र्यास परिपोषक अशी वैचारिक क्रान्ति झाली तशी क्रान्ति हिंदुस्तानांत घडवून आणण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. वरील दोन्ही बाबतींत रॉय यांना गांधीवादास सामना द्यावा लागला. त्यांपैकीं पहिल्या कार्यांत रॉय यांना काँग्रेसमध्यें काम करून थोडेंबहुत यश मिळवितां आलें; दलितसमाजाच्या आर्थिक कार्यक्रमाला काँग्रेसमध्यें महत्त्व मिळूं लागलें. परंतु राष्ट्रीय चळवळीला प्रागतिक विचारांचें अधिष्ठान देणें मात्र शक्य झालें नाहीं. एवढेंच नव्हें, तर रॉय यांच्या अनुयायांनाहि या कार्याचें महत्त्व त्या वेळीं उमगलें नाहीं; आणि आपणहि इतर व्यवधानांत व राजकारणाच्या धकाधकींत या मौलिक कार्याला द्यावें तितकें लक्ष त्या वेळीं दिलें नाहीं असें रॉयहि नंतर म्हणत असत. अर्थात हें कार्य दोन-चार वर्षांत होईल अशी कोणाचीच अपेक्षा नव्हती परंतु राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळून आज सात वर्षें झाली तरी हिंदी जनतेची कोणत्याच दृष्टीनें विशेष प्रगति झाली नाहीं. याचें कारण वैचारिक व सांस्कृतिक मागासलेपणा हेंच आहे.

कम्युनिस्ट पक्षाचें काँग्रेसविषयीचें धोरण १९३६ पूर्वी व त्यानंतरहि धरसोडीचें होतें. कधी भांडवलशाही पक्ष म्हणून काँग्रेसला विरोध करायचा, तर कधीं राष्ट्रीय पक्ष म्हणून काँग्रेसमध्यें समाविष्ट व्हायचें, असें कम्युनिस्टांचें धोरण वेळोवेळीं बदलत असे. राष्ट्रीय चळवळीचें लोकसत्ताक क्रान्तिवादी चळवळींत रूपान्तर करण्याच्या योजनेविषयीं रॉय यांना कम्युनिस्ट कधीं भांडवलदारांचे बगलबच्चे तर कधी साम्राज्यशाहीचे एजंट अशीं शेलकीं विशेषणें आपल्या नेहमीच्या शिरस्त्यास अनुसरून देत असत. काँग्रेस-समाजवादी पक्ष रॉय यांना जास्त जवळचा वाटे. परंतु समाजवादी लोकांनीं काँग्रेसमध्यें ' समाजवादी पक्ष ' काढणें म्हणजे स्वतःस बहुजनसमाजाच्या लोकसत्ताक चळवळीपासून निष्कारण अलिप्त ठेवण्यासारखें आहे असें रॉय यांचें म्हणणें होतें. काँग्रेस-समाजवादी पक्षानें समाजवादी धोरण आंखलें तर त्यांना काँग्रेसचा त्याग करावा लागेल, आणि राष्ट्रीय धोरण अंगिकारलें तर तत्कालीन काँग्रेस-पुढारीपणाला शरण जावें लागेल, असें त्यांचें भाकित होतें. समाजवादी कार्यकर्त्यांनीं काँग्रेसमध्यें लोकसत्ताक क्रान्तिवादाचा फैलाव करावा, व समाजवादी पक्ष काढून सतत अल्पसंख्याक न रहातां काँग्रेसमध्यें क्रान्तिवादी पुढारीपण प्रभावी करावें असा रॉय यांचा सल्ला होता. हा विचार पटून बरेच समाजवादी कार्यकर्ते रॉय यांना मिळाले. पुढें १९३९ मध्यें त्रिपुरी काँग्रेसनंतर रॉय यांनीं आपल्या मतप्रसारासाठीं ' जहाल काँग्रेस गट ' ( League of Radical Congressmen ) स्थापन केला, त्यावेळीं रॉय यांची विचारसरणी पटल्यामुळें व सुभाषबाबूंविरुद्ध काँग्रेसपुढाऱ्यांनीं ज्या कारवाया केल्या त्यांचा वीट येऊन काँग्रेसमधील अनेक तरुण कार्यकर्ते रॉय यांच्या लीगला येऊन मिळाले.

काँग्रेस-चळवळीचें लोकसत्ताक क्रान्तिवादी चळवळींत रूपान्तर करण्याचा रॉय यांचा कार्यक्रम १९३९ पर्यंत अवघ्या तीन वर्षांत झपाट्यानें लोकप्रिय होत गेला, व गेल्या महायुद्धामुळें त्यांत व्यत्यय आला नसता तर तो जास्त यशस्वी होण्याची शक्यता होती. महायुद्धांत हिंदी जनतेच्या भावना साहजिकच ब्रिटनविरोधी होत्या. शिवाय हिंदी राष्ट्रीय चळवळ व्यक्तिस्वातंत्र्याच्या व लोकशाहीच्या स्फूर्तीवर आधारलेली नसल्यामुळें तिला फॅसिझमचें फारसें वावडें नव्हतें. उलट, विभूतिपूजेवर व अंधश्रद्धेवर आधारलेली हिंदी राष्ट्रीय चळवळ फॅसिझमला परिपोषक अशीच होती. महायुद्धाच्या प्रारंभीं फॅसिस्ट राष्ट्रांना विजयावर विजय मिळूं लागले. त्यामुळें हिंदी जनतेला व बहुतेक सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यां-








ना आत्मघातकी मुत्संवेदना होऊं लागल्या. जे थोडे पुढारी फॅसिझमचे विरोधक होते ते त्याहिपेक्षां जास्त प्रमाणांत ब्रिटनचे विरोधक होते. राजगोपालाचारीसारख्या कांहीं राजकारणपटूंनीं अशी टूम काढली कीं, ब्रिटननें हिंदुस्तानला स्वातंत्र्य दिलें तर हिंदुस्तान युद्धकार्यांत थोडीफार मदत करील; नाहींतर फॅसिझमचा जागतिक विजय झाला तर खुशाल होवो! परंतु रॉय यांचें सर्व राजकीय जीवन व्यक्तिस्वातंत्र्याच्या जोपासनेंत गेलें होतें. त्यांना फॅसिझमखालीं मानवांचे पशु कसे होतात याची जिवंत जाणीव होती. फॅसिझमचा जागतिक विजय झाला तर तशा अंधारो युगांत हिंदुस्तानला लोकसत्ताक स्वातंत्र्य मिळण्याची आशाहि राहणार नाहीं, हें त्यांना स्पष्टपणें दिसत होतें. उलट, महायुद्धामुळें ब्रिटिश साम्राज्यशाहीचा आधींच गडगडलेला आर्थिक पाया पूर्णपणें खचेल, हिंदुस्तानला पारतंत्र्यांत ठेवण्यापासून ब्रिटिश भांडवलशाहीला आर्थिक फायदा राहणार नाहीं, उलट ब्रिटिश राजकारणांतील भांडवलशाहीचें वर्चस्वच फॅसिझमविरोधी युद्धांत नष्ट होईल, व म्हणून ब्रिटनच्या विजयामुळें हिंदुस्तानचें पारतंत्र्य दृढतर न होतां स्वातंत्र्य सुसाध्यच होईल असें रॉय यांचें मत होतें. ज्या वेळीं बहुतेक सर्व जनता फॅसिस्ट राष्ट्रांच्या विजयामुळें हर्षनिर्भर झाली होती व कांहीं थोडे फॅसिझमविरोधी लोक युद्धांत तटस्थ राहण्याची भाषा भीतभीतच करीत होते, त्यावेळीं रॉय हे एकटेच हिंदुस्ताननें युद्धांत विनशर्त साहाय्य करावें अशा मताचे झाले. रॉयसारख्या जहालांत अतिजहाल समजल्या जाणाऱ्या राजकीय पुढाऱ्यानें, बहुजनसमाजाच्या युद्धविषयक भावना पूर्णपणें माहीत असतांना, विनशर्त युद्धसहकार्याचा निर्णय घ्यावा व तो निर्णय जाहीर करून त्याचा पुरस्कार करावा, यांतच रॉय यांच्या असामान्य व्यक्तिमत्त्वाचें, अलौकिक मनोधैर्याचें व अचल बुद्धिनिष्ठेचें सार आहे.

रॉय यांचा युद्धसहकार्याचा निर्णय प्रथम त्यांच्या अनुयायांपैकीं एकालाहि मान्य नव्हता! त्यासाठीं त्यांनीं १९४०च्या मे महिन्यांत डेराडून येथें एक कॅंप घेतला, व नंतर 'हिंदुस्तान व महायुद्ध' ('India and War') या नांवाचें एक छोटें पुस्तक प्रसिद्ध केलें. राजकीय विश्लेषणाचा एक आदर्श म्हणून अजूनहि तें छोटें पुस्तक पठण करण्यासारखें आहे. रॉय यांच्या प्रखर बुद्धितेजाची त्यांत प्रचीति होते.

युद्धविषयक तीव्र मतभेदामुळें कॉंग्रेसचा त्याग करणें रॉय यांना अपरिहार्यच होतें. कॉंग्रेसचा राजिनामा देऊन १९४०च्या डिसेंबर महिन्यांत त्यांनीं 'रॅडिकल डेमोक्रॅटिक पार्टी'ची स्थापना केली. भावी स्वतंत्र हिंदुस्थानच्या राज्यघटनेची १८ मूलभूत तत्त्वें आंखून ती मान्य असणारांनीं पक्षांत यावें अशी 'रॅडिकल पार्टी'ची घटना होती.

अपेक्षेप्रमाणें युद्धसहकार्याच्या प्रचारांत रॉय यांना सतत विरोध, गैरसमज, निर्भर्त्सना यांना तोंड द्यावें लागलें. महायुद्धाच्या सुरवातीस नाझी जर्मनी व कम्युनिस्ट रशिया यांच्यांत तह झाला होता; तरीपण महायुद्धांत कम्युनिस्ट रशिया दोस्तराष्ट्रांच्या बाजूनेंच गोवला जाईल असें भाकीत रॉय यांनीं आपल्या वास्तववादी युद्धविश्लेषणांतून केलें होतें. तें एतद्देशीय कम्युनिस्टांनाहि मान्य नव्हतें व त्यांचें धोरण युद्धविरोधाचेंच होतें. पुढें १९४१ च्या जून महिन्यांत जर्मनीनें रशियावर स्वारी केली तेव्हां रॉय यांचें भाकित खरें ठरलें. व त्यामुळें त्यांच्या कार्यक्रमाच्या निर्दोषतेची प्रचीति येऊन बरेच कार्यकर्ते रॅडिकल पक्षाला मिळाले.

महायुद्धांत फॅसिस्ट राष्ट्रांचा पराजय होणार अशीं चिन्हें दिसूं लागतांच रॉय यांच्या सूचनेनुसार रॅडिकल पक्षाच्या प्रचारपद्धतींत फरक करण्यांत आला. हिंदी स्वातंत्र्याची चळवळ ही नकारात्मक नसावी. ती परदेशी सत्तेच्या द्वेषावर न उभारतां, आर्थिक उन्नति व राजकीय स्वायत्तता याविषयींच्या जनतेच्या आकांक्षावर आधारलेली असावी, असा रॉय यांचा प्रथमपासून आग्रह होता. ही कल्पना प्रथम १९२१ सालीं अहमदाबाद – कॉंग्रेसकडे रॉय यांनीं मॉस्कोहून एका अनावृत पत्रानें पाठविली होती व नंतर वेळोवेळीं कॉंग्रेसपुढें ठेवली होती. १९४४ च्या सुरवातीस फॅसिझमच्या पराजयाचीं चिन्हें दिसूं लागतांच रॉय यांनीं आपल्या कांहीं सहकाऱ्यांच्या व विशेषतः प्रा. पारीख यांच्या मदतीनें स्वतंत्र हिंदुस्तानच्या आर्थिक विकासाची एक योजना तयार केली व ती 'जनतायोजना' (People's Plan) या नांवाखालीं प्रसिद्ध केली. झारिया










येथें १९४४ च्या मे महिन्यांत भरविण्यांत आलेल्या रॅडिकल पक्षाच्या खास अधिवेशनांत ती पास झाली. हिंदुस्तानची औद्योगिक उन्नति शेतकरी समाजाच्या क्रयशक्तीवर व सुस्थितीवर अवलंबून आहे, व म्हणून जमीनदारी प्रथा नष्ट करणें, लहानमोठीं धरणें बांधणें, ओसाड जमिनी लागवडीस तयार करणें वगैरे उपायांनीं शेतकीला ऊर्जितावस्था आणणें या कार्याला जनता-योजनेंत पहिलें स्थान देण्यांत आलें. तसेंच उद्योगधंदे व व्यापार शक्य तों सहकारी संस्थांमार्फत चालावा असेंहि तत्त्व या योजनेंत गोवलेलें होतें. आज जी पंचवार्षिक योजना अमलांत आहे त्यांत वरील तत्त्वें कांहीं अंशीं स्वीकारण्यांत आल्याचें दिसून येतें.

यानंतर रॉय यांनीं भावी स्वतंत्र हिंदुस्तानची एक राज्यघटना तयार केली. व ती रॅडिकल पक्षाच्या डिसेंबर १९४४ मध्यें भरलेल्या कलकत्ता अधिवेशनांत पास झाली. '**स्वतंत्र हिंदुस्तानची राज्यघटना**' (Constitution of Free India) म्हणून ती प्रसिद्ध झाली. रॉय यांच्या मतानें खऱ्या लोकशाहींत राजकीय सत्ता सदोदित जनतेच्या हातीं राहिली पाहिजे व दैनंदिन राजकारणांत जनतेला भाग घेतां आला पाहिजे. पार्लमेंटरी पद्धतीच्या लोकशाहींत जनता चारपांच वर्षांनीं एकदा आपले राज्यकर्ते निवडते व नंतर पुढील निवडणुकीपर्यंत शक्तिहीन राहाते. बलशाली राष्ट्र व बलहीन जनता अशी वस्तुस्थिति बदलण्यासाठी लोकशाही तळापासून संघटित केली पाहिजे, ठिकठिकाणीं स्थानिक समित्या निर्माण करून त्यावर पार्लमेंटची उभारणी केली पाहिजे, व या स्थानिक समित्यांना केवळ स्थानिक राजकारणांतच नव्हे तर राष्ट्रीय राजकारणांत भाग घेतां येईल अशी तरतूद केली पाहिजे, असें रॉय यांचें मत होतें. त्यांनी तयार केलेली राज्यघटना या मौलिक तत्त्वांवर योजलेली आहे.

'जनता-योजना' व 'स्वतंत्र हिंदुस्थानची राज्यघटना' यांचा रॅडिकल पक्षानें जोराचा प्रचार केला. बऱ्याच ठिकाणीं परिषदा घेऊन स्थानिक 'जनता-समित्या' स्थापन केल्या व कांहीं सहकारी संस्था निर्माण करून चालविल्या. या कार्यामुळें रॅडिकल पक्षाच्या सभासदांची संख्याहि वाढत गेली परंतु हिंदुस्तानचा व्याप लक्षांत घेतां ही वाढ अपुरीच होती. रॅडिकल पक्षाची आवश्यक प्रमाणांत वाढ न होण्याचें खरें कारण असें होतें कीं लोकशाहीला परिपोषक अशी मनोवृत्ति व विचारसरणी जनतेंत निर्माण झालेली नव्हती. व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिवाद व व्यक्तिगत आत्मविश्वास यांतून लोकशाहीचा जन्म होतो. उलट, हिंदुस्तानांत विभूतिपूजा, अंधश्रद्धा, वैयक्तिक परावलंबित्व यांचें स्तोम होतें. यामुळें रॅडिकल पक्षाचा स्वातंत्र्यसंदेश बहुजनसमाजाला हालवूं शकला नाहीं. राष्ट्रीयतेची भावना ही एक प्रकारची संघभावना (Collectivism) आहे, तिनेंच फॅसिझमला जन्म दिला. उलट, लोकशाहीचें तत्त्व व्यक्तीच्या स्वाभिमानावर उभारलेलें आहे. म्हणून संकुचित राष्ट्रीयतेचा त्याग करून खऱ्या लोकशाहीचा स्वीकार करावा, असा रॉय यांनीं अनेक सभासंमेलनांतून व लेखांतून प्रचार केला, तोहि वरील कारणांमुळे कांहीं विचारी माणसांपुरताच मर्यादित राहिला.

महायुद्धांत ब्रिटिशांचा विजय झाला तर हिंदुस्तानचें पारतंत्र्य दृढतर न होतां स्वातंत्र्यच सुलभ होईल – हा रॉय यांचा कयास शब्दशः खरा ठरला. मात्र रॅडिकल पक्षाला त्याचा कांहीं फायदा झाला नाहीं. त्याचें एक कारण वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें युद्धकाळांत रॅडिकल पक्षाची व्हावी तितकी वाढ झाली नाहीं हें होय. दुसरें कारण म्हणजे महायुद्धाच्या उत्तरार्धांतील व तदनंतरचें ब्रिटिश राज्यसत्तेचें हिंदुस्तानांतील धोरण. काँग्रेसची ऑगस्ट १९४२ ची युद्धविरोधी मोहीम चारसहा महिन्यांत विलयाला गेली. त्यानंतर काँग्रेसमध्यें निष्क्रियता व निराशावाद पसरलेला होता. त्यावेळी फॅसिस्टविरोधी पुढाऱ्यांचें तात्पुरतें मंत्रिमंडळ बनवून जनतेच्या आर्थिक हिताचा कार्यक्रम आंखावा अशी रॅडिकल पक्षाची सूचना होती. ती ब्रिटिश राजवटीला मान्य नव्हती. उलट, हिंदी भांडवलदारांना जवळ करण्याचें धोरण स्वीकारण्यात आलें. पुढें पार्लमेंटरी मिशन व कॅबिनेट मिशन यांच्या मार्फत काँग्रेस पुढाऱ्यांबरोबर वाटाघाटी सुरू झाल्या. त्यामुळें काँग्रेसची कमी झालेली प्रतिष्ठा पुन्हा वाढीस लागली व काँग्रेसमध्यें आशेचे वारे वाहूं लागले. पुढें प्रांतिक निवडणुका झाल्या. त्यांत सहाजिकपणें काँग्रेसचा विजय झाला व काँग्रेस आणि मुस्लिम लीगच्या हातीं सत्ता समर्पण करून ब्रिटिश सत्तेनें हिंदुस्थानांतून पाय काढला. हें सर्व झालें तरी








आपणच हिंदुस्तानचें स्वातंत्र्य मिळविलें अशी आत्मवंचना कॉंग्रेसपुढाऱ्यांनीं करून घेतलेली आहे. वास्तविक हिंदुस्तान सोडण्याची ब्रिटिश सत्तेलाच घाई झाली होती. तसें नसतें तर सन १९४४ मध्यें व त्यानंतर कॉंग्रेसची चळवळ पूर्णाशीं गतप्रभ झाली असतांना कॉंग्रेसपुढाऱ्यांशीं तडजोड करण्याचें ब्रिटिश सत्तेला कांहींच कारण नव्हतें.

सन १९४६ च्या सुरवातीस ज्या प्रान्तिक निवडणुका झाल्या त्यांत रॅडिकल पक्षाला अपयश आलें. त्यानंतर मे महिन्यांत डेराडून येथें रॅडिकल पक्षाचा मोठा कॅंप भरविण्यांत आला. 'नव–मानवतावादाचा' जन्म या कॅंपमध्यें झाला असें म्हणतां येईल. महायुद्धाविषयींचे रॉय यांचे कयास जरी खरे ठरले तरी युद्धोत्तर काळांतील रशियाच्या एकान्तिक व संकुचित धोरणामुळें तो देश लोकसत्ताक राष्ट्रांचें पुढारीपण घेऊं शकणार नाहीं याविषयीं रॉय यांची खात्री झाली. उलट, अमेरिकेजवळ कोणतेंच प्रागतिक तत्त्वज्ञान उरलेलें नव्हतें. या राष्ट्रांच्या चढाओढींत तिसऱ्या महायुद्धाचें भयानक दृश्य दिसूं लागलें. एकीकडे व्यक्तिस्वातंत्र्याला विघातक अशी कम्युनिस्ट हुकुमशाही, व दुसरीकडे इतिहासानें कुचकामी ठरविलेली पार्लमेंटरी पद्धतीची लोकशाही – ह्या दोन्ही वर्ज्य करून निराळें राजकीय तत्त्वज्ञान अंगीकारलें पाहिजे असें आपलें मत रॉय यांनीं विशद केलें. पुढें डिसेंबर १९४६ मध्यें मुंबईंत रॅडिकल पक्षाची परिषद् भरली त्यावेळीं '**नवमानवतावादाचे बावीस सिद्धान्त**' रॉय यांनीं परिषदेपुढें मांडले. त्यांचें विशदीकरण या ठिकाणीं अर्थात् शक्य नाहीं.

याच सुमारास रॉय यांनीं असे विचार मांडले कीं सत्ताकांक्षी राजकारण (Power-Politics) लोकशाहीला विघातक आहे. हाच विचार शेवटीं १९४८ मध्यें रॅडिकल पक्षाच्या विसर्जनास कारणीभूत झाला असल्यानें त्याविषयींच्या रॉय यांच्या मतांचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें येथें क्रमप्राप्त आहे. रॉय यांच्या मतानें भांडवलशाही युग गेल्या महायुद्धांतच संपुष्टांत आलें. यापुढें भांडवलशाही जगली तरी ती स्वतःच्या जीवानें जगणार नाहीं. भांडवलशाही युगाच्या जागी सत्ताकांक्षी राजकारणाचें युग आलें आहे. एकाद्या देशांत भांडवलदारांचें वर्चस्व असो वा समाजवाद्यांचें असो–त्यांत सत्तेचें केन्द्रीकरण होत आहे. पण तसें झालें तर समाजवादानेंहि आर्थिक स्वातंत्र्य येणार नाहीं. कारण, ज्याप्रमाणें आर्थिक लोकशाहीशिवाय खरी राजकीय लोकशाही प्रस्थापित होत नाहीं, त्याचप्रमाणें राजकीय लोकशाहीशिवाय खरी आर्थिक लोकशाहीसुद्धां निर्माण होत नाहीं. म्हणून यापुढें सत्तेचें विकेन्द्रीकरण हाच राजकीय व आर्थिक लोकशाहीचा मार्ग आहे. परंतु कोणताहि राजकीय पक्ष हा सत्ताप्राप्तीसाठी असतो. आधीं आपण सत्ता घ्यावी व नतर ती जनतेला द्यावी. या मार्गांत साध्य – साधन – विसंगति आहे. वास्तविक 'प्रातिनिधिक सरकार' (Representative Government) म्हणजेच लोकशाही अशा दूषित विचारसरणींतून राजकीय पक्षांची वाढ झाली. व लोकशाहीला निदान दोन पक्ष लागतात ही कल्पना रूढ झाली. परंतु खऱ्या लोकशाहींत राज्यसत्ता लोकांच्या हातीं राहिली पाहिजे. उलट, राजकीय पक्षांचें कामच हें असतें कीं सत्ता लोकांच्यातर्फे आपण मिळवायची. ज्यांना सत्तेचें विकेन्द्रीकरण पाहिजे असेल त्यांनीं सत्तेच्या राजकारणापासून अलिप्त राहावें. त्यांनीं प्रथम समाजांत व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य, स्वावलंबन या तत्त्वांचा फैलाव करावा. ज्या मानानें समाज डोळस, विवेकी व स्वावलंबी होईल, त्या मानानें प्रस्थापित सरकारची स्वछंदता कमी होईल. नंतर ठिकठिकाणीं स्वातंत्र्याकांक्षी समाजाच्या जनतासमित्या व सहकारी संस्था संघटित कराव्या. अशा जनता–समित्यांना निवडणुकीच्या वेळीं आपल्या भागांतील एकादा विद्वान्, नीतिमान्, सत्ताविन्मुख असा उमेदवार उभा करता येईल, त्याला निवडून आणतां येईल व निवडणुकीनंतर आपल्या सत्ता-कक्षेंत ठेवता येईल. वास्तविक अशा सद्गुणी व निरिच्छ लोकांना आजच्या राजकारणांत स्थान नाहीं. पण अशा लोकांचें सरकार झालें व त्यावर जागरूक व संघटित जनतेची देखरेख राहिली तरच खरी लोकशाही प्रस्थापित होईल. या मार्गाचा अवलंब करण्यासाठींच रॉय यांनीं रॅडिकल पक्ष विसर्जन करून नवमानवतावादी आंदोलनास प्रारंभ केला.

---








श्रीमती मणिबेन कारा

# हिंदी कामगार-चळवळ व रॉय

रॉय यांचा हिंदी कामगार-चळवळीशीं असलेला प्रत्यक्ष संबंध सुटून फार दिवस झाले नाहींत. एक काळ असा होता कीं, त्या काळांत त्यांनीं अत्यंत घनिष्ठ संबंध ठेऊन त्या चळवळींत भाग घेऊन तिच्या धोरणाचा पाया घातला आणि कार्याचें मार्गदर्शन केलें. कम्युनिस्ट इंटरनॅशनलशीं संबंध सुटण्याच्यापूर्वीं हिंदी कम्युनिटांच्या कामगार चळवळीचे ते मार्गदर्शक होते. १९२५ ते १९२९ हिंदी कामगारचळवळीनें एका पाठीमागून एक असे अनेक विजय मिळविले. त्या वेळीं रॉय हेच त्या चळवळीला पत्रव्यवहार करून व पुस्तिका लिहून मार्गदर्शन करीत होते.

१९३१ सालीं कामगारचळवळ खालावली आणि तिच्यांत फाटाफूट झाली. यावेळीं रॉय यांनीं कामगार-चळवळीवर भिस्त ठेऊन कामगारांना सामाजिक व राष्ट्रीय चळवळींत सामील होण्याचा सल्ला दिला आणि कामगार-चळवळीला दृढ अधिष्ठान कसें मिळेल या संबंधीं दृष्टिकोण दिला.

इ. स. १९३९ सालीं कामगार-चळवळींत फाटाफूट झाली होती. कामगार-चळवळींत ऐक्य निर्माण करण्याकरितां त्यांनीं राजकीय मतभेदांच्या ओढाताणींतून त्या चळवळीला बाहेर काढण्याचा प्रयत्न केला व त्या चळवळीचें समान व्यासपीठ तयार करण्याची कल्पना प्रामुख्यानें पुढें आणली. या कल्पनेला एकदम यश आलें नाहीं. परंतु या कल्पनेचा चांगला परिणाम दिसूं लागला. १९३८ सालीं एकीचें दृश्य फळ दिसूं लागलें. कामगार-चळवळीला एकीचें दृश्य फळ येण्याच्या अगोदर ही एकी घडवून आणण्याकरितां आवश्यक अशी विचारसरणी पेरणें जरूर होतें. या विचारसरणीचा प्रसार करणारा रॉय गट अस्तित्वांत आला. ही गोष्ट रॉय हे तुरुंगांत असतांनाच घडली. या गटाला त्या काळांत अखिलभारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसमध्यें चांगलें महत्त्व प्राप्त झालें. ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या अनेक उच्च पदांवर या गटांतील मंडळी निवडून येऊं शकली. त्यामुळें त्यांना कारागृहांत बंधनस्थ असलेल्या रॉय यांच्या धोरणाचा प्रभाव पाडतां आला.

रॉय हे तुरुंगांतून सुटून आल्यावर अखिलभारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसला येऊन मिळाले. तिच्या कार्यकारी मंडळांतहि निवडून आले. देशांतील राष्ट्रीय चळवळीपासून कामगार-चळवळ अलिप्त राहूं नये, राष्ट्रीय चळवळीशीं कामगारांचें सहकार्य कायम असलें पाहिजे, कामगारांनीं राष्ट्रीय चळवळींत उत्साहानें भाग घेतला पाहिजे, या मुद्द्यांकडे ट्रेड युनियन कॉंग्रेसचें लक्ष त्यांनीं खेंचून घेतलें.

इ. स. १९४० सालीं रॉय यांनीं कामगारांना फासिझम्-विरोधी लढयांत सहकार्य करण्याचा सल्ला दिला. कामगारांच्या स्वातंत्र्याच्या लढयांत जसें फासिझम्-विरोधी लढ्यांत भाग घेणें अगत्याचें होतें, तसेंच क्रांतिवादाच्या दृष्टीनेंहि तें आवश्यक होतें. रॉय आणि हिंदी राष्ट्रीय कॉंग्रेसचे नेते यांचा या मुद्द्यावर मतभेद झाला. या नेत्यांच्या दृष्टीनें या जागतिक युद्धाचें स्वरूप, ब्रिटन विरुद्ध जर्मनी, असेंच होतें. ही युद्धविरोधी भूमिका अखिल भारतीय ट्रेड युनियन कॉंग्रेसलाहि पोटांतून मान्य झाली.

ट्रेड युनियन कॉंग्रेसच्या पोटांतील हा युद्धविरोधी उद्देश रॉय यांना कळून चुकला. ट्रेड युनियन कॉंग्रेसला युद्धसहकार्याचा उद्देश पटविणें कठीण आहे हें पाहून रॉय हे तिच्यामधून बाहेर पडले. त्यांच्याबरोबर इतरहि अनेक कामगारपुढारी बाहेर आले. ह्या पुढाऱ्यांच्या सहकार्यानें युद्धप्रयत्नांना मदत करण्याचा उद्देश प्रामुख्यानें पुढें ठेवून निराळी कामगारसंघटना त्यांनीं काढली. रॉय हे त्या संघटनेचे सरचिटणीस झाले. जगांतील सगळया कामगारांशीं एकजूट करून हिंदी कामगारांनीं फॅसिझम्‌विरोधी युद्धांत भाग घेण्याच्या दृष्टीनें ही नवी कामगारसंघटना प्रयत्न करूं लागली. या संघटनेनें उत्तम प्रचार केला. युद्धाच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना कामगारांना दिली. कामगारांनीं युद्ध-








प्रयत्नांत उत्साहानें कसा भाग घ्यावा याचें दिग्दर्शन केलें. या नव्या कामगारसंघटनेमुळें युद्धकाळामध्यें फारच थोडे संप घडले, युद्धप्रयत्नांना अडथळा करण्याचें काम कामगारांनीं केलें नाहीं. कामगारांना विधायक प्रयत्नांनीं चळवळ व संघटना कशा चालवाव्या याचेंहि चांगलें शिक्षण मिळालें.

युद्धोत्तर कालांत रॉय यांचा कामगारचळवळीशीं असलेला प्रत्यक्ष संबंध सुटला. या अखेरच्या कालखंडांत नवमानवतावादाची विचारसरणी रॉय यांनीं पुढें आणली. त्यांनीं दिलेल्या नव्या कल्पनांच्या आधारानें कामगार-चळवळीला आपलें आयुष्य वाहिलेल्या नवमानवतावाद्यांनीं नवें विधायक स्वरूपाचें वळण देऊन कामगारचळवळींत नवा दृष्टिकोण आणला. आज कामगार-चळवळींत ज्या नव्या प्रकारच्या विशेष प्रवृत्ती दिसत आहेत त्याचें श्रेय या मंडळींकडे जातें.

रॉय यांच्या मताप्रमाणें कामगारचळवळ हें वर्ग-युद्धाचें साधन नव्हें. भांडवलशाहीच्या विरुद्ध कठोर आणि विध्वंसक लढा लढण्यांत कामगारांना गुंतवून टाकणारें साधन म्हणजे कामगार-चळवळ नव्हे. हें मत ते १९२२ सालापासूनच ठामपणें मांडीत आले होते. त्यांच्या दृष्टीनें कामगारचळवळ ही कामगारांच्या जीवनाचे प्रश्न सोडविण्याकरितां कराव्या लागणाऱ्या सामुदायिक प्रयत्नाचें साधन होय. हा सामुदायिक प्रयत्न म्हणजे समुदायाच्या वतीनें करावयाचा सौदा होय. या सौद्यांत झगड्याचाहि अंतर्भाव होतो. जीवनाला झगडा टाळतां येत नाहीं असा नियम आहे म्हणून या सौद्यांत समेटाचा किंवा तडजोडीचाहि अंतर्भाव होतो. तडजोडीच्या योगानें कामगारसंघ कामगारांच्या जीवनाची अधिक चांगली स्थिति निर्माण व्हावी, असा प्रयत्न करतात. रॉय यांच्या मताप्रमाणें कामगार-संघांचा मुख्य उद्देश अधिकाधिक सवलती मिळवून अधिक स्वास्थ्यपूर्ण जीवन जगण्याचें सामर्थ्य संपादन करणें हा आहे.

रॉय यांच्या मताप्रमाणें कामगारसंघटना हा समाजसंघटनेचा एक प्रकार आहे. म्हणून केवळ कामगारांच्या दैनंदिन गाऱ्हाण्यांचा निकाल लावणें एवढ्यांतच या संघटनांचा उद्देश पुरा होत नाहीं. कामगारांच्या समग्र जीवनाकडे लक्ष पुरवून ते चांगले कामगार आणि चांगले नागरिक बनविणें ही गोष्टहि त्या उद्देशांत येतेच. म्हणून रॉय यांनीं कामगारांना शिक्षण देणें आणि कामगारांचे उत्तम शिक्षक तयार करणें या मुद्द्यांवर फार भर दिला. सामाजिक उन्नति व सांस्कृतिक प्रयत्न हीं कामगार-चळवळीचीं महत्त्वाचीं अंगें होत असें सांगून हीं अंगें विसरल्यामुळें हिंदी कामगारचळवळ दुर्बळ राहिली आहे या गोष्टीकडे त्यांनीं लक्ष खेंचलें.

हे विचार आतां एका विशिष्ट गटापुरतेच मर्यादित राहिले नाहींत. त्यांचा प्रसार दूरवर होऊं लागला आहे. हिंदी कामगार-चळवळीमध्यें हे विचार खोल रुजले जातील अशी शक्यता उत्पन्न झाली आहे. या बाबतींत अधिक त्वरा करण्याची गरज कामगारांच्या हितसंबंधांबद्दल दक्षता बाळगणाऱ्यांना भासणें आवश्यक आहे.

---

## संन्यासवादाची विकृति !

संन्यासवाद हें एक उफराटें, विकृत मनोवृत्तींतून जन्मलेलें ध्येय आहे. व्यक्तीनें आत्महत्या केली तर तें कृत्य सर्वच लोक गर्हणीय मानतात. वेडाच्या तात्पुरत्या भरांत माणूस आत्महत्या करतो, असें निर्विवाद मानलें जातें. परंतु ज्या समाजांत संन्यासवादाचा सद्गुणी ध्येय म्हणून 'उदो उदो' केला जातो, त्या समाजांत वेडाचो, मानसिक विकृतीची सांथच पसरली आहे याचें तें निदर्शक आहे.

'बहु होणें' किंवा अपत्योत्पत्ति हा निसर्गाचा नियम आहे. जेव्हां केव्हां संन्यासवाद पंथ म्हणून प्रचलित झाला असेल, तेव्हां त्याचा सामाजिक उपयोग हल्लींच्या संततिनियमनाच्या चळवळीसारखा कांहींसा होता. त्या वेळीं संन्यासवादाच्या रूपानें आवश्यक मानला गेलेला संयम तात्पुरता होता. अपत्योत्पत्ति किंवा जीवनच निंद्य समजण्याइतका त्याचा निर्बुद्ध अर्थ नव्हता ! विशिष्ट सामाजिक परिस्थिति बदलली तर संन्यासवादाची जरूरच नाहीं, असा त्याचा खरा अर्थ होता. — मानवेंद्रनाथ रॉय

'The Cult of Asceticism & Renunciation --' मधून



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



श्री. भि. वि. मराठे

# रॉय यांचें 'विज्ञान व तत्त्वज्ञान'

" चित्रकला, शिल्पकला, मूर्तिकला, स्थापत्यशास्त्र, पदार्थविज्ञान, जीवशास्त्र, तत्त्वज्ञान या साऱ्यांचें मूर्तिमंत स्वरूप म्हणजे लीओनार्डो द व्हिन्सी. आणि या प्रत्येक विषयांत त्याचें प्रावीण्य श्रेष्ठ होतें. अशा तऱ्हेचें समग्र ज्ञान असलेली व्यक्ति इतिहासांत खरोखर दुर्मिळेच." ( Watham, 'History of Science' ).

मानवेंद्रनाथ रॉय यांचें कांहींसें असेंच वर्णन करतां येईल. विश्वप्रज्ञावंत आधुनिक लीओनार्डोच ते होते. तत्त्वज्ञान, विज्ञान, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, इतिहासशास्त्र, साहित्य इत्यादि विविध विषयांत नेत्र-दीपक तेजानें चमकणारे बुद्धिभास्कर हीच त्यांची बिरुदावली. या लेखांत **विज्ञानशास्त्रज्ञ मानवेंद्रनाथ रॉय** यांचें दर्शन घडवून द्यावयाचें आहे.

## विविध विज्ञानांचा गाढ व्यासंग

तेजःक्रियाणुसिद्धान्ता-(Quantum Theory) चा जनक मॅक्स प्लँकविषयीं लिहितांना आइन्स्टीननें पुढील उद्गार काढले आहेतः " विज्ञानदेवतेचे अनेक उपासक आहेत. पण विज्ञानमंदिरांत दर्शन घेण्याकरितां जाणाऱ्या साऱ्याच उपासकांचे हेतू समान नसतात. कांहीं केवळ बुद्धिप्रदर्शनार्थ, तर कांहीं फायदा साधावा म्हणून तेथें जातात. असल्या साऱ्या भगतगणांची हकालपट्टी करण्याकरितां एखादा देवदूत जर पृथ्वीतलावर अवतीर्ण झाला तर विज्ञानमंदिर जवळजवळ रिकामेंच पडेल. तरीपण कांहीं थोडे प्राचीन व आधुनिक विज्ञानोपासक तेथें शिल्लक राहतीलच. त्यापैकीं मॅक्स प्लँक हे एक होत."

रॉय यांचीहि प्लँकसारख्या विज्ञानोपासकांत गणना करावी लागेल. $E = mc^2$ या समीकरणानुसार अणुगोल तयार करण्याकरितां किंवा अन्य तऱ्हेनें त्यांनीं प्रयोगशाळेंत संशोधन केलेलें नाहीं; ते कोणी यंत्रतंत्र-विशारद ( Technologist ) नव्हते किंवा विद्यापीठांतील ( academic ) विज्ञानाचार्यहि नव्हते. मानवी प्रगतीस आवश्यक असलेल्या विज्ञानजन्य यंत्रतंत्रा-( Technology ) विरुद्धहि ते खास नव्हते. पण यंत्र-तांत्रिकतेचा अवाढव्य विकास आणि सुसंस्कृत विचारां-(Ideas) च्या बाबतींत त्या मानानें मागें पडलेला मानव, ही कालाची तफावत ( time lag ) मानवी प्रगतीप्रीत्यर्थ भरून निघाली पाहिजे, अशी त्यांची विचारसरणी आहे. असो. एकंदरींत विज्ञानाकडे पाहाण्याचा त्यांचा दृष्टिकोण तत्त्वज्ञानात्मक होता, विश्वसत्यशोधकाचा होता, मानवतावादी होता. त्यांच्या मतें, आधुनिक विज्ञानशास्त्रा-(New Physics) च्या प्रगतीमुळें तत्त्वज्ञान आणि विज्ञान यांच्यांमधील लक्ष्मणरेषाच नष्ट होत चालली आहे. आधुनिक विज्ञान-तत्त्वज्ञानाच्या अलौकिक ( Meta-Physical ) क्षेत्रांत पदार्पण करुन तत्त्वज्ञानाला न सुटलेले प्रश्न सोडविण्यास उद्युक्त झाल्यामुळें विज्ञानक्षेत्र व तत्त्वज्ञानक्षेत्र अशी श्रम-विभागणी अग्राह्य ठरत आहे. आधुनिक विज्ञानाचें तत्त्वज्ञान मानवेंद्रांच्या **नवमानवतावादा**-( New Humanism ) चें तात्त्विक अधिष्ठान आहे आणि या जीवनाच्या तत्त्वज्ञानाकरितांच ते विज्ञानशास्त्रज्ञ झाले.

एवढ्या प्रस्तावनेनंतर रॉय यांच्या प्रत्यक्ष विज्ञान-प्रावीण्याचा परिचय घडवून आणणें इष्ट ठरेल. नवपदार्थ-विज्ञानसापेक्षता-सिद्धान्त ( Theory of Relativity ) व तेजःक्रियाणुसिद्धान्त ( Quantum Theory ) – तसेंच, जीवशास्त्र ( Biology ), मानसशास्त्र ( Psychology ) व खगोलशास्त्र ( Astronomy ), या विज्ञानांचा रॉय यांचा व्यासंग व विद्वत्ता फार गाढ होती. या विषयांवरील त्यांचीं अनेक पुस्तकें व लेख प्रसिद्ध आहेत. 'Heresies of 20th Century Science', 'Man and Nature', 'Science and Superstition', 'Science and Philosophy' हे








ग्रंथ आणि याशिवाय 'Marxian Way' व 'Humanist Way' या मासिकांतून व इतर जागतिक नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले त्यांचे लेख, हें त्यांचें विज्ञानशास्त्रावरील वैचारिक धन आहे. मृत्यूपूर्वींच्या दीर्घ आजारांत विज्ञानशास्त्रावर लिहिलेल्या 'Philosophical Consequences of Modern Science' या त्यांच्या आगामी पुस्तकाचीं हस्तलिखितें ते तपासीत होते. हा महान् ग्रंथ लवकरच प्रसिद्ध होईल अशी आशा आहे. मानवेंद्रांचा हा अमोल वैचारिक ठेवा लक्षांत घेतां ते आइन्स्टीन, प्लँक, हायसेनबर्ग, श्रोडिंजर, बॉर्न, द ब्रोग्ली, एडिंग्टन, जीन्स, व्हाइटहेड, बर्ट्रान्ड रसेल, हालडेन, हक्सले, ब्रोड, जोड, सुलिवन, सुसन स्टेबिंग इत्यादि जगत्प्रसिद्ध आधुनिक शास्त्रज्ञ-तत्वज्ञांच्या पंक्तींत सहज विराजमान होऊं शकतील. प्रत्यक्ष आइन्स्टीनच्या व इतर लेखकांच्या सापेक्षतासिद्धान्तावरील पुस्तकांच्या संदर्भग्रंथयादींत मानवेंद्रनाथ रॉय यांना मानाचें स्थान लाभलें हा त्यांचा केवढा गौरव !

या लेखांत राय यांच्या नवपदार्थविज्ञानाच्या व्यासंगाचा व विद्वत्तेचा परिचय करून देण्याचें योजिलें आहे. आइन्स्टीनचा सापेक्षतासिद्धान्त व प्लँकचा तेज:क्रियाणुसिद्धान्त हे विषय नवपदार्थविज्ञान या सदराखालीं प्रामुख्यानें येतात. हे दोन सिद्धान्त समजण्यास फार कठीण आहेत. असामान्य बुद्धिमत्ताच त्यांचें समग्र आकलन करूं जाणे. जगांतील मोजक्या व्यक्तींना त्यांचें सूक्ष्म व समग्र ज्ञान आहे. रॉय यांनीं "दृश्यते त्वग्रयया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभि:" अशा प्रज्ञेनें हें सिद्धान्त आत्मसात् केले आहेत. सापेक्षतासिद्धान्त अमान्य करणारे सर शाह सुलेमान यांच्याशीं त्या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ रॉय यांनीं जो वाद घातला आहे, त्यांत त्यांची विद्वत्ता प्रत्ययास येते. या सिद्धान्ताचें त्यांनीं केलेलें विवेचन, विशदीकरण, तत्त्वज्ञानात्मक चर्चा हें सार रॉय यांच्या स्वतंत्र प्रज्ञेचें, स्वयंकल्पकतेचें, तर्कशुद्धतेचें, सर्जनशीलतेचें प्रदर्शनच आहे.

## विश्वाचीं दोन चित्रें !

त्यांच्या ज्ञानभांडारांत शिरण्यापूर्वी, प्रवेशद्वाराशीं प्राचीन व आधुनिक पदार्थविज्ञानप्रणीत विश्वाचीं रॉय यांनीं रेखाटलेलीं दोन भिन्न चित्रें अवलोकन करणें योग्य ठरेल.

प्राचीन पदार्थविज्ञानानुसार विश्वांत अक्षर वस्तुमानयुक्त ( Mass ), अविभाज्य जडकण ( Particles of Matter ) आहेत. ते शाश्वत असून कालाच्या प्रत्येक क्षणाक्षणाला अवकाशांतील निश्चित बिंदु व्यापून राहातात. प्रत्येक कणावर गूढ गुरुत्वाकर्षणशक्तीचा प्रभाव असतो आणि यामुळें कणांचें गतिमान ( Velocity ) बदलतें. हें गतिवृद्धिमान ( Acceleration ) किंवा गतिक्षयमान (Retardation) कणांच्या वस्तुमानावर अवलंबून असतें. नियमबद्ध जडकणांच्या संयोगद्वारेंच विश्वांतील जडवस्तू बनलेल्या आहेत.

या उलट, आधुनिक पदार्थविज्ञानाचें विश्व ऋणकण ( Electrons ) व धनकण ( Protons ) यांचें बनलेलें आहे. 'जड' (Ponderable Matter) असें कांहींच उरलेलें नाहीं. जड आणि तेज ( Energy ) यांच्या सीमेवर रेंगाळणाऱ्या सत्त्वा- ( attentuated stuff ) पासून नवपदार्थविज्ञानाचें विश्व बनलेलें आहे. या मूलसत्त्वास अवकाशांत निश्चित स्थान नाहीं आणि कालांत सातत्य (Continuity) नाहीं. नियतिवाद ( Determinism ) व यांत्रिकताबद्ध ( Mechanistic ) विश्वाची कल्पना त्याज्य ठरूं पहात आहे. निरपेक्ष अवकाश आणि निरपेक्ष सूत्रबद्ध कालप्रवाह नामशेष झाले आहेत. अवकाश वक्र असून कालाला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. दिक्काल हें त्याचें एकात्मरूप आहे. अवकाश, काल, जडवस्तु सारे चतुर्मित्यंगात्मक सातत्यक्षेत्रा-( Four Dimensional Continuum ) मध्यें विलीन झाले असून त्यांच्यांत घटना ( Events ) घडत आहेत. प्रकाश व विद्युत्तेजाचा माध्यम म्हणून गणला गेलेला 'ईथर' (Ether) व न्यूटनची गूढ गुरुत्वाकर्षणशक्ति यांची हकालपट्टी झाली आहे; आणि या सर्वांत गोंधळांत पाडणारा शोध म्हणजे तेज:क्रिया सातत्यरूप नाहीं व तेजसुद्धां अणुरूप आहे !

या नंतर प्रत्यक्ष ज्ञानभांडारांत शिरूं या.

सापेक्षतासिद्धान्ताचा उदय कसा झाला हें वर्णन करून सांगतांना रॉय म्हणतात : "न्यूटनचें गतिशास्त्र ( Dynamics ) आणि मॅक्सवेलचें विद्युत्-लोहचुंबकत्वशास्त्र ( Electro-Magnetism )

यांच्यांतील विसंगतींतच सापेक्षतासिद्धान्ताचीं बीजें होतीं. निरपेक्ष अवकाश ( Absolute Space ) व गुरुत्वाकर्षणाची माध्यमहीन अवकाशांतरक्रिया ( Action at a distance ) ही न्यूटनच्या गतिशास्त्राचीं गृहीतकृत्यें होतीं. तर, विद्युत्तेजवहनास लागणारा माध्यम ( Medium ) ईथर हें मॅक्सवेलच्या विद्युत्-लोहचुंबकत्वशास्त्राचें गृहीतकृत्य होतें. ही अनावश्यक व विसंगत गृहीतकृत्यें बाजूला सारूनच सापेक्षतासिद्धान्ताचे अंकूर बाहेर फुटले. "

आपल्या गतिशास्त्रानुसार निरपेक्ष गतिमान ( Absolute Volocity ) ठरविण्याचें साधन म्हणून न्यूटननें निरपेक्ष अवकाशाची कल्पना केली. याकरितां अवकाश ही पदार्थात्मक वास्तवता आहे असें त्यानें मानलें. तदनंतर मॅक्सवेलच्या विद्युत्लोह-चुंबकत्व तेजाचा माध्यम म्हणून कल्पिलेला ईथर उदय पावला. अवकाश पदार्थात्मक आहे या न्यूटनच्या कल्पनेस तो ईथरनें व्याप्त आहे या कल्पनेचें पाठबळ मिळालें. ईथरचें अस्तित्व प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष सिद्ध व्हावें म्हणून सर्वावकाशव्यापी ईथरमधून पृथ्वीचें निरपेक्ष गतिमान ताडून पाहण्याचे प्रयोग सुरू झाले. मिचेलसन–मोर्ले या अमेरिकन शास्त्रज्ञद्वयांनीं प्रकाशाचें निरपेक्ष गतिमान ठरविण्याकरितां एक ऐतिहासिक प्रयोग केला. या प्रयोगानें प्रकाशकिरणांच्या ईथरमधील गतिमानासंबंधीं चमत्कारिक व नकारात्मक कौल दिला. कोपरनिकसच्या निरपेक्ष अव- पृथ्वीभ्रमणसिद्धान्ताला किंवा न्यूटनच्या [illegible] त्याग करणें प्राप्त काशाचा तसेंच मॅक्सवेलच्या ईथरचा होतें. आइन्स्टीननें पुढें येऊन निरपेक्ष अवकाश व ईथर या दोन्हींनाहि मूठमाती दिली व आपला सापेक्षतासिद्धान्त पुरस्कृत केला. निरपेक्ष अवकाश नामशेष झाल्यानंतर निरपेक्ष कालाचीहि तीच गत होणें क्रमप्राप्त होतें!

## सापेक्षतासिद्धान्ताची मीमांसा

यावर रॉय लिहितात : " निरपेक्ष अवकाश अस्तित्वांत नसल्यामुळें निरपेक्ष गति मिळणें अशक्य आहे. गति ही नेहमींच सापेक्ष ( Relative ) असते; आणि गतीचा वस्तूवस्तूं-मधील अंतराशीं संबंध असल्यामुळें हें अंतरहि सापेक्ष ठरतें. गति व अंतर सापेक्ष असतात या निर्णयामुळें अवकाश व काल यांच्या कल्पनेंत क्रांति घडून येणें प्राप्त आहे. अवकाश व काल या स्वतंत्र अस्तित्व असलेल्या वस्तू नव्हत किंवा अंतिम वास्तवताहि नव्हत. सत्स्वरूपमीमांसेच्या दृष्टीनें ( ontologically ) त्यांच्यापूर्वी अस्तित्वांत असलेल्या वास्तवतेंतूनच त्यांचें अस्तित्व प्रगट झालें आहे. या वास्तवतेचें अवकाश व काल आविष्कार आहे, कार्य ( Function ) आहे. अवकाश हा जडाचा भूमित्यात्मक विस्तार आणि काल हा घटनानुक्रम विस्तार होय."

अवकाश व काल यांच्या स्वरूपाविषयीं आइन्स्टीननें सापेक्षतासिद्धान्तानुसार जे निष्कर्ष काढले आहेत त्यांची रॉयकृत मीमांसा त्यांच्या स्वयंकल्पकतेची, तर्कशुद्धतेची द्योतक आहे. रॉय म्हणतात : " सापेक्षता-सिद्धान्तप्रणीत दिक्काल- ( Space – Time ) ची नवकल्पना तर्कशुद्ध, सरळ व सोपी आहे. प्राचीन कालापासून तत्त्वज्ञांनी काल व अवकाश यांभोवतीं गूढता निर्माण करावी याचें नवल वाटतें. वस्तूंचें अधिष्ठान ( Basis ) म्हणून अवकाश गृहीत धरण्यांत आला होता. वस्तूला जर अस्तित्व आहे तर त्या अस्तित्वाला राहायला जागा हवीच, अवकाश हवाच– असें तें व्यावहारिक, भाबडें तर्कशास्त्र होतें ! पण, हा युक्तिवाद तकदुष्ट व चुकीचा आहे. कारण, मग अवकाशाच्या अस्तित्वाकरितां आणखी जागा किंवा अवकाश हवा असेंच म्हणावें लागेल आणि याला मग शेवटच राहाणार नाहीं ! म्हणून, अवकाशोत्तर अस्तित्व ही चुकीची कल्पना असून अस्तित्वोत्तर अवकाश हेंच तर्कशुद्ध कल्पना आहे. अवकाश हें [illegible] आहे. कालाच्या बाबतीत- वस्तूच्या अस्तित्वाचें [illegible] आहे. घटनाघटनांमधील देखील हेंच तर्कशास्त्र लागूं आहे. अवकाश किंवा अवधि म्हणजे काल आणि अस्तित्वांतील बदल म्हणजे घटना. अर्थात् काल हा अस्तित्वावर अवलंबून आहे, तो अस्तित्वोत्तर आहे. अवकाश हा 'असणें'- ( Being ) चा पर्याय आणि काल हा 'होणें'- ( Becoming ) चा पर्याय आहे. शुद्ध अस्तित्व ( Being ) कल्पितां येईल, पण ' असणें ' शिवाय ' होणें ' नाहीं. अर्थात्, काल हा अवकाशाशिवाय असूंच शकत नाहीं. निसर्गानें कालाला अवकाशाशीं एकजीव करून टाकलें आहे." अशा प्रकारें, अगदीं निराळ्या मार्गानें, व्यवहारज्ञान व तर्कशास्त्र यांच्या आधारें रॉय आइन्स्टीनच्या चतुर्मितिगात्मक विश्वसातत्याच्या



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निष्कर्षाप्रत पोहोंचले. ' असणें ' हें त्रिमित्यंगात्मक (Three Dimensional ) आहे; तर, ' होणें ' हें चतुर्मित्यंगात्मक आहे. कारण, त्यांत अस्तित्व व बदल–अवकाश व काल – अभिप्रेत आहे. ही विश्वाची प्रवृत्ति आहे आणि तें चतुर्मित्यंगात्मक आहे.

अशा रीतीनें चतुर्मित्यंगात्मक विश्वसातत्याची कल्पना विशद करुन सांगितल्यावर रॉय आणखी एका विज्ञान-तत्त्वज्ञानात्मक महत्त्वाच्या निष्कर्षाप्रत पोहोंचले. ते म्हणतात : " चतुर्मित्यंगात्मक विश्वसातत्य हें त्रिमित्यंगात्मक गतीचें क्षेत्र आहे; तो त्रिमित्यंगात्मक क्रियाशील अवकाश आहे. ( ' The four-dimensional continuum is a field of three-dimensional motion or space filled with action ' ). कालच नव्हे तर अवकाशहि गतीशीं तादात्म्य पावलेला आहे. पण, निरपेक्ष गति नाहीं, तिला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. गतिमान् वस्तु हीच अनुभवजन्य वास्तवता आहे. गति ही वस्तुवस्तूंमधील फक्त संबंध दर्शविते. पर्यायानें, गति हें जडाचें कार्य आहे. गति आणि जडवस्तु असा द्वैतभाव नाहीं. गति हाच जडाचा स्वभावधर्म आहे. गति निर्माण करणारी अशी निराळी बाह्यशक्ति नाहीं. निष्कर्ष असा कीं, सापेक्षतासिद्धान्ताधारें जडाचें सार्वभौमत्व सिद्ध होतें."

## ईश्वरी हाताला थारा नाहीं !

गति हा जडाचा स्वभावधर्म आहे या निष्कर्षाच्या द्वारें रॉय यांनीं तार्किक युक्तिवादानें आइन्स्टीनच्या गुरुत्वाकर्षण-तत्त्वाचा ( Theory of Gravitation ) अर्थ विशद करुन सांगितला आहे. गति हें जडाचें मूलभूत कार्य आहे, आणि गुरुत्वाकर्षण हा सापेक्ष गतीचा शुद्धगतिजन्य परिपाक आहे. निरपेक्ष अवकाश, निरपेक्ष गति व ईथर या सर्वांची हकालपट्टी झाल्यावर, आइन्स्टीननें बाह्यशक्तीवर अवलंबून नसलेलें शुद्धगत्यात्मक न्यूटनच्या गतिशास्त्रा-( Dynamics) पेक्षां निराळें, असें शुद्धगतिशास्त्र ( Kinematics) रचलें. या शास्त्राला माध्यमयुक्त अवकाश किंवा माध्यमहीन अवकाशान्तर क्रिया अशा कोणत्याच गृहीतकृत्यांची आवश्यकता नव्हती. या शुद्ध-गतिशास्त्राची भूमिति युक्लिडच्या अवकाशाची भूमिति होऊं शकत नव्हती. ती चतुर्मित्यंगात्मक दिक्काल या वास्तवतेची दिक्काल-भूमिति ( Meta-Geometry ) आहे. आइन्स्टीनचें शुद्धगतिशास्त्र हें चतुर्मित्यंगात्मक दिक्कालाच्या भूमित्यात्मक रचनेचें वर्णनात्मक चित्र आहे. या दिक्कालाची भूमित्यात्मक रचना ही जडाच्या अस्तित्वावर व प्रादेशिक विभागणीवर अवलंबून असते. विद्युत्तेज जसें आसमंतात् विद्युक्षेत्र निर्माण करतें किंवा लोहचुंबक लोहचुंबकत्वक्षेत्र निर्माण करतें, तसेंच आपल्या भोंवतीं वक्रदिक्काल निर्माण करणें हा जडाचा स्वभावधर्म आहे. गुरुत्वाकर्षण हा या वक्रतेचा आविष्कार, परिपाक आहे. दिक्कालभूमितीच्या सरळ रेषेनुसार म्हणजे भूरूपरेषे-( Geodesic ) नुसार वस्तु आपला स्वाभाविक मार्ग आक्रमीत असते. वस्तूची वक्रगति ही गूढ बाह्यशक्तीमुळें निर्माण होत नाहीं, तर भूरूपरेषेनुरूप होते. या घटनेस आपण गुरुत्वाकर्षणशक्ति म्हणतों. पण तो निव्वळ बाह्य देखावा आहे, भास आहे. रॉय म्हणतात : "गुरुत्वाकर्षण हा कांहीं निसर्गाचा मूलभूत नियम नव्हे. ती एक निसर्गघटना आहे. गुरुत्वाकर्षणशक्ति अशी कांहीं गूढ अलौकिक शक्ति अस्तित्वांत नाहीं. आइन्स्टीनच्या सिद्धान्ताचें महत्त्व व यश याच्यांतच आहे. न्यूटनची गुरुत्वाकर्षणशक्ति ही पारलौकिक कल्पना होती. पण, आइन्स्टीननें या बाबतींत ईश्वरी हाताला थारा दिला नाहीं ! "

जडवस्तु ( Matter ) आणि तेज ( Energy ) हे एकाच मूलभूत सत्याचे आविष्कार होत. जडाला तसेंच तेजालाहि वस्तुमान आहे; आणि जडाचें तेजांत व तेजाचें जडांत रूपान्तर होऊं शकतें. सापेक्षतासिद्धान्ताच्या या क्रांतिकारक निष्कर्षाचा उल्लेख करुन रॉय म्हणतात कीं, " जड विरुद्ध तेज ( किंवा कण विरुद्ध लहरी ) या द्वैताला मूठमाती देण्याचा मार्ग यामुळें मोकळा झाला आहे. काल व अवकाश याप्रमाणेंच जडाच्या वस्तुमानाचीहि निरपेक्षता नष्ट झाली आहे." या निर्णयाद्वारें सापेक्षतासिद्धान्ताची तेजःक्रियाणुसिद्धान्ता-(Quantum Theory) शीं सुंदर गुंफण घालून रॉयनीं या दोन सिद्धान्तांतील नातें व संबंध प्रगट केले आहेत आणि मिलाफ साधला आहे. तेजःक्रियाणुसिद्धान्त सापेक्षतासिद्धान्ताची उत्क्रांतावस्था आहे.

रॉय म्हणतात : " तेजःक्रियाणु सिद्धान्त म्हणजे












जडाच्या वास्तवतेचा धिक्कार नव्हे. " या सिद्धान्तानें निर्माण केलेला प्रश्न जडाच्या अंतिम स्वरूपाविषयींचा आहे. तत्वज्ञानात्मक दृष्ट्या सापेक्षतासिद्धान्तानें आरंभिलेलें कार्य तेजःक्रियाणुसिद्धान्तानें पार पाडलें आहे. काल व अवकाश यांच्याप्रमाणेंच जडपदार्थ ( Substance ) आणि कार्यकारणवाद ( Causality ) यांच्या निरपेक्षतेच्या कल्पनेला मूठमाती देणारा तो सिद्धान्त आहे.

तेजःक्रियाणुसिद्धान्त थोडक्यांत असा : तेज ( Energy = E ) अणुरूप आहे; प्रत्येक तेजःक्रियाणूंतील तेजः–प्रमाणांश ( Quanta ) निश्चित, प्रमाणबद्ध असतो आणि तो त्या अणूच्या दोलायमाना-( Frequency = V )वर अवलंबून असतो. हा संबंध दर्शविणारें समीकरण असें : $E = h\nu$ ( 'h' प्लँकचा स्थिरमूल्यांक आहे. ) या सिद्धान्ताच्या प्रगत स्वरूपान्वयें, तेज तरंगरूप ( Vibratory ) तसेंच कणरूप-( Corpuscular ) हि आहे.

या सिद्धान्ताचें विवेचन करतांना रॉय म्हणतात : "तेजःक्रियाणुसिद्धान्तामुळें जडाच्या कल्पनेंत क्रांति घडून आली; याचा अर्थ प्रस्थापित जडात्मक सिद्धान्तांची उलथापालथ होऊन गूढवाद आणि अलौकिकत्वाचें राज्य सुरू झालें असा नव्हे. कल्पनांची उच्च पातळीवर प्रगति आणि मिलाफ या प्रवृत्तीचें तें द्योतक आहे. जडवस्तु ही कांहीं गूढशक्तीच्या द्वारें प्रेरित होणारी अचेतन चीज नव्हे. तेजःक्रियाणुसिद्धान्तामुळें विश्व-सातत्या-( cosmic continuity )स धक्का पोहोंचला नसून, उलट बळकटी आली आहे. प्राचीन पदार्थविज्ञानांत न्यूटन व मॅक्सवेल यांनीं केवळ गृहीत-कृत्य म्हणून धरलेल्या सातत्यास तेजःक्रियाणुसिद्धान्तामुळें सिद्धता प्राप्त झाली आहे. तेजःक्रियाणुसिद्धान्ताच्या तरंग-गतिशास्त्रा-( Wave-Mechanics )नें विश्वसातत्याचें उच्च पातळीवरील चित्र रेखाटलें आहे. अण्वन्तर्गत ( Sub-Atomic ) जगताच्या ज्ञानाची, सापेक्षतासिद्धान्ताशीं सुसंगत अशी पद्धतशीर सिद्धान्तरचना करण्याकरितां तरंग-गतिशास्त्र मार्गदर्शक ठरणार आहे. 'अणोरणीयान्' विश्वाला सापेक्षतासिद्धान्ताचे नियम लावूनच तेजःक्रियाणु-सिद्धान्ताचा अर्थ बुद्धीस पटणार आहे. "

## अणुरचनाशास्त्राचे निष्कर्ष

धनकणांच्या ( Protons ) कवचाखालीं वस्तुकण ( Neutrons ) किंवा अविद्युत्कण – असें हें अणुकेंद्र ( Nucleus ); या अणुकेंद्राभोंवतीं वर्तुलाकार, अंडाकृति भिन्नभिन्न पातळीच्या कक्षांमध्यें परिभ्रमण करणारे ऋणकण ( Electrons ) - अशा तऱ्हेचें रुदरफोर्डकृत अणुरचनेचें चित्र आहे. पण, प्राचीन गतिशास्त्रनियामांनुसार या अणुरचनेचें स्थैर्य टिकूं शकत नव्हतें. या नियमांनुसार अणुकेंद्राभोंवतीं परिभ्रमण करणाऱ्या ऋणकणांना, क्षणाक्षणाला आपलें तेज फेंकीत गति मंदावत जाऊन अणुकेंद्रासमीप येणें प्राप्त आहे; आणि अंततः अणुकेंद्रांत विलीन होऊन खळकन् तुटलेल्या ताऱ्याप्रमाणें प्रचंड तेजाची नेत्रदीपक चमक दाखवीत अणूच्या अणू नष्ट व्हावयास पाहिजेत! हें सत्य मानल्यास सारें जडविश्व केव्हांच नष्ट व्हावयास हवें होतें! पण, तसें कांहीं घडत नाहीं. अर्थातच रुदरफोर्डची अणुरचना असमाधानकारक ठरून कोलमडली. तेजःक्रियाणुसिद्धान्ताधारें बोन्ह या डॅनिश शास्त्रज्ञानें ती सावरून धरण्याचा प्रयत्न केला.

बोन्हचा युक्तिवाद असा : ऋणकण अणुकेंद्राभोंवतीं निश्चित कक्षांमधूनच परिभ्रमण करीत असतात. पहिली, दुसरी, तिसरी, चवथी... या क्रमानेंच या भ्रमणकक्षा अणुकेंद्रापासून निश्चित अंतरावर असतात. दोन कक्षांमधील अवकाशांतरांत ऋणकणांचें वास्तव्य नसतें. ते एका कक्षेवरून दुसऱ्या कक्षेवर कांगारूप्रमाणें उड्या मारून जातात. पहिल्या कक्षेपलीकडे अणुकेंद्रासमीप जाण्यास त्यांना मज्जाव आहे. अर्थातच अणु नष्ट होणें शक्य नसतें.

बोन्हचा अणुरचनासिद्धान्त हा एक केवळ तर्क आहे. त्याला तर्कशुद्धतेचें किंवा प्रायोगिक अधिष्ठान नाहीं. तेजःक्रियाणुसिद्धान्तामुळें भ्रमणकक्षांच्या निश्चिततेची व प्रमाणबद्धतेची कल्पना करतां आली तरी ऋणकण अणुकेंद्राभोंवतीं विशिष्ट कक्षांमधून कां फिरतात व एका कक्षेंतून दुसऱ्या कक्षेंत अधांतरीं कशी उडी मारतात याचा कार्यकारणभाव सांगतां येत नाहीं.

या अडचणींतून मार्ग काय ? यावर भाष्य करतांना रॉय लिहितात : "बोन्हच्या अणुरचनेंत ऋणकण हा कण कल्पिला आहे. पण, हा कण अनेक कक्षा कसा व्यापून राहातो ? या प्रश्नाच्या उत्तरांतच या गुंतागुंतीचा










धागादोरा सांपडतो. ऋणकण कणच आहे; पण कक्षा-कक्षांमधून त्याचा विस्तार होऊन व्याप पसरत असावा. या धाग्याचा मागोवा घेत द ब्रोग्ली आणि श्रोडिंजर या शास्त्रज्ञांनीं अडचणींतून मार्ग काढण्याकरितां तरंग-गतिशास्त्रा-( Wave Mechanics)चें तत्त्व पुरस्कृत केलें. तदनुसार अणुरचनेच्या खालच्या कक्षांत ऋणकण हा अवकाशांत निश्चित स्थान असलेल्या जडकणाप्रमाणें वागतो. ऋणकणाचें कण व तरंग असें दुहेरी स्वरूप आहे; आणि ही कल्पना कांहीं नवीन नाहीं. द ब्रोग्ली यानें प्रकाशतेज ( Light ) एकाच वेळीं कणस्वरूप व तरंगस्वरूप असें दाखवून दिलें होतें आणि जड व तेज एकात्मरूप असतात या सत्यावर प्रकाश टाकून आइन्स्टीननें मार्गदर्शन केलेंच होतें. द ब्रोग्लीनें प्रकाशतेजतत्त्वाच्या अनुरोधानेंच अणुरचनेचें संशोधन केलें. श्रोडिंजरनें ऋणकण हा विद्युत्कण असून अणुकेंद्रा-समीप मात्र सूक्ष्म, तरंगरूप विद्युत्क्षेत्र निर्माण करतो म्हणजे तो तरंगरूप असतो अशी कल्पना केली आणि या कल्पनेच्या आधारावरच त्यानें तरंग-गतिशास्त्र रचलें."

अणुरचनाविषयक तत्त्वांचा परामर्ष घेतांना रॉय म्हणतात : "विश्वाच्या सत्स्वरूपाविषयींचें आपलें ज्ञान अजून निश्चित नसेल, अणुरचनेचा प्रश्न अजून पूर्ण सुटला नसेल, अणुहृदयाचें अजून प्रत्यक्ष अव-लोकन शक्य नसेल, तरी पण, अणुशास्त्रीय संशोधन हें शास्त्रज्ञाच्या बाह्यसृष्टींत असलेल्या वास्तवतेचें संशोधन आहे, हें निश्चित." अणुरचनाशास्त्राचें सार असें कीं, जडात्मक वास्तवतेचें अंतिम स्वरूप कणरूप तसेंच तरंगरूप असें दोन्हीहि आहे. धार्मिक व आध्यात्मिक संस्कारामुळें विश्वाकडे निरपेक्ष वस्तुवादी दृष्टिकोणांतून पाहाण्याची संवय जडल्यामुळें अंतिम जडात्मक वास्त-वतेचें अणुशास्त्रीय संशोधन गोंधळांत पाडणारें व गूढात्मक वाटणें साहाजिकच आहे. पण, निसर्गाला निरपेक्षता माहीत नाहीं, हें समजल्यावर व उमगल्या-वर गोंधळ उडणार नाहीं. सारांश, आधुनिक पदार्थ-विज्ञानाच्या संशोधनामुळें सत्स्वरूपाविषयींचा तत्त्व-ज्ञानानें चर्चिलेला सनातन प्रश्न सुटण्याच्या मार्गावर आहे. सत्त्व ( Essence ) आणि त्याचे गुणधर्म ( Properties ), वास्तवता ( Reality ) आणि माया ( Appearance ) अशा तऱ्हेचे भेदभाव निरर्थक आहेत. सत्स्वरूपाची जडात्मक वास्तवता माणसाच्या मनानें निर्माण केली नसून ती तेथें बाह्य-सृष्टींत अस्तित्वांत आहे आणि ती स्वयंपूर्णत्वानें भरलेली आहे.

वर उल्लेखिलेलें श्रोडिंजरचें तरंग-गतिशास्त्र अर्थातच समूहवर्तनक्रमावर अवलंबून ( Statistical) आहे. त्यामुळें वस्तूच्या किंवा घटनेच्या वर्तन-क्रमाविषयीं निश्चितता नाहीं. पण निश्चित संभाव्यता मात्र सांगतां येते. तेजःक्रियाणुसिद्धान्तानें जन्म दिलेल्या या 'संभाव्यतातत्त्वा'-( Theory of Probability ) मुळें विज्ञानांतून कार्यकारणवाद ( Causality), नियतिवाद ( Determinism ) नष्ट झाले अशी ओरड ऐकूं येऊं लागली. यावर रॉय म्हणतात कीं, ही ओरड निरर्थक आहे. वस्तूच्या किंवा घटनांच्या वर्तनक्रमाची संभाव्यता त्या वस्तूच्या व घटनेच्या ज्ञानावर अवलंबून आहे. सर्वज्ञ, सर्वव्यापी असा मानव किंवा कुणीच नाहीं. एकाच वेळीं मनुष्याला सर्व गोष्टींचें ज्ञान शक्य नाहीं. त्याला साक्षात्कार होत नसतो. 'असणें' चे नियम नियतिवादी निश्चित कार्यकारणभाव सांगणारे असतात. पण 'होणें' हें 'असणें' वर अवलंबून असल्यामुळें 'होणें'चे नियम संभाव्यतादर्शक असणें साहजिकच आहे. यामुळें कार्यकारणवादाला कुठेंच बाधा येत नाहीं. कार्यकारणवादाच्या अधिष्ठानाशिवाय संभाव्यतातत्त्व टिकूंच शकणार नाहीं. खरोखर, नियति-वाद व संभाव्यतावाद परस्परपूरक आहेत. त्यांच्या मिलाफामुळें निसर्गसंबंधाचें वास्तव दर्शन घडतें. नियतिवादांत अभिप्रेत असलेली कर्मसिद्धान्तवादाची अडगळ दूर होते. संभाव्यतातत्त्व नियतिवादाला समर्थ व सचेतन ( Dynamic ) करते. याशिवाय पद्धति या दृष्टीनेंहि तें श्रेयस्कर आहे.

## स्वयंपूर्ण व स्वयंकर्तृत्व-युक्त विश्व

जुन्या पदार्थविज्ञानाचा एकुलता एक आधारस्तंभ म्हणून टिकून राहिलेला 'उष्णतागतिशास्त्राचा दुसरा नियम' ( Second Law of Thermo Dynamics ), तदनुषंगिक 'उष्णता-साम्यप्रवृत्ति' ( Entropy ) आणि यांतून उद्भव-लेला विश्वाच्या आदि-अन्ताचा प्रश्न, यांवरील रॉय यांचें विवेचन व विचार फारच मार्मिक व नावीन्यपूर्ण आहेत. स्थलाभावीं विस्ताररूपानें त्यांचें कथन येथें करता येण्यासारखें नाहीं, पण, सारांश असाः










## रॉय यांचें ' विज्ञान व तत्त्वज्ञान '

रॉय म्हणतात : " विश्वाच्या कपाळीं उष्णतागतिशास्त्राच्या दुसऱ्या नियमानें लिहिलेलें 'उष्णता-मृत्यू'-( Heat-death ) चें भकास भवितव्य, हें पुढील प्रमुख अनुमानांवर आधारभूत आहे : पहिलें अनुमान म्हणजे विश्वांतील तेजाचें एकंदर प्रमाण मर्यादित आहे. दुसरें असें कीं, या तेजाचें अनंतत्वानें विभाजन होऊं शकत नाहीं. तिसरें, तेजाच्या मूळ संघटनेला येत असलेला विस्कळितपणा थोपवितां येणार नाहीं.

यावर रॉय यांचा अभिप्राय असाः जुन्या एकोणिसाव्या शतकांतील पदार्थविज्ञानावर आधारभूत असलेल्या या अनुमानांच्या साहाय्यानें उष्णतासमप्रवृत्तीचें व ' उष्णता मृत्यू 'चें भवितव्य वर्तविणें योग्य ठरणार नाहीं. वीसाव्या शतकांतील नवपदार्थविज्ञान-संशोधनामुळें क्रांति घडून आली आहे आणि या विज्ञानानें विश्वाच्या आदि-अंताचा प्रश्न सोडविला असून विश्वाला आदि-अंत आहे असें तें दर्शवीत नाहीं. उदाहरणार्थ, पुढील निर्णयांमुळें वरील अनुमानें फोल ठरल्यासारखी आहेत :

" आइन्स्टीनच्या $E=mc^2$ या समीकरणानुसार जडाचें तेजांत होणारें रूपांतर; रेडियमसारख्या मूलद्रव्यांचें निसर्गांत तेजांत होणारें स्वयंप्रेरित विघटन ( disintegration )–या वस्तुस्थितीमुळें विश्व-तेजाचा पुरवठा कमी होऊं शकणार नाहीं. तेजः-क्रियाणुसिद्धान्तानुसार तेजाचें अनंतत्वानें विभाजन होऊं शकतें. आइन्स्टीनचें विश्व सान्त पण असीम ( Finite but unbounded ) असल्यामुळें विश्वतेज अक्षय आहे. तसेंच विश्वतेजाचा विस्कळितपणा थोपविण्याच्या बाबतींत उत्क्रांत मानव, त्याची बुद्धि, सर्जनशीलता, स्वयंकल्पकता आणि समग्रता या गोष्टी लक्षांत घेण्यासारख्या आहेत. एकंदरींत विश्वाचें भवितव्य भकास व भयंकर नाहीं. उलट, आधुनिक विज्ञानानें स्वयंपूर्ण ( Self-contained, ) स्वयंकर्तृत्वयुक्त ( Self-operative ) अशा वास्तवपूर्ण विश्वाची प्रतिमा पूर्ण केली आहे. "

---

## प्राचीन काळचें वैभव आणि जनतेचें दारिद्र्य

प्राचीन आणि मध्य युगांमध्यें श्रमांची उत्पादकशक्ति हल्लींपेक्षां साहजिकच खूप कमी होती. मग त्या काळांतील राजधान्यांतील लखलखाट, सरकारदरबारांतील थाटमाट, सरदारांचा उधळा डामडौल, त्या वेळच्या सार्वजनिक आणि खाजगी शिल्पकलेचा भपका आणि देवळांतील व मशीदींतून चाललेली दौलतीची लयलूट– या सर्व गोष्टी कशा शक्य झाल्या ? त्या शक्य होण्याचें कारण त्यावेळच्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या वांटणींतील बेसुमार विषमता हेंच होय. खरें म्हणजे राष्ट्रीय वैभवाचीं ही भूतकाळचीं भपकेबाज स्मारकें त्यावेळच्या जनतेवर होणाऱ्या अमर्याद जुलुमाची व तिला पिचून टाकणाऱ्या दारिद्र्याची साक्षच होत! ... चीनमधील प्रचंड भिंत बांधण्याकरितां त्या वेळच्या समाजांतील श्रमजीवी वर्गांतील शेंकडा ८५ मजूरांना राबविलें गेलें व तेवढें उत्पादक काम कमी झालें ! याचा अटळ परिणाम हा झाला कीं, भयंकर दुष्काळ पडून चीनची अर्धी लोकसंख्या कमी झाली ! — मानवेन्द्रनाथ रॉय

' The Cult of Asceticism & Renunciation ' मधून



अनुक्रमणिका





श्री. राजेंद्रदत्त निगम

# कारागृहांतील रॉय यांचा सहवास

'राजाचें हिंदुस्थानवरील स्वामित्व नष्ट करण्याकरितां युद्धाचा प्रयत्न करण्याच्या आरोपा'वरून रॉय यांना बारा वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा होऊन त्यांना बरेली येथील कारागृहांत ठेवण्यांत आलें होतें. उच्च न्यायालयांत पुनर्न्याय होऊन ती शिक्षा सहा वर्षांवर आली. १९३३ सालीं जूनच्या ६ तारखेला मला त्याच कारागृहांत दुसरीकडून आणलें. यावेळीं रॉय यांच्या शिक्षेचें दीड वर्ष पुरें झालें होतें.

ब्रिटिश साम्राज्याच्या व हिंदुस्थानच्या राज्यकर्त्यांना सतत वीस वर्षें सर्वांत भयंकर वाटणारा हा माणूस आतां तावडींत सांपडल्यामुळें त्याच्यावर सुरक्षिततेकरितां जास्तींत जास्त निर्बंध अधिकाऱ्यांनीं लादले होते. सामान्यपणें बंदिवानांना लागूं असलेल्या निर्बंधांपेक्षां हे फार कडक होते. वस्तुतः 'अ' वर्गांत ज्या तऱ्हेच्या कैद्यांना घालावे असे नियम होते ते रॉय यांना बरोबर लागूं पडत होते. परंतु त्यांना 'अ' वर्ग मुद्दाम नाकारण्यांत आला. कारण 'अ' वर्गाला कांहीं महत्त्वाच्या सवलती असतात. त्या त्यांना मिळूं नयेत, असा अधिकाऱ्यांचा उद्देश होता. रॉय यांना 'ब' वर्गांत ठेविलें होतें. त्यावेळीं मजूरपक्षाचे नेते रॅम्से मॅक्डोनल्ड ब्रिटनचे प्रधानमंत्री होते. त्यांनीं रॉय यांना 'अ' वर्ग द्यावा म्हणून शिफारस केली होती. ही शिफारसहि हिंदुस्थानांतील ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं जुमानली नाहीं.

रॉयना राजकीय कैद्यांचा सहवासहि नाकारला. 'ब' वर्गांत ठेवलेल्या कांहीं गुन्हेगारांना गुप्त पोलिसाचें काम देऊन निरंतर लक्ष ठेवण्याकरितां त्यांच्याजवळ आणून ठेवलें. त्याशिवाय १५ यार्डांच्या अंतरावर दोन वॉर्डरहि बंदोबस्ताकरितां कायम ठेवण्यांत आले. रॉय यांना अत्यंत लहान बोळकंडीसारख्या कोठडींत कायम डांबण्यांत आलें. रात्रीच्या वेळीं लागणारी मोरी वगैरेची सोयहि त्या कोठडींत नव्हती. त्याच कोठडींत गुप्त पोलिसाचें काम करणाऱ्या दोघां कैद्यांना डांबलें होतें. इतर कोणत्याहि कैद्यांशीं संबंध येऊं नये, अशी तजवीज केली होती. एवढेंच नव्हें तर जेलच्या खालच्या अधिकाऱ्यांनींहि संबंध ठेवूं नये, अशी खबरदारी घेतली जात असे. काथ्या कोंबलेली एक गादी, एक कांबळें, एक चड्डीजोड आणि दोन शर्ट इतकाच कपडा त्यांना मिळाला होता. जाडेंभरडें व अपुरें अन्न यत्किंचित्हि बदल न करतां देण्यांत येई. यावरून रॉयना जेलमध्यें कष्ट व छळ किती सोसावा लागला, याची सहज कल्पना येईल.

याच सुमारास जगांत फार महत्त्वाच्या व भयानक घडामोडी सुरूं झाल्या होत्या. जर्मनींत नाझी सत्ता स्थापन झाली. सगळ्या जगांत प्रतिक्रांति घडवून आणण्याचें मुख्य केंद्र म्हणून नाझी पक्ष कार्य करूं लागला. रॉय यांचें बर्लिन येथें पुष्कळ वर्षें वास्तव्य होतें. तेथें त्यांनीं स्वतःचें खाजगी पुस्तकालय मोठ्या परिश्रमानें तयार केलें होतें. '**ब्रिटिश साम्राज्याचा उदय व ऱ्हास**' नामक एक मोठा प्रबंध रॉय यांनीं लिहून तेथें ठेवला होता. हें पुस्तकालय त्या प्रबंधासह नाझींनीं जाळून टाकलें. त्यामुळें अनेक वर्षांचे लेखनाचे परिश्रम फुकट गेले. रॉय यांच्या पत्नी एलन त्यावेळीं बर्लिनमध्यें होत्या. त्या नाझींच्या कचाट्यांतून कशाबशा निसटल्या व पॅरिसला येऊन पोहोंचल्या. अशाच प्रकारें पुष्कळ कम्युनिस्टांना जर्मनींतून पळ काढावा लागला. नाझींनीं आपल्या विरोधी पक्षाचा अनन्वित छळ चालविला होता. युरोपिअन राजकारणावर याचे विलक्षण परिणाम घडून येत होते. रॉयना यासंबंधी सगळी खबर कारागृहांत मिळत होती. त्यामुळें त्यांचें मन अत्यंत विषण्ण होत असें. या गोष्टीचा त्यांच्या प्रकृतीवरहि विपरीत परिणाम झाला. वजन १८२ पौंडांपासून १४० पौंडांपर्यंत घटलें !

याच सुमारास मी रॉय यांच्या सान्निध्यांत आलों. माझी कोठडी त्यांच्यापासून १० यार्डांवर होती. वरील वर्णन केलेली परिस्थिति व अवस्था मी प्रतिदिन पहात होतों. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी कीं, मन चिन्ताक्रांत

आणि प्रकृति ढासळत असतांनाहि ते उच्च विद्यापीठांतील परिश्रमांना लाजवतील असले विद्याविषयक परिश्रम करीत होते. त्यांचें तत्त्वज्ञान व विज्ञान यांवरील विस्तृत व वैविध्यपूर्ण लेखनकार्य चाललेलें पाहून या व्यक्तीचें निराळेंच आंतरिक स्वरूप माझ्या निदर्शनास आलें. जग तर समजत होतें कीं, हा एक मुख्यतः मोठा राजकारणी पुरुष आहे. त्यांच्या लेखनकार्याकडे पाहून असें वाटूं लागलें कीं, हा आधुनिक युगाचा एक महान् दार्शनिक म्हणून जगाला कालांतरानें दिसून येईल.

त्यांचें महत्त्वाचें लेखनकार्य जवळ जवळ ३ वर्षांत पुरें झालें. इतर विचार करायला फुरसत मिळाली. त्यामुळें कारागृहाबाहेर असलेल्या श्री. कर्णिकांसारख्या मित्रांशीं अप्रत्यक्ष वैचारिक देवघेव करतां यावी, अशी रॉय यांना उत्कंठा लागली. त्यांच्या पत्नी एलन त्यावेळीं परदेशांत होत्या. सरकारी नियमाप्रमाणें रॉय यांना महिन्यांतून एकच पत्र लिहिण्यास परवानगी होती; आणि तेंहि केवळ पत्नीलाच. मी रॉय यांचें तुरुंगाबाहेर दळणवळण स्थापित करण्याचा मार्ग हुडकीत होतों. एक दिवशीं एक धाडस करून पाहिलें. शंकास्पद होणार नाहीं अशा एका पत्त्यावर अंदाज बांधून एक पत्र सहज टाकून पाहिलें. हें पत्र जसें कांहीं अंतराळांतच टाकलें होतें ! तें कोठेंतरी जाऊन पडायचें व नाहींसें व्हायचें. परंतु त्या पत्रानें नेमका पत्ता गांठला. केवळ योगायोगाचीच परीक्षा पहात होतों. एका आठवड्यांत त्या योग्य पत्त्यावरून उलट उत्तरहि बिनचूकपणें मिळालें. बाहेरच्या जगाशीं उत्तम सांधा जुळला. त्यामुळें आमच्या आनंदाला पारावार उरला नाहीं. विलक्षण यशस्वीपणानें आणि कार्यक्षमतेनें बाहेरच्या जगांतील हालचालींना कारागृहाच्या प्राकारांतून मार्गदर्शन मिळूं लागलें. सी आय्. डी. नें शर्थ करूनहि या संबंधाचा धागा त्यांना सांपडूं शकला नाहीं. हा संबंध जेलच्या अधिकाऱ्यांनाहि हुडकतां आला नाहीं. आम्ही मात्र आमचा मार्ग पुनः पुनः बदलीत होतों. या गूढ मार्गांनीं फार मोठा पत्रव्यवहार बाहेर जात होता व आंत येत होता. त्यांतील कांहीं भाग तर ऐतिहासिक दृष्टीनें फारच महत्त्वाचा ठरला.

अधिकाऱ्यांचा सक्त हुकूम होता कीं, माझी रॉय यांच्याशीं भेट होऊं द्यावयाची नाही. तशी आम्हां दोघांवर देखरेख करणाऱ्या शिपायाला व वॉर्डरला ताकीद देऊन ठेवलेली होती. परंतु शिपाई आणि वार्डर आमची भेट घडवून आणण्याच्या बाबतींत उत्सुकता दाखवीत. आमची भेट संथपणें व्हावी, त्यांत व्यत्यय येऊं नये, कितीहि वेळ लागला तरी हरकत नाहीं, या करितां सर्वप्रकारची व्यवस्था ते करीत. मला या भेटीगांठीमध्यें महान् लाभ झाला. वर्तमान् जगांतील सर्व महत्त्वाच्या घडामोडींचें तपशीलवार व सूक्ष्म ज्ञान असलेल्या या गृहस्थांचा सहवास म्हणजे अपूर्व लाभ होता, जिवंत ज्ञानकोशाच्या सन्निध मी आहे, असें मला नित्य भासें.

सामान्य माणसाबद्दल प्रेम आणि आदर रॉय यांच्या ठिकाणीं इतका वसत होता कीं, त्यांच्या अस्तित्वानें त्या रुक्ष आणि कठोर कारागृहाच्या वातावरणांत विलक्षण माधुर्य पसरलें. गुन्हेगार कैद्यांचीं अंतःकरणें त्यांच्याकडे आकर्षिलीं गेलीं, एवढेंच नव्हें, तर जेलचा सरकारी अधिकारी वर्ग व कामगार-वर्गहि रॉय यांच्याबद्दलच्या आदरानें विनम्र बनला. रॉय यांना कसलीहि मदत करण्याची संधि मिळविण्यांत त्यांना मान वाटूं लागला.

रॉय यांचे बाहेरच्या जगाशीं स्थापन झालेले संबंध सी. आय्. डी. खात्याच्या लक्षांत लवकरच आले. सी. आय्. डी. खात्यानें तशी जेलच्या अधिकाऱ्यांकडे जोराची तक्रारहि केली. बाहेरच्या जगाशीं होणारा पत्रव्यवहार व वाङ्मयाची देवघेव तावडतोब बंद व्हावयास पाहिजे, म्हणून बंदोबस्त जास्तींत जास्त आवळला पाहिजे, असा जेलच्या मुख्य अधिकाऱ्याकडे हुकूम आला. मुख्य जेलरला सुपरिंटेंडेंटनें रॉय यांची संपूर्ण झडती घेण्यासंबंधीं हुकूम दिला. मुख्य जेलर रॉय यांच्याकडे आला आणि रॉयशीं बराच वेळ गप्पा मारण्याची संधि मिळाली असें समजून ख्यालीखुशालीच्या गोष्टी बोलून निघून गेला. बरोबर आलेल्या हाताखालच्या जेलरनें मुख्य जेलरला झडतीची आठवण करून दिली. तेव्हां ‘ तूं वेडा तर नाहींस ? ’ म्हणून मुख्य जेलरनें त्याला गप्प बसविलें. सुपरिंटेंडेंटलाहि मोठा पेंच पडला. रॉयबद्दल असलेला आदर एका बाजूला आणि दुसऱ्या बाजूला वरिष्ठ अधिकाऱ्यांचा तगादा ! म्हणून कशीतरी बतावणी करून युक्त्याप्रयुक्त्यांनीं तो आपण जबाबदारी पार पाडली आहे, अशी बतावणी करी.








रॉय यांना रोज चरख्यावर कातण्याकरितां १२ छटाक लोंकर देण्यांत येई. ते हें काम अत्यंत झपाट्यानें नियमानें पुरे करीत. कामांत कधींहि अळंटळं नसे. काम चोख रीतीनें कसें करावें, याचा धडाच त्यांच्यापासून मिळे. इतर राजकीय कैदी आपलीं कामें पुरीं करण्यांत हलगर्जीपणा दाखवीत. रॉय हे आपलें काम १०॥ वाजेपर्यंत उरकून टाकीत असत. तेवढें काम इतर कैदी दोन वाजेपर्यंत उरकीत. रॉय बाकीचा बहुतेक वेळ वाचन व लेखन यांत घालवीत. विश्रांतीच्या वेळांत इतर कैद्यांशीं गप्पागोष्टी करीत किंवा खोलींत नियमानें येणाऱ्या मांजराचें अवलोकन करण्यांत घालवीत. पशुमानसशास्त्राचा अभ्यास करण्याचें साधन म्हणून त्यांना त्या मांजराचा उपयोग झाला.

जेलमध्यें ते आजारी फार पडूं लागले. प्रकृति बरी असे दिवस फार थोडे! अशाहि परिस्थितींत स्टूलवर बसून ते लेखनकार्य करीत. आजारीपणांतहि ते लेखनकार्य करीत असत. फुलस्केप कागदाचीं ६ हजार पृष्ठें त्यांनीं भरगच्च लिहून काढलीं. त्यांना काळाचेंहि भान राहात नसें. रात्रीं दोन वाजेपर्यंत व्यासंग सुरू असे.

जर्मनी सोडल्यावर, एलनबाई पॅरिसला येऊन राहिल्या होत्या व रशियन वकिलातींत काम करीत होत्या. त्यांचीं पत्रें नियमानें रॉय यांना मिळत. त्यांत त्या वेळीं युरोपांत चालू असलेल्या घडामोडींचें वर्णन लिहिलेलें असे. या पत्रांची रॉय हे अत्यंत आतुरतेनें वाट पहात. कित्येक वेळां सेन्सॉरमुळें पत्र पोचण्यास अवधि लागे. त्यामुळें ते बेचैन झालेले दिसत. एलनबद्दलचा त्यांचा ओढा आणि तळमळ ते जरी प्रगट होऊं देत नसत तरी त्यांच्या बोलण्यांत नाजुकपणें केव्हांतरी ती उघडकीस येई. जर्मनींतून व इतर देशांतून शरणार्थी म्हणून आलेल्या रॉय यांच्या अनेक मित्रांना एलननीं पॅरिस येथें त्या दिवसांत आश्रय दिला होता. एलन आपलें स्वतःचें बहुतेक उत्पन्न मित्रांच्या पोषणाकरितां खर्चून टाकीत असत. इकडे रॉय यांनाहि अत्यंत महाग असलेलीं पुस्तकें व नियतकालिकें विकत घेऊन पाठवीत असत. एलनवर अशा प्रकारचा स्वखुषीनें पत्करलेला फारच मोठा बोजा होता! त्याकरितां रात्रंदिवस कष्ट करावे लागत. त्यांत पुनः दीर्घ विरहाची वेदना एलनच्या चित्तांत घर करून बसली होती. परंतु केव्हांतरी पुनः भेट होणारच, या आशेनें हातून सर्व प्रकारचे श्रम करण्यास आवश्यक इतकी उमेद त्यांना लाभे. रॉय यांना याची तीव्र जाणीव होती हें केव्हांतरी उघडकीस येत असे.

रॉय यांचा मानी स्वभाव कारागृहांतील जीवनांत अनेक वेळां प्रकट झाला. सुपरिंटेंडेंटला पुष्कळ वेळां ते खडसावीत. तेव्हां ते परिणामाचा कांहींएक विचार करीत नसत. एकदां सकाळीं सात वाजतां कमिशनर जेलला भेट देण्याकरितां आला. सुपरिंटेंडेंटनें कमिशनरला रॉय यांच्या कोठडीपाशीं आणलें. रॉय गाढ झोपले होते. त्या कोठडींतील दुसऱ्या कैद्याला रॉयनां उठविण्यासंबंधीं हुकूम देण्यांत आला. पण त्या कैद्यानें हुकूम मानण्याचें साफ नाकारलें. रॉय यांची झोपमोड करणें त्याला पूर्ण नापसंत होतें. शेवटीं नाइलाजानें सुपरिंटेंडेंटनें बुटाचे आवाज काढले. रॉय जागे झाले. परिस्थिति लक्षांत घेऊन तडाख्यानें म्हणाले ' इतक्या लवकर मला भेट घेण्याची संवय नाहीं! '

माझ्याबद्दल थोडेसें सांगतों. मी ' क ' वर्गाचा कैदी होतों. माझ्याबद्दल रॉयना खोल जिव्हाळा वाटत होता. अगदीं बारीकसारीक गोष्टींतहि ते माझी काळजी घेत. माझ्या सुखसोयीकडे सतत लक्ष पुरवीत होते. स्वतःच्या अन्नांतील आणि इतर सामानांतील भाग ते मला नेहमीं पाठवीत. त्यांना स्वखर्चानें कांहीं वस्तू पुढें मिळूं लागल्या त्यांतीलहि भाग बिनचूकपणें ते मला पोचवीत. त्यामुळें माझें मन उपकारबुद्धीनें भरून गेलें. माझी मैत्री जडली. १९३४ च्या मे महिन्यांत हिमालयांतील आल्मोडा येथील जेलमध्यें रॉय यांना ५ महिन्यांकरितां ठेवलें होतें. त्यानंतर पुनः ते बरेली – जेलमध्यें परतले. त्यानंतर त्यांना डेहराडूनच्या जेलमध्यें ठेवण्यांत आलें. त्यांचा आणि माझा वियोग झाला. मला नैनीच्या कारागृहांत रवाना केलें. कॉंग्रेस समाजवादीपक्षाच्या संस्थापक नेत्यांनीं पाठविलेलीं महत्त्वाचीं पत्रें मला किंवा रॉयना बरोबर नेतां आलीं नाहींत. तो पत्रव्यवहार बरेलीच्या कारागृहांतच कोठेंतरी लुप्त झाला. आपण विनाकारण पक्ष स्थापन केला अशा तऱ्हेची कबूली त्या पत्रव्यवहारांत होती.











श्री. आर्. एल्. निगम

# रॉय यांचें राजकीय तत्त्वज्ञान

## मूलगामी तत्त्वज्ञानाची आवश्यकता

हल्लीं विद्येच्या क्षेत्रांत एकाच ज्ञानशाखेला वाहून घेऊन केवळ त्याच शाखेंत तज्ज्ञ निर्माण करण्या-(Specialization)कडे जी प्रवृत्ति दिसत आहे ती अत्यंत अनिष्ट व विकृत होय. त्यामुळें विचाराच्या क्षेत्रांत खातेबाजी किंवा कप्पेबाजी (Departmentalism) उत्पन्न झाली असून त्याचा परिणाम विसंगत आणि गोंधळ-गबाळ कृति होण्यांत झाला आहे. सामाजिक तत्त्वज्ञानांतूनच राजकीय तत्त्वज्ञान उद्भवतें. त्या सामाजिक तत्त्वज्ञानालाच दुय्यम व गौण लेखण्याकडे विद्याक्षेत्रांतील महापंडितांची व प्राध्यापकांची प्रवृत्ति बहुशः आढळून येते. "अहो हें ना ! हें नुसतें सामाजिक तत्त्वज्ञान. हें खरें तत्त्वज्ञान नव्हे !" असें हे महापंडित म्हणत असतात ! असें म्हणून त्यांना हें ध्वनित करायचें असतें कीं, खरें तत्त्वज्ञानाचें हृद्गत अवगत झाल्याशिवायहि एकाद्याला सामाजिक किंवा राजकीय तत्त्वज्ञानी म्हणूत मिरवितां येतें ! आणि हा त्यांचा ध्वनितार्थ अत्यंत अनिष्ट आणि विघातक होय. याचा एक अनिष्ट परिणाम असा झाला आहे कीं कोणीहि लोकप्रिय राजकारणी माणसानें उठावें, दोनचार चुरचुरीत भाषणें वा पत्रकें काढावींत, त्यांतून आपल्या मनांतील राजकारणी डावपेंच व व्यूह प्रकट करावेत आणि राजकीय तत्त्वज्ञानी म्हणून खुशाल टेंभा मिरवावा ! खरें म्हणजे, खऱ्या व संपूर्ण अर्थानें मनुष्य तत्त्वज्ञानी असल्याशिवाय त्याला सामाजिक वा राजकीय तत्त्वज्ञानी होतां येणार नाहीं. मूळ तत्त्वज्ञानाचा विषय '**मानव आणि निसर्ग**' हा आहे, तर सामाजिक तत्त्वज्ञान व राजकीय तत्त्वज्ञान यांचे विषय अनुक्रमें '**मानव आणि समाज**' आणि '**मानव आणि राज्यसंस्था**' हे आहेत. 'मानव आणि निसर्ग' या विषयाची स्पष्ट कल्पना आल्याशिवाय, 'मानव व समाज' आणि 'मानव व राज्यसंस्था' या विषयांचें तर्कशुद्ध व अर्थपूर्ण आकलन कोणालाहि होऊं शकणार नाहीं, हें स्पष्टच आहे. याचाच अर्थ असा कीं सामाजिक आणि राजकीय तत्त्वज्ञानांचा खरा मूळ आधार मौलिक तत्त्वज्ञान हेंच होय. सामाजिक व राजकीय क्षेत्रांत जर कोणतीहि खरी विवेकपूर्वक अर्थपूर्ण कृति करावयाची असेल तर ती कृति कांहीं भक्कम अशा मार्गदर्शक तत्त्वांवरच आधारलेली असली पाहिजे. म्हणजेच त्या कृतीच्या मागें भक्कम असें सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञान पाहिजे. तें सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञान जर केवळ कांहीं तात्पुरत्या गृहीत कृत्यांच्या भांडवलावर दोनचार इकडून तिकडून गोळा करून आणलेल्या तत्त्वांची नुसती गोळाबेरीज असेल, तर सामाजिक व राजकीय तत्त्वज्ञानास खरा बिनचूकपणा व भक्कमपणा लाभणार नाहीं. आज विसाव्या शतकांत असें प्रतिपादन करून आम्ही अगदीं 'अभिनव कल्पना' मांडीत आहों असें नव्हे. पण इतका काळ लोटल्यावर आजहि वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं ही कल्पना सर्वसाधारणपणें सुशिक्षितांतहि प्रचलित असलेली आढळून येत नाहीं. अगदीं बहुसंख्य जनतेच्या किंबहुना सुशिक्षित बुद्धिजीवी म्हणविणाऱ्यांच्या जाणिवेंतहि ही कल्पना शिरलेली दिसत नाहीं. म्हणूनच या कल्पनेवर भर देऊन ती ठसविणें जरूर आहे.

'नवभारता'करितां मूळ इंग्रजींतून लिहिलेल्या लेखाचा प्रस्तुत लेख अनुवाद आहे. — का. सं.

## ' पदार्थविज्ञानाधिष्ठित वस्तुवाद ' व ' मूलगामी लोकशाही '

रॉय यांनीं या विचारावर मुद्दाम भर देऊन ती बिंबविण्याचा जो प्रयत्न केला तो अत्यंत समयोचित आणि इष्ट होता. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें तर "सर्व जीवनाला व अस्तित्वाला व्यापून टाकणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या अधिष्ठानाशिवाय व्यक्तीच्या आणि समाजाच्या जीवनाचे प्रश्न सोडविण्याचे मार्ग हे चुकीचे ठरणें अपरिहार्यच होय." रॉय यांना एकाच नव्हे तर अनेक देशांतून राजकीय आणि सामाजिक चळवळींतून भाग घेतांना, दीर्घ, विविध आणि बहुरंगी अनुभव आले. तसेंच त्यांचें जीवनभर अखंड चिंतन-मनन चालूंच होतें. सामाजिक आणि राजकीय चळवळींच्या बुडाशीं कोणती गृहीत कृत्यें व उपपत्ती असतात, याचें ते सदैव परीक्षण–निरीक्षण–संशोधन करीत असत. सामाजिक राजकीय चळवळींच्या बुडाशीं गृहीत धरलेल्या उपपत्ती आतां जुन्यापुराण्या झाल्या असून त्या अपुऱ्या ज्ञानावर आधारलेल्या म्हणूनच अपुऱ्या ठरल्या आहेत असें त्यांना आढळून आलें. अलीकडे आपल्या ज्ञानांत प्रचंड भर पडली आहे. मानव, निसर्ग व जीवसृष्टि यांच्या गूढ रहस्यांत विज्ञानानें खोल प्रवेश केला असून त्यानें नवनवीन विचार व सिद्धान्त हस्तगत केले आहेत. या नवीन प्राप्त झालेल्या ज्ञानाच्या प्रकाशांत आपले विचार तपासून पहाणें आणि तदनुसार आपल्या आचाराला नवी दिशा लावणें अगत्याचें झालें आहे. हें कार्य करावें असेंच सांगून रॉय स्वस्थ बसले नाहींत, तें कार्याची जबाबदारीहि त्यांनीं स्वतः पत्करली आणि ती इतकी चांगल्या रीतीनें पार पाडली कीं, त्यांनीं रचिलेलें तत्त्वज्ञान हें अतिवस्तुवाद ( Metaphysics ) न राहतां ' पदार्थविज्ञानाधिष्ठित वस्तुवाद' ( ' Physical-Realism ' ) बनलें; त्यांचें सामाजिक तत्त्वज्ञान 'नवमानवतावादा'च्या रूपानें साकार झालें आणि त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानानें ' मूलगामी लोकशाही ' ( ' Radical Democracy ' ) चें रूप घेतलें. प्रस्तुत लेखांत फक्त त्यांच्या ' मूलगामी लोकशाही ' या राजकीय तत्त्वज्ञानाचाच विचार कर्तव्य आहे.

### व्यक्ति आणि राज्य

वर सांगितलेंच आहे कीं, राजकीय तत्त्वज्ञानाचा विषय ' मानवी व्यक्ति आणि राज्यसंस्था ' हा आहे. व्यक्ति आणि राज्यसंस्था दोन्हीहि आपल्या मूलभूत हक्कांबद्दल हिरिरीनें दावा करीत असतात. या दोहोंच्याहि हक्कांचा अविरोधानें समन्वय कसा साधावयाचा, हाच राजकीय तत्त्वज्ञानांतील मूलभूत प्रश्न आहे. या प्रश्नाचा जर सूक्ष्मपणें अभ्यास केला तर त्यांतून अनेक मुद्दे निघतात, असें दिसून येईल. ' मानवी व्यक्ति आणि तिचें महत्त्व म्हणजे काय ' या प्रश्नाचें उत्तर सामाजिक तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानें मिळतें असें जरी गृहीत धरलें तरी, दुसरा प्रश्न ' राज्यसंस्था म्हणजे काय ? ' हा शिल्लक उरतोच. राजकीय तत्त्वज्ञानानें या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे. तें देतांना त्यांतूनच जो दुसरा संलग्न प्रश्न उत्पन्न होतो तो हा कीं, " राज्यसंस्थेचा व्यक्तीवर अधिकार कसा उत्पन्न होतो व कशाच्या बळा-( sanction )वर तो अमलांत येऊं शकतो ?. " या प्रश्नाचेंहि उत्तर राजकीय तत्त्वज्ञानानें दिलें पाहिजे. या प्रश्नाचा अधिक विचार केला असतां, आपणांस असें दिसून येईल कीं आजचीं राज्यें ( States) पक्षांचींच राज्यें बनण्याकडे अधिकाधिक प्रवृत्ति दिसून येत आहे. म्हणूनच राजकीय तत्त्वज्ञानानें पहिल्यांदा राजकीय पक्षांचें स्वरूप व त्यांचें स्थान या प्रश्नांचा समाधानकारक ऊहापोह केला पाहिजे. तरच तें राजकीय तत्त्वज्ञान समाधानकारक आहे असें म्हणतां येईल. कोणतेंहि राज्य एकाकी, इतर राज्यांपासून संपूर्णपणें अलिप्त असें राहूंच शकत








नाहीं. यांतूनच राज्याराज्यांमधील संबंधाचा विचार उद्‌भवतो व या विचारांतूनच आंतरराष्ट्रीयवाद, युद्ध, शांतता इत्यादि प्रश्न निर्माण होतात. या सर्व प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें राजकीय तत्त्वज्ञानानें दिलीं पाहिजेत, तरच तें खरें सर्वस्पर्शी राजकीय तत्त्वज्ञान होय. रॉय यांच्या राजकीय तत्त्वज्ञानानें या सर्व प्रश्नांना छातीठोकपणें तोंड दिलें असून त्यांचीं उत्तरेंहि त्यांनीं अगदीं निःसंदिग्ध रीतीनें दिलीं आहेत.

## मानवालाच प्राथम्य

राजकीय तत्त्वज्ञानांतील अगदीं पहिला व अत्यंत मूलभूत प्रश्न हा आहे कीं, व्यक्ति आणि राज्यसंस्था यांचे संबंध काय व कसे असावेत हें ठरविणें. या प्रश्नावर शतकानुशतकें चिंतन-मनन होऊनहि त्याचें समाधानकारक उत्तर मिळालेलें नाहीं. उलट, वैचारिक गोंधळ अधिकच माजला आहे. त्या वैचारिक गोंधळाचें एक प्रत्यंतर हें कीं, अलीकडील बहुतेक राजकीय तात्त्विक उपपत्तींमधून, व्यक्ति आणि राज्यसंस्था यांचें द्वंद्व मानलें गेलें असून त्या द्वंद्वांत व्यक्ति ही राज्यसंस्थेची विरुद्ध कोटि गणली गेली आहे. या मधल्या काळांत राज्यसंस्थेची सत्ता जसजशी वाढत गेली, तसतशी राज्यसंस्था ही अधिक महत्त्वाची वाटूं लागली आणि त्या मानानें व्यक्तीचें महत्त्व कमी कमी होत गेलें. इतकें कीं, त्या मागील मूलभूत प्रश्न उत्तम रीतीनें सोडवायचा मार्ग म्हणजे राज्यसंस्थेंत व्यक्तीला अजीबात विलीन करून टाकणें हाच होय असें मानलें गेलें. कांहीं राजकीय तात्त्विक उपपत्तींतून तर, व्यक्तीचें राज्यांत विलीनीकरण हा पहिला मूलभूत सिद्धान्त म्हणूनच अगदीं प्रांजळपणें मांडला गेला. इतर दुसऱ्या राजकीय उपपत्तींतून इतक्या प्रांजळपणें नसला, तरी संदिग्धपणें का होईना, तोच सिद्धान्त मूलभूत मानला गेला. परंतु अशा तऱ्हेचा चुकीचा सिद्धान्त मांडायला आज तरी कांहीं कारण उरलें नाहीं. प्राचीन काळीं मानव, समाज आणि राज्यसंस्था यांसंबंधीं ज्या एकांगी, अपुऱ्या कल्पना मांडल्या गेल्या, त्या त्यावेळीं उपलब्ध असलेल्या एकांगी, अपुऱ्या ज्ञानाचें प्रतिबिंब होत. त्या वेळच्या चुकीच्या कल्पना म्हणजे त्या वेळच्या अज्ञानाचा अपरिहार्य परिणाम होय. आधुनिक काळीं ज्ञानांत प्रचंड वाढ झाली असून, त्या योगें आपले सिद्धान्त अधिक व्यापक व वस्तुस्थितीशीं अधिक जुळणारे असे मांडणें शक्य झालें आहे. म्हणून पूर्वीच्या चुकीच्या कल्पना पुढें ' यथापूर्व ' चालूं न ठेवतां त्या दुरुस्त केल्या पाहिजेत. रॉय यांनीं, हे मूळ कूटप्रश्न सोडविण्याकरितां, आधुनिक ज्ञानाच्या प्रचंड निधीचा उपयोग केला आहे. त्यांच्या मतें, मानव म्हणजे केवळ विचारांच्या अंतराळांत विहरणारें, प्रत्यक्षापासून अलिप्त असें तत्त्व ( abstraction ) नाहीं; तसेंच समाज किंवा राज्यसंस्था ही केवळ अतिवस्तुवादी ( metaphysical ) कल्पनाहि नाहीं. इतर ज्ञानशाखांबरोबर प्राणिशास्त्र आणि मानवजातिशास्त्र ( Anthropology ) या ज्ञानशाखांतील जें अद्ययावत् संशोधन झालें आहे तें संशोधन लक्षांत घेऊन रॉय यांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं, " मानव हाच सर्वोच्च व सर्वश्रेष्ठ ( sovereign ) होय; तोच समाजाचा जनक आहे; राज्यसंस्थेचाहि विधाता तोच आहे." जीवनसंग्रामांत आपण जगावें व टिकून राहावें म्हणून मानवाची जी आरंभापासून अविरत धडपड चालू आहे, त्या धडपडीचा एक भाग म्हणूनच, " आपली धडपड यशस्वी व्हावी, आपण अधिक कार्यक्षम रीतीनें समाज टिकाव धरून रहावें " याकरितांच त्यानें समाज निर्माण केला आहे. मानवाच्या सर्व धडपडीच्या मागें स्वातंत्र्याची मूलभूत प्रेरणा आहे. ' जीवो जीवस्य जीवनम् ' या न्यायानें प्राण्यांची जी जीवनाकरितां सतत धडपड चालत आली आहे,







त्याच धडपडीचा उच्च पातळीवर दिसून येणारा आविष्कार म्हणजेच मानवाची ही स्वातंत्र्याची दुर्दम्य प्रेरणा होय. म्हणून मानव जीं जीं विविध साधनें निर्माण करीत असतो त्या सर्व साधनांचें साध्य एकच आहे : तें म्हणजे मानवाचें स्वातंत्र्य अधिकाधिक विकसित, व्यापक आणि सखोल करणें हें होय. मानव यशस्वी किती झाला आहे याचें प्रमाण तो स्वतंत्र किती झाला आहे यावरून ठरेल. मानवानें निर्माण केलेल्या साधनांपैकीं, समाज आणि राज्यसंस्था हीं दोन अत्यंत महत्त्वाचीं साधनें होत. म्हणूनच समाज आणि राज्यसंस्था यांच्या आधीं मानवाला पहिलें स्थान आहे. मानव आधीं; समाज, राज्यसंस्था मागून !

### व्यक्ति हा समाजाचा छोटा नमुनाच !

मानव, समाज आणि राज्यसंस्था याविषयीं रॉय यांचा जो उपरिनिर्दिष्ट सिद्धान्त आहे त्याचा जर खोल विचार केला तर मूलभूत जो कूटप्रश्न तो सुटूं लागतो. विचाराअंतीं पटूं लागतें कीं, व्यक्तीवर राज्यसंस्थेचा अमर्याद आणि निर्बाध अधिकार असणें आवश्यक नाहीं. मनुष्य हाच राज्यसंस्थेचा जनक असल्यामुळें, त्यानेंच राज्यसंस्थेवर नियंत्रण ठेवून तिला इष्ट तें वळण दिलें पाहिजे; राज्यसंस्थेनें मानवाला नव्हे ! पूर्वी होऊन गेलेल्या कांहीं राजकीय तत्त्वज्ञान्यांनीं आपल्या राजकीय उपपत्तींत मानवाला प्रथम स्थान दिलें, हें खरें. परंतु त्याच राजकीय तत्त्वज्ञान्यांनीं आपल्या उपपत्ती प्रत्यक्ष अमलांत आणतांना त्या तत्त्वाला मुरड घातली. याचें कारण, त्यांच्या मूळ कल्पनाच स्पष्ट नव्हत्या, हें होय. रॉय यांनीं जुन्या चुका दुरुस्त करून 'मानव हाच सर्वश्रेष्ठ' हा जो सिद्धान्त शास्त्रांच्या भक्कम आधारावर मांडला आहे, त्याला त्यांनीं मुरड घातली नाहीं किंवा त्याबाबत तडजोडहि केली नाहीं. 'मानव हा समाजाचा मूळ प्रथम स्वरूप ('Archetype of Society') होय' असें ते मानतात. त्यांनीं म्हटलें आहे : "सर्वच्या सर्व समाजाचा सांचा (Pattern) विकसित करण्याची सुप्त शक्ति प्रत्येक व्यक्तींत मूळचीच आहे. म्हणून व्यक्तीला आपल्या स्वातंत्र्याला तिलांजलि न देतां आपल्या सामाजिक जबाबदाऱ्या पार पाडतां येतील."

### सहकारी राज्यें

व्यक्तीचे हक्क आणि राज्यसंस्थेचे अधिकार यांचा अविरोधानें समन्वय कसा करावयाचा या प्रश्नाला तोंड देतांना इतर राजकीय तत्त्वज्ञांनीं मूळ तत्त्वाला जी मुरड घातली आहे ती मानवाचें स्वातंत्र्य, मानवाचें महत्त्व आणि सर्वश्रेष्ठत्व यांना विघातक ठरली असून, तिच्यामुळें राज्यसंस्थेला उगीचच, मायबाप-सरकारचें (Paternal), सर्वज्ञतेचें, बुद्धीला न पटणारें स्वरूप त्यांनीं आणून दिलें आहे. राज्यसंस्था कधीं चुकत नाहीं, ती नेहमीं निःपक्षपाती आणि सत्प्रवृत्त असते हें त्यांचें म्हणणें आपल्या स्वतःच्या अनुभवाच्या आणि इतिहासाच्या निकषावर टिकत नाहीं. असाच वरवर विचार करणारा दुसरा एक राजकीय तत्त्वज्ञांचा पंथ आहे. राज्यसंस्था हें एक सुसंघटित दडपशाही-(Coercion)चें साधन आहे, असें हा पंथ मानतो. "सुसंघटित दडपशाहीचें साधन स्वीकारणें हें वाईट खरें. पण नाइलाज म्हणून आम्ही तें तात्पुरतें स्वीकारलें आहे. आम्ही लवकरच अशी परिस्थिति निर्माण करणार आहोंत कीं, त्या परिस्थितींत राज्यसंस्था ही आपोआप ('wither away') सुकून नाहींशी होईल" असें या पंथाचे तत्त्वज्ञ, कांहींतरी कामापुरतें गृहीतकृत्य मानून, प्रपादीत असतात. परंतु आपणांस जो प्रत्यक्ष अनुभव दिसून येतो तो पहातां यांची स्थिति 'इतो भ्रष्टः ततो भ्रष्टः' अशी झालेली दिसून येते. उलट पक्षीं, रॉय ज्या दिशेकडून विचार करावयास निघतात, ती दिशा बरोबर आहे, असें दिसून येईल. आपल्यापुढील पहिलें कार्य व्यक्ति आणि राज्यसंस्था यांचा समन्वय










करूं पहाणें हें नव्हे; मानवाचें सर्वश्रेष्ठत्व प्रस्थापित करणें हें पहिलें कार्य, हें त्यांनीं स्पष्ट ओळखलें आहे. तें केल्यावर पुढील काम म्हणजे समाजांत अशा संस्था विकसित करून दाखविणें कीं ज्या संस्थांमधून मानवाचें सर्वश्रेष्ठत्व प्रतिबिंबित होईल. प्रचलित संस्थांपैकीं ज्यांना इष्ट आकार देणें शक्य असेल त्यांना तो आकार अवश्य द्यावा. ज्यांना तो देतां येत नसेल, त्या संस्थाच बदलून टाकणें अपरिहार्य होय. रॉय त्यांच्या कल्पनेपुढें जो समाज आहे, त्या समाजांतील सर्व पायाभूत संस्था सहकारी ( Cooperative ) संस्थाच असणार. कारण खुद्द समाज देखील मानवी सहकार्याचें साधन आणि आविष्कारच आहे. राज्यसंस्था ही देखील सहकारी राज्यसंस्था बनली पाहिजे.

### स्थानिक लोकसमिति हा मूलघटक

अशा रीतीनें रॉय यांनीं राज्यसंस्थेचें एक कल्पनाचित्र असें विकसित करून दाखविलें आहे कीं ज्यांत राज्यसंस्थेकडून मानव गिळंकृत होत नाहीं, ज्यांत मानवाचें स्वातंत्र्य आणि श्रेष्ठत्व नुसतें कायद्याच्या रम्य कल्पनेंतच नांदत नाहीं, तर त्याला या गोष्टींचा प्रत्यक्ष लाभ होऊन त्यांच्या शाश्वतीची व अधिकाधिक विकासाची खात्री वाटते. अशा रीतीनें समाज आणि राज्यसंस्था यांच्यांत 'आ'वासून उभी राहिलेली दरी सुखानें ओलांडून जातां येते. रॉय यांच्या कल्पनेंतील राज्यसंस्था लहान लहान, सुसंघटित अशा स्थानिक लोकशाही संघटनांच्या आधारावर पिरॅमीड-सारखी रचलेली आहे.

मोठमोठ्या लोकसंख्या असलेल्या राज्यांतून खरी व परिणामकारक लोकशाही हीं कशी नांदूं शकेल हेंहि त्यांनीं दाखविलें आहे. या लोकशाही संघटनांचा अगदीं मूलभूत आणि प्राथमिक घटक म्हणजे 'स्थानिक लोकसमिति' ('Local People's Committee') होय. या समितीची सदस्यसंख्या इतकी परिमित आणि सुटसुटीत ठेवली आहे कीं, त्यांतील प्रत्येक सदस्याला परिणामकारक रीतीनें त्यांत काम करतां येईल. या लोकसमिती म्हणजे अफाट समुद्रावरील लहान लहान तरंगतीं बेटें नव्हत. सबंध राज्य हा जर आपण एक प्रचंड **पिरॅमिड** मानला तर त्याचे पायाभूत मूल घटक म्हणजे या 'लोकसमिती' होत. म्हणूनच त्या लोकशाही नियोजनाचीं, जनसत्तेचीं परिणामकारक केन्द्रें होऊं शकतील. त्यांच्यामधून लोकांचें कर्तृत्व, पुढाकार आणि सहकार्य हीं प्रतिबिंबित होऊं शकतील आणि राज्यकारभारावर थेट लोकांचीच सत्ता चालूं राहील याची शाश्वती मिळूं शकेल.

रॉय यांनीं '**स्वतंत्र भारताकरितां घटना : एक मसुदा**' जो तयार केला त्यांत त्यांनीं ही आपली सर्व योजना मांडून दाखविली आहे. प्रांताच्या लोकसभेकरितां आणि संघराज्याच्या लोकसभेकरितां जे उमेदवार निवडून द्यावयाचे त्यांचीं नांवें या लोकसमित्यांनीं सुचवावयाचीं. हे लोकसभेंतील प्रतिनिधी जर आदेश ( Mandate ) पार पाडणार नाहींत तर त्यांनीं आपल्या जागा खालीं कराव्या अशी शिफारस लोकसमित्या करूं शकतील; किंबहुना, प्रांताच्या किंवा संघराज्याच्या प्रमुखानेंहि जागा खालीं करावी अशीहि शिफारस लोकसमित्यांना करतां येईल. या लोकसमित्या म्हणजे निवडून दिलेल्या प्रतिनिधींना मार्गदर्शन करणारीं, जनतेची इच्छा व्यक्त करणारीं मुखेंच ( Mouthpieces ) होत. लोकसमित्यांना, 'अमका कायदा करा' असें लोकसभेला सुचवितां येईल, इतरांनीं सुचविलेल्या कायद्यावर चर्चा करून आपलें मत देतां येईल, कायदेमंडळ आणि कार्यकारी मंत्रिमंडळ यांनीं आणलेल्या कायद्यासंबंधीं सार्वमत मागतां येईल. याशिवाय सार्वमताची योजना करणें, प्रांतिक आणि संघराज्याच्या लोकसभेच्या निवडणुकीच्या योजना करणें, मतदारसंघाच्या याद्या तयार










करणें या गोष्टीहि लोकसमित्या करतील. प्रांत आणि केंद्र यांच्यामध्यें जर कांहीं गोष्टीसंबंधीं वादाचा मुद्दा निघाला, तर त्या प्रांतांतील सर्व लोकसमित्यांना त्या वादग्रस्त मुद्द्यासंबंधीं मत देण्याचा हक्क राहील; त्यांत त्यांचें जें बहुमत दिसून येईल, तोच निर्णय अंतिम समजला जाईल. जर प्रांतांतील लोकसमित्यांपैकीं अर्ध्यापेक्षां जास्ती लोकसमित्यांनीं तशी मागणी केली तर प्रांताच्या लोकसभेचें विसर्जन होईल. याशिवाय या लोकसमित्यांना स्थानिक सरकारांचे अधिकार प्राप्त होतील. त्यांच्या हातीं सार्वजनिक आरोग्य, स्वच्छता, बांधकाम, प्राथमिक व दुय्यम शिक्षण, सहकारी संस्था, स्थानिक पोलिस व न्याय खातीं हीं दिलीं जातील. आवश्यक ते कर गोळा करायचा अधिकारहि या स्थानिक लोकसमित्यांना राहील.

## पक्षांना स्थान नाहीं

लोकसमित्यांची घटना व त्यांचीं कामें यांची वर जी रूपरेषा दिली आहे तीवरून हें स्पष्ट होईल कीं, या योजनेमुळें सर्वश्रेष्ठ सत्ता ज्या जनतेची त्या जनतेजवळच ती सत्ता रहाते; आणि तीहि जनतेजवळ म्हणजे समष्टीजवळ नव्हे तर तींतील अगदीं प्रत्येक व्यक्तीजवळ. या योजनेंत लोक एकत्र नांदतात व प्रत्येक व्यक्ति सत्ताधीश असते, सत्तेचें संक्रमण होत नाहीं, सत्ता प्रतिनिधींवर सोंपविली जात नाहीं. म्हणूनच सत्ता काबीज करण्याचा प्रश्नच येथें उद्‌भवत नाहीं. या योजनेप्रमाणें कांहीं थोड्या व्यक्तीच "आम्ही लोकांकरितां राज्यकारभार करतों " म्हणून राज्यासनावर जाऊन बसत नाहींत; राज्य हें लोकांचेंच व लोकच स्वतः राज्यकारभार करतात. याचा तर्कशुद्ध परिणाम असा होतो कीं, राजकीय पक्षांना —ज्या अर्थानें आपण हल्लीं राजकीय पक्ष मानतों त्या अर्थानें— या योजनेंत जागाच नाहीं. हल्लीं राजकीय पक्षांचें मुख्य कार्य, पक्ष अस्तित्वांत यायचें मुख्य कारणच हें असतें कीं, लोकांच्या नांवानें त्यांनीं राज्यसत्ता काबीज करावी ! यामुळें सत्तेकरितां जी भयंकर झोंबाझोंबी होते तीमधून आपणांस सुपरिचित असलेले शेंकडों दुराचार आणि अनाचार उत्पन्न होत असतात ! राज्यसंस्था म्हणजे राजकीय पक्षांची, राज्य हें पक्षाचें राज्य अशी हल्लींची प्रचलित कल्पना आहे. " आम्ही जनतेचे प्रतिनिधि, आमच्या हातीं जनतेनें सत्ता सुपूर्द केली आहे " असें ते पक्ष प्रतिपादीत असतात व ती सत्ता शेवटीं ते स्वतःच बळकावून बसतात ! रॉय यांच्या योजनेप्रमाणें, राज्य हें पक्षांचें राज्य होत नाहीं, तें सहकारी राज्य ( Cooperative State ) बनतें, त्याचे घटक लहान, सुसंघटित अशा स्थानिक लोकशाही संघटना असतात. त्यामुळें साहजिकच येथें राजकीय पक्षांना स्थान नाहीं. असें सहकारी राज्य अस्तित्वांत आणावयाचें साधन, सत्ता काबीज करणें हें नव्हे; लोकांना अशा राज्याच्या इष्टतेची जाणीव करून देणें व अशा राज्यांत जीं कामें व्हावयाचीं तीं करण्यास त्यांना अधिकाधिक समर्थ करणें हें होय. म्हणूनच सत्ता काबीज करण्याच्या कार्यक्रमाऐवजीं लोकशिक्षणाच्या कार्यक्रमाचा अवलंब करावा लागेल. लोकशाही समाज आणि लोकशाही राज्य हें साध्य, साध्य करून घ्यायला लोकशाहीचें शिक्षण हेंच साधन होय.

रॉय यांनीं आपल्या योजनेंत लोकशिक्षणाच्या महत्त्वाच्या स्थानावर जो भर दिला आहे तो केवळ तात्त्विक, शुष्क व निरर्थक नाहीं. त्यांनीं सुचविलेल्या लोकशिक्षणांत फार खोल दूरगामी अर्थ भरला असून, त्यांतून त्यांनीं सामाजिक आणि राजकीय परिवर्तन घडवून आणण्याचें एक नवीन चैतन्यशाली तंत्रच ( a new dynamics ), क्रान्तीची एक नवीन कल्पनाच निष्पन्न केली आहे. आतांपर्यंतचा प्रघात असा कीं, राजकीय आणि सामाजिक

पुनर्रचनेच्या विचारांनीं प्रेरित झालेल्या मंडळींनीं सुसंघटित व्हायचें. पक्ष स्थापून एक साधन निर्माण करायचें, त्या द्वारें जनतेंत शिरायचें आणि लोकांच्या अडचणी व असंतोष यावर बोटें चालवून, त्यांना प्रक्षुब्ध करायचें ! साहजिकच या पक्षनेत्यांच्या दणदणीत राणाभीमदेवी भाषणांनीं आणि पुढारीबाजीनें लोकांचा भावनाप्रक्षोभ होऊन ते अत्याचाराला प्रवृत्त होतात. व या सर्व गोष्टींचें पर्यवसान फोडतोड, हाणामारी, हिसकाहिसकी, ज्याला जें मिळेल तें बळकावून बसणें-यांत होतें व जिकडे तिकडे सर्वत्र विध्वंस दिसून येतो ! अत्याचारास पूर आला असतां, त्या पुराच्या लाटेवर आरूढ होऊन हे क्रान्तीचे नेते तरंगत येत असतात ! ते जुन्या जुलमी रूढी नष्ट करतात, त्याबरोबरच नवीन जुलुमाची स्थापना करतात ! रॉय यांना हा सर्व प्रकार मान्य नाहीं. त्यांतील मूळ कल्पनेवरच त्यांनीं ' मूले कुठार ' घातला आहे !

### क्रान्तिकारक नेत्याची कल्पना

रॉय यांच्या कल्पनेंतील क्रान्तिकारक पुढारी हा परिस्थितीनुसार स्थिर किंवा अस्थिर आसन मांडून, लोकांपासून दूर राहून लोकांचे प्रणाम घेणारा क्रान्तिवीर नव्हे ! त्यांचा क्रान्तिकारक नेता म्हणजे लोकांचा ' स्नेही, तत्त्वज्ञानी आणि मार्गदर्शक ' होय. रॉयनीं आपली नेत्याची कल्पना प्लेटोच्या ' तत्त्वज्ञ-राजे ' ( Philosopher-Kings ) या कल्पनेवरून घेतली आहे, पण प्लेटोच्या कल्पनेंतील जे अंगभूत दोष व धोके आहेत ते वर्ज्य करून. रॉय यांचा हा तत्त्वज्ञानी नेता अज्ञ जनांना तिरस्कार करणारा, स्वतःच्याच वरिष्ठ ज्ञानांत मस्त रहाणारा संन्यासी नव्हे ! मार्क्सप्रमाणेंच रॉय यांचेंहि मत असें आहे कीं, तत्त्वज्ञानाचें कार्य हें विश्वाचा अर्थ लावणें एवढेंच नसून, जगाची आपणांस इष्ट ती पुनर्रचना करणें हें देखील आहे. म्हणूनच रॉय यांनीं या क्रान्तिकारक तत्त्वज्ञानी नेत्याला हें समाजाच्या पुनर्रचनेचें सर्वश्रेष्ठ काम दिलें आहे. तत्त्वज्ञान्याच्या ठिकाणीं नुसतें ज्ञान आणि शहाणपण असून चालणार नाहीं. तो निष्काम व निःस्पृह आणि अध्यात्मदृष्ट्या (spiritually) 'मुक्त' असला पाहिजे. "अध्यात्मदृष्ट्या ' मुक्त ' " म्हणण्याचें कारण असें कीं तो जर खरा तत्त्वज्ञ असेल तर सर्व ज्ञानाचा आशय जें सत्य त्या सत्यावरील, न्यायावरील, सद्गुणावरील निष्ठेनें तो प्रेरित झालेला असला पाहिजे. त्याला मिरासदारी किंवा मक्तेदारी-मग ती मालमत्तेची असो वा ज्ञानाची असो-खपत नाहीं. म्हणूनच त्याची ममत्वबुद्धि व वासना स्वतःकरितां म्हणून भौतिक गोष्टींवर गुंतलेली नसते. तसेंच ज्ञान हें ' गूढ उपनिषद् ' म्हणून आपल्यापुरतेंच बंदिस्थ करून ठेवायचें ही जी धार्मिक पुरोहित व मंत्रतंत्र करणारे देवर्षि यांची वासना असते तीपासूनहि तो संपूर्णपणें अलिप्त असतो. आपल्याला जें ज्ञान आहे त्यांत इतरांनींहि सहभागी व्हावें, हें त्याला हवें असतें. किंबहुना, ज्ञान सर्वसामान्य लोकांत अगदीं शेवटपर्यंत प्रसृत व्हावें, हाच त्याला ध्यास लागलेला असतो. उपलब्ध सर्व ज्ञानाचा लोकांत प्रसार करणें, लोकांना ज्ञान मिळवावयास, विचार करावयास, निर्णय आणि कृती करावयास समर्थ करणें हें तो आपलें कर्तव्य समजतो. याच मार्गानें खरी क्रान्ति-म्हणजेच मानवानें करावयाची समाजाची पुनर्घटना - घडून येईल. क्रान्तीची प्रगति व पूर्ति म्हणजे शेवटीं चैतन्यशाली गतिमान् विचारांचाच, विचारांच्या गतिशास्त्राचा-( dynamics of ideas ) चाच आविष्कार होय.

### साध्य आणि साधनें

यांतून पुढें ओघानेंच रॉय यांच्या राजकीय विचारांतील आणखी एक महत्त्वाचा मुद्दा निघतो. लोकशिक्षणावर त्यांनीं जो भर दिला आहे आणि ' तत्त्वज्ञ-राजे ' ही जी कल्पना त्यांनीं विशेष कटाक्षानें मांडली आहे, त्यांतून त्यांचा साध्य आणि साधनें यांमधील जिव्हाळ्याची सुसंगति










(correspondene between the means and the ends) साधावयाचा प्रयत्न दिसून येतो. आपल्या आधुनिक काळच्या अरिष्टमय परिस्थितीला एक अत्यंत महत्त्वाचें जर कोणतें कारण असेल तर तें, राजकीय तत्त्वज्ञान्यांनीं आणि प्रत्यक्ष राजकारणी पुरुषांनीं साध्य आणि साधनें यांच्यामध्यें केलेला गोंधळ व गल्लत, हें होय. "साध्यावरून साधनाचें समर्थन होतें" (End justifies the means) या तत्त्वानेंच आतांपर्यंत प्रत्यक्ष राजकारणावर पगडा बसविला आहे. साधनें आणि साध्य हीं परस्परांशीं सुसंवादी, सुसंगत व समान पाहिजेत असा रॉय यांचा कटाक्ष आहे. साध्य आणि साधन यांमधील संबंध हा तर्कशुद्ध (logical), अंगांगिभावयुक्त आहे, नुसता नैमित्तिक किंवा तांत्रिक (instrumental) नाहीं, असें रॉय यांचें म्हणणें आहे. वाईट साधनांनीं चांगलीं साध्यें कधींहि साध्य होणार नाहींत. म्हणून च "सार्वजनिक जीवनांत नैतिक मूल्यांचें सर्वश्रेष्ठ स्थान ओळखण्यास शिका" असेंहि त्यांनीं निक्षून सांगितलें आहे. जोंपर्यंत सामाजिक आणि राजकीय तत्त्वज्ञानांत नीतिमत्तेला अग्रपूजेचें स्थान मिळालेलें नाहीं, तोंपर्यंत प्रत्यक्ष राजकारण आणि राजकीय कृति हीं नेहमीं नैतिक विधिनिषेधांची गळचेपी करणारीं, सर्व नैतिक विचारांना गुंडाळून ठेवणारीं सापेक्ष व संधिसाधु अशींच रहाणार.

## धर्मनिरपेक्ष नीतिशास्त्राची आवश्यकता

मात्र याकरितां राजकीय आणि सामाजिक विचारांत केवळ कांहीं थोडे नैतिक विधिनियम आणून भागणार नाहीं. गांधींनीं तो प्रयत्न केला. त्यांनीं नैतिक विचाराला ईश्वरी कृपेचा आणि 'आंतल्या आवाजा'चा आधार दिला. या दोन्ही आधारांविषयीं पुष्कळ म्हणण्यासारखें आहे. पण किमान पक्षीं असें म्हणतां येईल कीं हे दोन्हीहि आधार तितकेसे नेहमींच विश्वसनीय नसतात! कारण, स्वतः गांधींनींच अशी कबूली देऊन ठेवली आहे कीं, कित्येक वेळां ईश्वराच्या आवाजाचें अनुकरण करून प्रत्यक्ष सैतानच कानगोष्टी करीत असतो! अशा सत्त्वपरीक्षेंतून जेथें गांधींसारख्या महात्म्याला जावें लागतें, तेथें इतर मानवांची काय कथा? परिस्थितीच्या निर्दय फेऱ्यांत व अनेक हितसंबंधाच्या जबरदस्त ओढाताणींत सांपडलेले बिचारे साधे मानव! त्यांच्यावर दैवी कृपा होऊन त्यांच्या हांतून हुकमी नैतिक आचरण होईल अशी अपेक्षा कशी करावी? मानवाचा विचार हा विशुद्ध आणि आत्मप्रत्ययपूर्ण झाल्याशिवाय त्याचा आचार त्या विचाराशीं समान आणि सुसंगत होणार नाहीं. म्हणूनच 'कोणत्याहि बाह्य वा ईश्वरी टेंकूशिवाय मनुष्य हा स्वयमेव स्वेच्छेनेंच नीतिमान् राहूं शकतो; जर तो नीतिमान् राहूं शकला नाहीं तर त्याला दुसऱ्या कोणाकडे बोट दाखवून, दुसऱ्याची सबब सांगून निसटून जातां येणार नाहीं' हें दाखवून दिल्याशिवाय सार्वजनिक जीवनांत प्रामाणिकपणा आणि सभ्यता या गुणांची अपेक्षा करतां येणार नाहीं. याचाच अर्थ असा कीं, धर्मनिरपेक्ष विकसनशील (evolutionary) अशा नीतिशास्त्राचें अधिष्ठान आपल्या सार्वजनिक जीवनाला मिळाल्याशिवाय तें जीवन नीतिमान् आणि सभ्य होणार नाहीं. अतिभौतिक शक्तीच्या किंवा ईश्वरी कृपेच्या आधाराशिवाय, मनुष्य स्वयमेव आपण होऊनच नीतिमान् असूं शकतो, असें रॉय यांचें मत आहे. मानव हा नीतिमान् म्हणूनच तो सर्वेश्वर, सर्वसत्ताधीश (Sovereign) आहे. मानवी नीतिमत्तेचा उगम आणि आधार मानवाच्या स्वतःमध्येंच आहे. मानव बुद्धिवादी, विवेकी आहे म्हणूनच तो नीतिमान् आहे. मानवानें आपल्या बुद्धीची, विवेकाची सदैव जाणीव ठेवून, ती बुद्धि व विवेकशक्ति शक्य तितकी वाढविली पाहिजे. म्हणूनच सामाजिक तत्त्वज्ञान आणि तज्जन्य असें राजकीय तत्त्वज्ञान यांना मूलभूत



अनुक्रमणिका

तत्त्वज्ञाना-( Metaphysics ) चें अधिष्ठान दिलें पाहिजे. पण हें मूलभूत तत्त्वज्ञान म्हणजे एखादें अतिवस्तुवादी, अतीन्द्रिय, गूढ ( transcendent or esoteric ) तत्त्वज्ञानदर्शन नव्हे ! रॉय यांचें विश्वविषयक मौलिक तत्त्वज्ञान हें ' पदार्थविज्ञानशास्त्रावर आधारलेला वस्तुवाद ' (' Physical-Realism ' ) आहे. जड वस्तुवादा–( Materialism ) चीच ती अद्ययावत् व तावूनसुलाखून काढलेली शास्त्रपूत आवृत्ति आहे. आधुनिक विज्ञानानें विश्वविषयक तात्त्विक विचारांत जी भर टाकली आहे, ती विचारांत घेऊनच रॉय यांनीं आपलें तत्त्वज्ञान मांडलें आहे. तत्त्वज्ञान आणि आधुनिक विज्ञान यांचा समन्वय झाला पाहिजे, हेंच रॉय यांच्या विचारांचें थोडक्यांत सार आहे. असा समन्वय झाला तरच राजकीय तत्त्वज्ञान आणि त्याचा प्रत्यक्ष आचार हीं दोन्हीं बुद्धिवादानुसारी आणि नीतिशास्त्रानुसारी बनतील. या दिशेनें विचार करतां, रॉय यांनीं मानवी विचारांत अत्यंत मोलाची व अर्थपूर्ण भर टाकली आहे, असें दिसून येईल. ( या करितां त्यांचा ' Science and Philosophy ' - Renaissance Publication-हा ग्रंथ पहावा. )

वरील महत्त्वाचे मुद्दे अशा रीतीनें निकालांत निघाल्यानंतर युद्ध, आंतरराष्ट्रीयवाद यांसारखे जे प्रश्न शिल्लक रहातात त्यांच्याविषयीं फारसें करावयाचें उरत नाहीं. अर्थात् तेहि प्रश्न बिकट नाहींत असें नाहीं. पण मुळांतच चुकीच्या राजकीय विचारांतून उत्पन्न होणाऱ्या चुकीच्या राजकीय आचारामुळेंच हे प्रश्न विकट झाले आहेत.

## युद्धाचें दुश्चक्र !

स्वतःस राष्ट्रें म्हणविणारीं राज्यें स्वतःस टिकवून धरण्याकरितां युद्ध या साधनाचा उपयोग करीत असतात. आणि तीहि आपापल्या राष्ट्रांत शांतता नांदावी, राष्ट्राची प्रगति, आणि कल्याण व्हावें या नांवाखालीं ! प्रामाणिकपणें थोडा जरी विचार केला, तर युद्ध आणि संहार या साधनांनीं शांतता आणि प्रगति हीं केव्हांहि साध्य होणार नाहींत हें दिसून येईल. लढाईनें वाद मिटत नाहीं. उलट वाद मिटविण्यापेक्षां, आपल्या प्रतिस्पर्ध्यालाच कसा मिटवून टाकायचा, त्याचाच अंत कसा करायचा याकरितां लढाई होत असते ! म्हणून युद्ध करणाऱ्या दोन पक्षांपैकीं, एका पक्षाला जरी निर्णायक विजय मिळाला, तरी दोघांमधील वाद मिटत नाहीं. भांडणाचें मूळ कायमच राहतें. त्याला पुन्हां अनुकूल परिस्थितीचा जोर मिळाला कीं, तें पुन्हां उफाळून वर येतें. म्हणून युद्ध, परस्परांची कत्तल आणि विध्वंस यांचें चक्र अखंड चालूच रहातांना दिसून येतें. जोंपर्यंत युद्ध आणि हिंसा हीं अगदीं मनापासून बिनदिक्कतपणें वर्ज्य समजलीं जाणार नाहींत, तोंपर्यंत हें दुश्चक्र असेंच चालू रहाणार !

## राष्ट्रवादाची विकृत कल्पना

आंतरराष्ट्रीयवाद ( Internationalism ) हा शब्द दिशाभूल करणारा आहे. जगांतील निरनिराळ्या देशांत परस्परांमध्यें सौहार्द आणि सहकार्य नांदावें असा जर त्या शब्दाचा अर्थ असेल–आणि त्याचा उपयोग याच अर्थानें होतो हें खरें–तर त्या अर्थी हा शब्द बरोबर नाहीं. कारण, आंतरराष्ट्रीयवाद म्हटला कीं, त्याच्यांत गर्भित असलेलीं राष्ट्रवाद आणि राष्ट्रें यांचा विचार आलाच ! आणि राष्ट्रवाद आणि राष्ट्रें या दोन्हीहि अनिष्ट कल्पना आहेत ! रॉय यांच्या मतें, राष्ट्रवाद हा पंथ आतां जुनापुराणा जीर्ण झाला असून, त्याला भूतकाळांतच गाडला पाहिजे. लोकांच्या कल्पनेपुढें, राष्ट्र म्हणजे कांहीं तरी दिव्य, पवित्र, गूढ वस्तु आहे, तिच्यापुढें आपण बलिदान करावयास सज्ज असलें पाहिजे असा आभास उत्पन्न केला जातो. परंतु ज्या नरनारींचें राष्ट्र बनलें आहे, त्या नरनारींव्यतिरिक्त राष्ट्राला निराळें अस्तित्वच



अनुक्रमणिका








नाहीं. राष्ट्राची प्रगति आणि कल्याण असें जर कांहीं असेल तर ती प्रगति आणि तें कल्याण त्यांतील स्त्रीपुरुषांना अनुभवितां आलें पाहिजे; नाहींतर त्या प्रगतीला व कल्याणाला कांहीं अर्थच उरत नाहीं. म्हणून एखाद्या राष्ट्रांत शांतता आणि भरभराट नांदत आहे याची कसोटी त्या राष्ट्रांतील व्यक्तींच्या वांट्याला शांतता आणि भरभराट किती आली आहे, यावरच अवलंबून राहील. व्यक्तीचे हक्क हरण करणारी एखादी समष्टीची वा समूहाची कल्पना निर्माण करून ती व्यक्तींच्या डोक्यावर बसविणें सयुक्तिक नाहीं. राष्ट्र ही कल्पना सत्तापिपासु आणि पाताळयंत्री राजकारणी पुरुषांनीं निर्माण केलेला एक भ्रम आहे. प्रत्येक राष्ट्राचा पुढारी राणाभीमदेवी थाटांत गर्जून सांगत असतो : "आमच्या राष्ट्रांतील अगदीं शेवटचा मनुष्य उरेपर्यंत आणि शेवटच्या माणसाचा शेवटचा रक्ताचा थेंब सांडेपर्यंत आम्हीं आमच्या राष्ट्राचें रक्षण करणार !" त्याला विचारावेसें वाटतें कीं, "बाबा, शेवटच्या माणसाचा शेवटचा रक्ताचा थेंब सांडल्यावर तूं शेवटीं 'रक्षण' रक्षण' तें कशाचें केलेंस ?" ही राष्ट्रवादाची गर्जना म्हणजे क्रौर्यांत, दुसऱ्याला यातना देण्यांत सुख मानणाऱ्या मनोविकृतीचें ( Sadistic ) लक्षण आहे. विकृत मनोवृत्ति आणि रोगट कल्पनाशक्ति यांच्या युतींतून निर्माण झालेली ही विकृति आहे. मनुष्याच्या ध्येयवादाला विपरीत कलाटणी देऊन त्याची ध्येयवादाच्या नांवावर वंचना करणाऱ्या राष्ट्रवादाच्या अनिष्टतेला सीमा नाहीं ! आज राष्ट्रवाद लोकांना मोहनी घालतो कारण समाज आणि राज्यसंस्था यांच्यामध्यें हल्लीं खोल दरी पसरलेली आहे. ती दरी नाहींशी होऊन, समाज आणि राज्यसंस्था जर एकरूप झाली, तर राष्ट्रवादासारख्या कल्पना उद्भवणार नाहींत, त्यांचें कांहीं चालणार नाहीं ! राष्ट्रवादासारख्या कल्पनांवर 'राष्ट्र' या कल्पनेचा प्राण अवलंबून आहे. राष्ट्राज्येंच जर कोलमडून पडलीं आणि त्याऐवजीं जर सहकारी राज्यें ( Cooperative States ) निर्माण झालीं, तर राष्ट्रवादासारख्या विकृत कल्पना हवेंत विरून जातील ! कारण, सहकारी राज्यें राष्ट्रवादापासून पराङ्मुख होतील व त्यांचा विकास विश्वराज्याच्या दिशेनें होत राहील. आपल्या सर्व नागरिकांच्या सहकारी प्रयत्नांचें मूर्त स्वरूप बनलेल्या या सुसंस्कृत, सहकारी राज्यांतील प्रत्येक नागरिक म्हणेल: "मी इतका सुसंस्कृत आहे कीं माझ्याकडून दुसऱ्याची हत्या करवणार नाहीं !" आणि त्यामुळें, या निरनिराळया सहकारी राज्यांमध्यें कांहीं मतभेद उद्भवले तरी ते सुसंस्कृत रीतीनेंच मिटतील.

राजकीय तत्त्वज्ञानांत जे प्रमुख, गोंधळवून टाकणारे प्रश्न आहेत ते रॉय यांनीं कसे सोडविले आहेत, त्याचें वर थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे. प्रस्तुत एका लेखांत केवळ संक्षिप्त रूपरेषेपेक्षां अधिक कांहीं देणें शक्यहि नाहीं. रॉय यांचें तत्त्वज्ञान आतांपर्यंत होऊन गेलेल्या तत्त्वज्ञानांपेक्षां अधिक सर्वांगीण व साकल्यपूर्ण (integrated) आहे असें मी मानतों. म्हणूनच त्यांच्या तत्त्वज्ञानाची कोणतीहि एक बाजू, त्या तत्त्वज्ञानाच्या इतरहि बाजू लक्षांत घेतल्याशिवाय, नीट लक्षांत येणार नाहीं. त्यामुळेंच प्रस्तुत लेखांत या प्रश्नाच्या एकापेक्षां अनेक बाजूंचा ऊहापोह करावा लागला. पण तो शक्य तों कमींत कमीच केलेला आहे असें आढळून येईल. रॉय यांचे विचार जर अधिक पूर्णतेनें समजून घ्यावयाचे असतील तर त्याकरितां रॉय यांचे ग्रंथ व कार्य यांचा अभ्यास, मनन व चिंतन झालें पाहिजे.

---



अनुक्रमणिका








श्री. सुशांत दास

# आंतरराष्ट्रीय मानवतावादी आंदोलन

पश्चिम युरोपांत व अमेरिकेंत अशा पुष्कळ व्यक्ती आहेत कीं ज्यांचे विचार व श्रद्धा मानवतावादी आहेत असें म्हणतां येईल. पण एक सुसंघटित आंदोलन म्हणून मानवतावादाची चळवळ फक्त कांहीं देशांपुरतीच आणि त्याहि देशांतील कांहीं थोडया लोकांपुरतीच मर्यादित आहे. जीवनाच्या निरनिराळया बाजूंच्या दृष्टीनें विचार करतां मानवतावाद म्हणजे तरी काय, याविषयींहि बराच मतभेद दिसून येतो. तरी पण मानवतावादी आंदोलन संघटित करावयाचे जे प्रयत्न चालू आहेत आणि निरनिराळया राष्ट्रांतील लोकांचे गट एकत्र येऊन त्यांनीं जो आंतरराष्ट्रीय मानवतावादी व नैतिक संघ ('Humanist and Ethical Union') काढला आहे, त्यावरून एवढेंतरी स्पष्ट दिसतें कीं, प्रचलित जीवनविषयक विचारसरणीची जी जागा घेऊं शकेल अशा नवीन विधायक निश्चित विचारसरणीची लोकांना गरज निश्चितपणें वाटत आहे.

## मानवतावाद व संघटना

मानवी संस्कृतीची व्यक्तीच्या इच्छास्वातंत्र्यावर आधारलेली आतांपर्यंतची जी नैतिक आणि सांस्कृतिक ऐतिहासिक परंपरा आहे, ती सर्वच्या सर्वच मानवतावादाचें मूल अधिष्ठान आहे. म्हणून मानवतावाद म्हणजे एक विशिष्ट आंतरराष्ट्रीय संस्था किंवा संघटना असें समीकरण बनून, मानवतावाद पुढें केव्हांतरी एखाद्या संस्थेपुरताच मर्यादित होऊन राहील, असें मानणें सयुक्तिक होणार नाहीं. अर्थात् हें खरें कीं, जशी कम्युनिस्टांची आंतरराष्ट्रीय संघटना ही कम्युनिस्टांच्या नेतृप्रामाण्यावर आधारलेल्या (authoritarian) विचारसरणीप्रमाणें मध्यवर्ती सत्तेकडून नियंत्रित आणि संघटित असते, तशा तऱ्हेची मानवतावादी आंतरराष्ट्रीय संघटना कधींच होऊं शकणार नाहीं. पुढेंमागें मानवतावादी लोकांची आंतरराष्ट्रीय संघटना बांधण्यांत जरी बरेंच यश आलें, तरी ती संघटना मानवतावाद्यांची मध्यवर्ती प्रातिनिधिक संस्था होऊन बसेलच, असें नाहीं. कारण सर्वांचा अधिकार हिरावून घेऊन तो, प्रातिनिधिक संस्था म्हणून, त्या संस्थेच्या ठिकाणीं केन्द्रित करणें हें मानवतावादाच्या मूळ वैचारिक प्रकृतीच्याच विरुद्ध आहे ! संस्था किंवा संघटनांचा उपयोग केवळ कार्याचीं पोषक साधनें (means to promote activity) म्हणून होय, असें मानवतावादी मानतात. त्यांच्या निष्ठा सर्व समाजाला— सर्व मानवबंधूंना वाहिलेल्या असतात—१९५२च्या ऑगस्ट मध्यें आमस्टरडॅमला मानवतावाद्यांची एक जागतिक परिषद् (World Congress) भरून त्या परिषदेंत मानवतावादी आंतरराष्ट्रीय संघटना (Humanist International) स्थापावयाचें ठरलें, त्या प्रसंगीं परिषदेंत जी चर्चा झाली तींत मानवतावादी संघटनासंबंधीं वर दिग्दर्शित केलेल्या विशिष्ट विचारांवर प्रामुख्यानें भर देण्यांत आला.

## मानवतावादी गटांच्या भिन्न पार्श्वभूमी

उपरिनिर्दिष्ट जागतिक मानवतावादी परिषदेला निरनिराळया देशांतील व्यक्तींचे गट (groups) हजर होते. हजर असलेल्या प्रत्येक देशांतील गटाचे विचार मानवतावादाच्या तपशिलाविषयींच भिन्न होते, एवढेंच नव्हे तर त्या त्या देशांतील लोक मानवतावादाकडे भिन्न भिन्न मार्गां (approach)नीं येऊन पोहोंचले होते. ज्या ठिकाणीं जशी परिस्थिति असेल त्या परिस्थितीच्या गरजेनुसार हे विविध मानवतावादी गट ठिकठिकाणीं उत्स्फूर्तपणें

मूळ लेख 'नवभारतां' करितां इंग्रजींत असून त्याचा प्रस्तुत लेख अनुवाद आहे— का. सं.








उत्पन्न झालेले होते. प्रत्येक गट मानवतावादाच्या तत्त्वज्ञानापर्यंत पोहोंचला होता पण तो पोहोंचण्या-पूर्वी तो भिन्न भिन्न ठिकाणांहून निघाला होता. उदा-हरणार्थ, आम्ही जे भारतांतील मानवतावादी त्यांनीं, आम्हांला जो राजकीय अनुभव आला होता त्या अनुभवाचा धडा म्हणून, मानवतावाद स्वीकारला होता. आमच्या मागासलेल्या देशांत, लोकशाही यशस्वीपणें अमलांत आणायचा प्रश्न आमच्यापुढें 'आ' वासून उभा होता. ह्या प्रश्नाला तोंड द्यायचें तर येथील सर्वसामान्य मनुष्याच्या मनांत स्वतः-विषयींची श्रद्धा व आत्मविश्वास पहिल्याप्रथम उत्पन्न केला पाहिजे; तसा तो केल्याशिवाय चिर-कालिक श्रेय आमच्याकडून कांहींहि होऊं शकणार नाहीं, हें आम्हांला पटलें होतें. 'मनुष्यच स्वतः आपल्या भाग्याचा विधाता होय' ही जी श्रद्धा —आणि हीच श्रद्धा मानवतावादाचें अत्यंत मूल-भूत आणि क्रांतिकारक तत्त्व होय— सर्वसामान्य मनुष्यामध्यें निर्माण हेंच आपलें पहिलें कर्तव्य होय असें आम्हां भारतीयांस आढळून आलें.

परंतु आम्हां भारतीयांच्यासारखे अनुभव सर्व देशांतून येतील असें नाहीं. इंग्लंडसारख्या देशांत तेथील लोकांपुढें लोकशाहीविषयीं गंभीर प्रश्न आहेतच; परंतु त्यांचें मूलभूत स्वरूप निराळें आहे. इंग्लंडमधील विचारवंतांत जें धार्मिक श्रद्धांचें द्वंद्व व आग्रही ख्रिश्चन धर्माच्या मुस्कटदाबींतून मुक्त व्हायची जी प्रबळ इच्छा दिसून येते, त्यां-मध्यें तेथील मानवतावादी आंदोलनाचें मूळ शोधलें पाहिजे. हॉलंडमध्यें जनतेच्या जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रावर रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट पंथांचा पगडा बसलेला आहे. त्या फाजील वरपगड्यांतून जनतेला मुक्त करून त्या धार्मिक पंथांची जी जागा घेऊं शकेल व जी लोकांना धर्मनिरपेक्ष पण नैतिक जीवनपद्धतीचा मार्ग दाखवूं शकेल अशा विचारसर-णीची गरज होती; ती तेथील मानवतावाद्यांनीं पुर-विली. पण डच मानवतावादी जे आपल्या मानवता-वादापर्यंत पोहोंचले ते नास्तिकवाद आणि बुद्धिवाद यांच्या मार्गानें प्रवास करून. नास्तिकवाद व बुद्धिवाद हे मार्ग केवळ शुष्क व अभावात्मक आहेत हें त्यांना कळून आलें. डच मानवतावादी आंदोलनाचा उगम असा वैशिष्ट्यपूर्ण आहे. तसेंच अमेरिकेमध्यें जें नैतिक आंदोलन (Ethical Movement) सुरूं झालें, त्याचा उगम धर्मविषयक संशयवादांतून झाला ही गोष्ट अमेरिकेंतील मानवतावादी आंदोलना-ची विशिष्ट पार्श्वभूमि म्हणून लक्षांत ठेविली पाहिजे.

## नव तत्त्वज्ञानाच्या बांधणीचें व मांडणीचें कार्य

आंतरराष्ट्रीय मानवतावादी संघटनेनें, एकाद्या ठरीव सांच्याप्रमाणें नवीन गट निर्माण करण्याऐवजीं, जे गट वर सांगितल्याप्रमाणें ठिकठिकाणीं तेथील परि-स्थितींत सहजासहजीं निर्माण झाले आहेत त्यांनाच एकत्र आणण्याचा प्रयत्न करणें उचित होईल. या भिन्न भिन्न गटांच्या श्रद्धा आणि त्यांच्या मागील ऐतिहासिक पार्श्वभूमि जरी भिन्न भिन्न असल्या, तरी त्यांच्यामध्यें मानवतावादी प्रेरणा सारखीच आहे ही गोष्ट दृष्टीआड होऊं नये. हे गट जितके जितके जास्ती एकत्र येऊन आपणांपुढील समान प्रश्नांचा एकत्र खल करतील, तितकी तितकी त्यांची प्रेरणा अधिक सखोल होत जाऊन, मान-वतावादाच्या तत्त्वज्ञानाचा अर्थहि अधिकाधिक विशद होत जाईल. आंतरराष्ट्रीय परिषदा, परि-षदांनंतरच्या सभा, अभ्यासमंडळाच्या बैठकी यांमधून मानवतावादाच्या तत्त्वज्ञानाचें विशदीकरण व अधिक पद्धतशीर आंखणी करण्याचें हें कार्य चालू असतांना, कॉ. रॉय यांच्या विचारविनिमयाचा व सल्लासहकार्याचा खूपच उपयोग झाला असता. म्हणूनच त्यांचा मृत्यु हा एक आंतरराष्ट्रीय मानवता-वादी आंदोलनावर एक वज्राघातच होय! १९५२ सालच्या आमस्टरडॅमच्या पहिल्या जागतिक मानव-तावादी परिषदेला कॉ. रॉय हजर राहूं शकले नाहींत.



अनुक्रमणिका








पण त्यांनीं "**एका नवीन सामाजिक तत्त्वज्ञानाचें अधिष्ठान**" ( Foundations of a new Social Philosophy ' ) हा आपला निबंध पाठविला. त्यावर कॉंग्रेसमध्यें चर्चा झाली.

कम्युनिस्ट पंथ व धार्मिक विचारसरणी या दोहोंनींहि मानवी व्यक्तीला **गौण** लेखलें आहे. म्हणून या दोहोंचीहि जागा घेणारें तत्त्वज्ञान म्हणून मानवतावादाची बांधणी व मांडणी करणें हें मानवतावादी आंतरराष्ट्रीय संघटनेचें प्रमुख कार्य आहे. हल्लींची समाजव्यवस्था अरिष्टांत सांपडली असून कोसळूं पहात आहे. त्या अरिष्टांतून तिला वांचविण्याचें हुकमी सामर्थ्य मानवतावादांत आहे हें दाखवून दिल्याशिवाय, मानवतावादाला जीवनांत तें प्रमुख स्थान मिळणार नाहीं. आधुनिक जगांतील समस्यांनीं उत्तरें अशीं शोधून काढलीं पाहिजेत कीं, जीं उत्तरें मानवाविषयींची संमानभावना, आणि मानव्य हेंच सर्वोच्च मूल्य ही जाणीव याशीं सुसंगत रहातील; किंबहुना तीं उत्तरें या मानवतावादी भावनेंतून व जाणीवेंतूनच स्फुरलेलीं असलीं पाहिजेत. (-कारण त्या समस्यांना दुसरीं जरीं उत्तरें मिळालीं तरी तीं, कांहीं काळ लोटल्यावर, उत्तरेंच नव्हत असें आढळून येतें-). म्हणूनच मानवतावादाचा सामाजिक दृष्ट्या काय अर्थ आहे त्याचा प्रत्यक्ष आराखडा तयार करणें आज अगत्याचें आहे. ज्यांचा गाभा मानवतावाद आहे अशा तत्त्वांच्या आधारें, आधुनिक जगांत समाजरचना कशी असावी, अर्थव्यवस्था कशी असावी हाच मुख्य प्रश्न प्रत्यक्षपणें आपणांपुढें आज आहे. सध्यांच्या ठिकठिकाणच्या मानवतावादी संघटनांनीं या प्रश्नाकडे अजून पुरेसें लक्ष दिलेलें नाहीं. लक्ष द्यायला आतां सुरुवात होत आहे. आंतरराष्ट्रीय मानवतावादी संघटनेच्या कार्यकारी मंडळानें त्या अनुरोधानें चर्चेकरितां एक योजना आंखली असून त्या योजनेचा पुष्कळच उपयोग होणार आहे. या योजनेची चर्चा प्रथम त्या त्या राष्ट्रांतून व्हावी, तींत एकदां प्रत्येकाची प्राथमिक भूमिका तयार झाल्यावर नंतर ती चर्चा १९५६ किंवा १९५७ सालीं ब्रिटनमध्यें भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेंत होऊन तेथें निर्णय घेतले जावेत असें सध्यां योजिलें आहे.

### डच मानवतावादी

आंतरराष्ट्रीय मानवतावादी आंदोलनाशीं जे कांहीं प्रादेशिक गट संबद्ध आहेत, त्यांचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करणें उचित होईल. या गटांत अत्यंत महत्त्वाचा गट म्हणजे डच मानवतावाद्यांची ' Humanistisch Verbond ' ही संघटना होय. या संघटनेंत ९००० सभासद असून, हिच्या तर्फेंच पहिली मानवतावादी परिषद् **डॉ. जुलिअन हक्स्ले** यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली. हॉलंडमध्यें या संघटनेशींच संबद्ध अशा ' Humanitas 'सारख्या सामाजिक कार्याला वाहिलेल्या संस्था असून या 'ह्युमॅनिटास'चे ७००० सभासद आहेत. मानवाबद्दल आदरभावना, त्याचबरोबर बुद्धिवादी चिकित्सापद्धति ही जी मानवतावादी परंपरा तिच्याशीं, मानवतावाद या नांवानें ओळखलें जाणारें विचारदर्शन हें सुसंगत असलें पाहिजे, असें डच मानवतावाद्यांना वाटतें. म्हणून अस्तित्ववादी (Existentialist), चिद्वादी किंवा प्रत्यक्षवादी ( Positivist ) या तत्त्वज्ञानाच्या दर्शनांतील ज्या कल्पना मानवतावादाच्या वरील प्राथमिक मूलभूत सिद्धान्ताशीं सुसंगत आहेत, त्या डच मानवतावादी ग्राह्य मानतात. राजकीय क्षेत्रांत उदारमतवादी तसेंच समाजवादी हे दोन्हींहि राजकीय पक्ष एकत्र नांदवायला डच मानवतावादी तयार आहे. किंबहुना, मानवतावादी संघटनेचे बरेचसे सभासद या दोन राजकीय पक्षांचेहि सभासद आहेत. एकाच संघटनेंत अशी मतभिन्नता नांदूं शकते याचें कारण म्हणजे डच मानवतावाद्यांनीं मानवतावादाच्या उपपत्तीची जयडबंद चौकट बनविलेली नाहीं.










त्यांच्या मतें, मानवतावाद म्हणजे चैतन्य, जडवस्तु आणि समाज यांना एका सूत्रांत बांधणारी रूक्ष उपपत्ति नसून, सर्वांगीण मानव्याच्या विकासाकरितां धडपडणाऱ्या माणसाला आपल्या नित्याच्या जीवनांत स्फूर्ति देणारें तें एक जीवनदर्शन किंवा जीवन-प्रतीति आहे.

डच मानवतावादी हे अत्यंत कृतिशील असून त्यांच्या संघटनेचें जाळें बरेंच मोठें पसरलें आहे. डच संघटनेच्या सभासदांचीं सुमारें ६० मंडळें पाडलीं आहेत. प्रत्येक मंडळाला ' कम्युनिटी' म्हणतात. या 'कम्युनिटी'चे सदस्य पंधरा दिवसांतून एकदां एकत्र जमतात. त्याशिवाय इतर चर्चा, सभा, कँप, समर-कोर्स इत्यादि असतातच. शिक्षणकार्य, वृद्ध व बालक यांची काळजी घेणें इत्यादि सामाजिक कार्यहि या सदस्यांकडून केलें जातें. बेकारांना मदत करण्याकरितां व कौटुंबिक संबंधाविषयीं सल्ला देण्याकरितां निराळीं मंडळें आहेतच. ट्रेड युनिअनच्या कार्य-क्षेत्रांत या मानवतावाद्यांचें एक ' कामकरी–मंडळ ' असून, त्याचे १००० सभासद आहेत. डच मानवतावाद्यांची ही ' वेर्‌बाँड ' संघटना ' मॅन ॲण्ड् दि वर्ल्ड ' व ' वर्ड ऑफ दि वीक ' हीं दोन नियतकालिकें प्रसिद्ध करीत असते. 'कामकरी–मंडळा'तर्फे ' रिन्यूअल ' नांवाचें मासिक निघत असतें. ' वेर्‌बाँड ' चें मध्यवर्ती कार्यालय युट्रेक्ट या प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेल्या शहरीं आहे.

### ब्रिटिश मानवतावादी

इंग्लंडमध्यें 'ब्रिटिश ईथिकल सोसायटी' सारख्या नैतिक संघटना या मानवतावादी आंदोलनाचीं केन्द्रें आहेत. या संघटनांमागें ७० वर्षांचा इतिहास आहे. ७० वर्षांपूर्वी डॉ. स्टॅन्टन कॉइट नांवाच्या गृहस्थांनीं, खिश्चन धर्माला गृहीत असिद्ध सिद्धान्ता-( dogma ) पासून मुक्त करण्याच्या हेतूनें, एक चळवळ सुरू केली. त्यांनीं खिश्चन धर्मांतील, नैतिक जीवनाला मार्गदर्शक, अशीं जीं नैतिक तत्त्वें होतीं तेवढींच ठेवलीं. तेव्हांपासून, अतिभौतिक, अपौरुषेय गोष्टींवरील श्रद्धेला थारा न देतां नैतिक धर्माचें पालन करणें हा विचार प्रामुख्यानें या ब्रिटिश ईथिकल सोसायट्यांपुढें चालत आला आहे. परंतु कालौघाबरोबर त्यांच्या विचारांचें क्षेत्रहि व्यापक बनलें आहे. आज या सोसायटींच्या नेत्यांना हें पटलें आहे कीं, आजच्या सुधारलेल्या समाजाला त्याच्यापुढें असलेल्या अनेक समस्यांना उत्तर द्यावयास समर्थ अशा जर कोणत्या एका धर्माची निकडीची आवश्यकता असेल तर ती मानवतावादाच्या व्यापक धर्माची होय. या ईथिकल सोसायट्यांचें संकुचित कार्यक्षेत्र होतें, तें आतां व्यापक झालें आहे. मानवतावादाविषयीं लोकांत आस्था निर्माण करण्याच्या दृष्टीनें कांहीं नवीन योजना त्यांच्याकडून हातीं घेतल्या जात आहेत. ' प्लेन व्ह्यू ' नांवाचें त्रैमासिक व ' न्यूज् ॲन्ड नोट्स ' हें मासिक ब्रिटिश मानवतावाद्यांतर्फे प्रसिद्ध होत असतें. ' यंगर जनरेशन' नांवाचें एक नवीन मानवतावादी मंडळ लंडन-मधील हॅम्पस्टेड येथें स्थापन झालें असून, त्या मंडळातर्फे मानवतावादाची व्याप्ति विशद करणाऱ्या चर्चा चांगल्या होत असतात.

ब्रिटिश मानवतावाद्यांनीं गेल्या ॲमस्टरडॅम–कॉंग्रेसमध्यें अत्यंत उत्साहानें भाग घेतला. ब्रिटिश मानवतावादी नेते मानवतावादी तत्त्वज्ञानाची पद्धतशीर बांधणी करण्याचा प्रयत्न मोठ्या आस्थेनें करीत आहेत. गेलीं कांहीं वर्षे मानवतावादी तत्त्वज्ञानासंबंधीं जसें भारतीय मानवतावादी चिंतन-मनन-संशोधन करीत आहेत, तशाच प्रकारचें वैचारिक कार्य कांहीं ब्रिटिश मानवतावादीहि करीत आहेत. डच मानवतावाद्यांप्रमाणेंच, ब्रिटिश मानवतावादीहि, कोणत्या एका विशिष्ट राजकीय पक्षाशीं निगडित नाहींत. परंतु हें खरें कीं बहुतेक ब्रिटिश मानवतावादी सदस्यांच्या सहानुभूती समाजवाद्यांकडे असून, ते








आपलीं मतें मजूरपक्षाला देतात. कांहीं सदस्य तर मजूर पक्षाचे प्रत्यक्ष कार्य करणारे सभासद आहेत. यावरून असा विचार मनांत येतो कीं, प्रत्यक्ष क्रियाशील असे समाजवादी कार्यकर्ते आणि मानवतावादी आंदोलन यांचा जर अधिकाधिक निकट संबंध येत गेला, तर मानवतावाद्यांच्या सामाजिक व राजकीय प्रश्नाबाबतच्या कल्पना व विचार अधिकाधिक स्पष्ट होत जाऊन, त्या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें ते देऊं शकतील व असें झालें तर मानवतावादाचा राष्ट्रीय जीवनावर मोठा प्रभाव पडल्याशिवाय रहाणार नाहीं.

### अमेरिकेंतील मानवतावादी

यानंतरचें क्रमानें महत्त्वाचें म्हणजे अमेरिकेंतील मानवतावादाचें आंदोलन होय. या आंदोलनाचे दोन घटक आहेत : एक 'ईथिकल सोसायट्या', आणि दुसरा 'ह्युमॅनिस्ट ॲसोसिएशन.' अमेरिकेंतील ईथिकल सोसायट्यांचा इतिहास ब्रिटिशांच्या सारखाच आहे. अमेरिकेंतील या ईथिकल सोसायट्यांनीं बरेंच सामाजिक कार्य केलें असून, त्या कांहीं शाळा आणि प्रार्थनामंदिरें चालवीत असतात. अमेरिकन ह्युमॅनिस्ट असोसिएशनतर्फे 'ह्युमॅनिस्ट' नांवाचें नियतकालिक निघत असतें. या असोसिएशननें अमेरिकेच्या बाहेर आपले संबंध वाढविण्याचा व त्यायोगें मानवतावादाचा आंतरराष्ट्रीय प्रसार करण्याचा प्रयत्न अलीकडे सुरू केला आहे.

वर वर्णन केलेल्या तीन देशांशिवाय बेल्जम व ऑस्ट्रिआ या देशांत मानवतावाद्यांचे छोटे गट आहेत. भारतांतील मानवतावाद्यांचा विचार प्रस्तुत लेखांत केला नाहीं.

केवळ उपरिनिर्दिष्ट प्रादेशिक गटांपुरतेंच स्वतः-ला मर्यादित करून घ्यावयाचें असा मानवतावादी आंतरराष्ट्रीय आंदोलनाचा उद्देश नाहीं. या जागतिक आंदोलनांत अधिकाधिक लोकसमूह सामील होत जावेत, असाच उद्देश आहे. परंतु मानवतावादी आंतरराष्ट्रीय संघटनेसमोर जर कोणतें महत्त्वाचें कार्य असेल तर तें म्हणजे आधुनिक कालांत जें अरिष्ट कोसळूं पहात आहे, त्यांतून मानवजातीला स्फूर्तिप्रद मार्गदर्शन करून वांचवूं शकणाऱ्या मानवतावादाच्या तत्त्वज्ञानाची पद्धतशीर बांधणी व मांडणी करणें हें होय. या महान् कार्याला अनेक देशांतील अनेक प्रतिभाशाली व्यक्तींचें सहकार्य लाभलें पाहिजे. अशा प्रकारचें नवीन तत्त्वज्ञानाच्या विरचनेचें नवीन आघाडीचें कार्य मानवतावादी आंतरराष्ट्रीय आंदोलन जर कार्यक्षमतेनें आणि लवकर करूं शकलें, तर तें आंदोलन अत्यंत शीघ्र वेगानें वाढेल यांत शंका नाहीं.

---

## विचारांची विरोधविकासी वाढ

कोणताहि विचार घ्या, त्या विचाराचा नाश करणारें बीज त्या विचारांतच अन्तर्हित असतें; त्या विचाराचें एखाद्या उच्च विचारांत रूपान्तर होऊन तो विचार नाश पावतो ! धर्मापासून धर्माचें शास्त्र ( Theology ) उत्पन्न होतें आणि तें ईश्वराचें स्वरूप निश्चित करण्याचा वृथा प्रयत्न करतें ! ईश्वराचें स्वरूप निश्चित झालें तर तो ईश्वर कसा राहील ? म्हणून धर्माचें शास्त्र शेवटीं आपल्या जनकाचाच — धर्माचाच नाश करतें ! धर्माचें शास्त्रहि वाढत वाढत शेवटीं 'सर्वच ईश्वर' या सर्वेश्वरवादा-( Pantheism ) मध्यें परिणत होऊन लय पावतें ! सर्वेश्वरवादाचेंहि पर्यवसान शेवटीं नास्तिकवादांत होतें. अशी ही विचारांची विरोधविकासी ( dialectical process नें ) वाढ होत असते. या विचारवाढीच्या प्रक्रियेंत, अमका उत्कर्षबिन्दु गांठून विचार थांबला, असें कधींच होत नाहीं. — मानवेन्द्रनाथ रॉय

'Irreligiosity and Atheism of Hindu Philosophy' मधून








'अभ्यासू'

# मानवेंद्रनाथ रॉय यांचें राजकीय दूरदर्शित्व

विज्ञान आणि नीति यांचा समन्वय हें भाई मानवेंद्रनाथ रॉय यांनीं भावी पिढ्यांकरितां वारसा म्हणून ठेवलेल्या नवमानवतावादाचें महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. 'मानव' हें कोडें विज्ञानाच्या साहाय्यानें उकलणें शक्य झाल्यामुळें हा समन्वय त्यांना साधतां आला. आणि तो साधणाऱ्या मानवेंद्रनाथांचें जीवन म्हणजे त्या समन्वयाचेंच आधुनिक काळांतील एक उत्कृष्ट उदाहरण होय. राजकीय द्रष्टेपणा आणि नैतिकता, परिस्थितीचें यथार्थ आकलन आणि प्रामाणिकपणा, वास्तवता आणि ध्येयनिष्ठा, बुद्धि आणि श्रद्धा यांचा सुंदर मिलाफ त्यांच्या जीवनांत झाला आहे. भविष्यकाळासंबंधीं केलेल्या निश्चित अपेक्षांचा त्यांच्या वर्तनांतील नैतिकतेवर परिणाम झाला नाहीं. काय घडणार हें तें निश्चितपणें सांगत; तथापि त्यामुळें सोयीची भूमिका घेऊन योग्य वेळीं तिचा फायदा पदरांत पाडून घेण्याची प्रवृत्ति त्यांना कधींहि शिवली नाहीं. परिस्थितीचें यथार्थ आकलन हा त्यांच्या राजकीय द्रष्टेपणाचा पाया होता. पण या आकलनामुळें परिस्थितीशीं जुळतें घेऊन पुढें जाण्याचा संधिसाधूपणा त्यांच्यांत कधींहि शिरला नाहीं. या आकलनासाठीं आवश्यक असलेला कडक व विशुद्ध वास्तव दृष्टिकोण स्वहिताच्या विचारांनीं, भावनांनीं किंवा आत्मनिष्ठेनें कधींहि मंदावला किंवा विकृत झाला नाहीं; ध्येयनिष्ठा ढळली नाहीं. बुद्धि व श्रद्धा यांत विरोध निर्माण झाला नाहीं. त्यांचें जीवन म्हणजे बुद्धीनें शुद्ध झालेल्या श्रद्धेचें किंवा श्रद्धेनें पावन झालेल्या बुद्धीचें दर्शन होय. त्यांत एकांगीपणा नाहीं, पूर्णता आहे; लौकिक यश नाहीं, अलौकिक साफल्य आहे. यशापयशाचें गौणत्व आणि तद्विषयक समबुद्धि किंवा बेफिकिरी यांचा प्रत्यय आणून देणारें तें जीवन आहे.

हा प्रत्यय आणून देणाऱ्या अनेक लहानमोठ्या घटना त्यांच्या जीवनांत आढळतात. त्या सर्वांचा येथें उल्लेख करणें शक्य नाहीं. मॉस्को येथें येऊन पोहोंचेपर्यंतचें त्यांचें जीवन, त्यांनीं लिहिलेल्या आठवणी वगळल्या तर, बव्हंशीं अज्ञातच आहे. तथापि तेथें आल्यानंतरच्या काळांतील दोनच महत्त्वाच्या घटना वर उल्लेख केलेल्या वैशिष्ट्यासंबंधीं साक्ष पटविण्यास पुरेशा आहेत. यांतील पहिली म्हणजे रशियन राज्यक्रांतीशीं त्यांचा प्रत्यक्ष संघटनात्मक संबंध जोडणारी घटना होय. मेक्सिकोचा प्रतिनिधि म्हणून आलेला एकाकी भारतीय तरुण पहिल्याच महत्त्वाच्या परिषदेंत लेनिनसारख्या यशस्वी क्रांतिनेत्याला विरोध करतो आणि वसाहतींतील क्रांतीसंबंधीं भिन्न सिद्धांत पुढें मांडतो हा तो प्रसंग होय. 'इंडिया इन् ट्रॅन्झिशन्' या ग्रंथांत मांडण्यांत आलेल्या या सिद्धान्ताची यथार्थता पुढील वीस वर्षांच्या काळांत पुरेपूर प्रत्ययास आली आहे. 'अडचणींत सांपडलेली साम्राज्यशाही वसाहतींतील वरिष्ठ वर्गांशीं समझोता करील; म्हणून वसाहतींत कोणतेहि मूलभूत सामाजिक बदल न होतां वरिष्ठवर्गीयांकडे सत्तासंक्रमण आणि आर्थिक जीवनाचा प्रस्थापित व्यवस्थेच्या चौकटींत विकास हीं संभवतात' हें त्यांच्या भूमिकेचें सूत्र होय. आणि नंतरच्या अनुभवानें हें पहिलेंच महत्त्वाचें राजकीय निदान खरें ठरविलें आहे. मार्क्सवादाच्या मर्यादांतून वावरण्याऐवजीं त्याच्या साहाय्यानें प्रत्यक्ष परिस्थितीचें यथार्थ आकलन करणाऱ्या त्यांच्या असामान्य स्वतंत्र बुद्धिमत्तेची चमक या पहिल्याच प्रसंगांत नजरेंत भरल्यावांचून रहात नाहीं. आणि त्याबरोबरच संधिसाधूपणाचा पूर्ण अभाव दर्शविणाराहि तो प्रसंग आहे. बोल्शेव्हिक पक्षाच्या अंतर्गत जीवनांत व कार्यपद्धतींत वैचारिक मतभेदाचें महत्त्व ओळखलें जात होतें. असा तो काळ असल्यामुळें लेनिननें त्यांच्या सिद्धांताचा स्वीकार केला; दुसऱ्या जागतिक कम्युनिस्ट कॉंग्रेसच्या ठरावांत तो जोडण्यांत आला. रॉय तिसऱ्या इंटरनॅशनलचें नेतृत्व करूं लागले. तथापि या सर्व घटनांमुळें मूळ प्रसंगाच्या वैशिष्ट्याकडे दुर्लक्ष होतां कामा नये. 'आपलें बस्तान नीट बसेपर्यंत उगाच सत्ताधिष्ठितांचा विरोध करा कशाला?' हा विचार त्यांत मुळींच आढळला नाहीं हें तें वैशिष्ट्य होय.

आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळींत स्थान मिळतांना आढळणारा हा स्वतंत्र वैचारिक दृष्टिकोण तिसऱ्या इंटरनॅशनलचें नेतृत्व स्वीकारल्यानंतरहि कायम राहिला. चीनहून परत आल्यानंतर मॉस्कोहून औषधोपचारासाठीं ते बर्लिन येथें आले; १९२८ सालीं ते बर्लिन-












मध्येंच होते. तिकडे त्यांच्या अनुपस्थितीचा फायदा घेऊन सहाव्या जागतिक कम्युनिस्ट कॉंग्रेसमध्यें त्यांच्या-वर 'साम्राज्यशाहीचें हस्तक' असल्याचा हास्यास्पद आरोप करण्यांत आला आणि इंटरनॅशनलशीं असलेला त्यांचा संबंध तुटला. ६ व्या कॉंग्रेसच्या ठरावावर त्यांनीं केलेली टीका आणि भारतीय राष्ट्रीय चळवळीविषयींचें त्यांचें निदान हीं महत्त्वाचीं तात्कालिक कारणें म्हणून सांगण्यांत आलीं. या प्रसंगीं देखील रॉय यांनीं घेतलेल्या भूमिकेंत वर उल्लेख केलेली दोन्हीं वैशिष्ट्यें पूर्णपणें दिसून येतात. सहाव्या जागतिक कॉंग्रेसनें आंखलेल्या धोरणावरील त्यांची टीका ही त्यांच्या स्वतंत्र बुद्धिमत्तेची आणि तत्कालीन परिस्थितीच्या सखोल व यथार्थ ज्ञानाची निदर्शक आहे. जागतिक कम्युनिस्ट चळवळीनें त्यावेळीं स्वीकारलेलें आंतरिक स्वरूपाचें 'डावें धोरण' (ultra-leftist policy) हेंच हिटलरच्या सत्तारूढ होण्याला जबाबदार ठरलें हें आतां सर्वमान्य झालें आहे. युरोपीय आणि भारतीय चळवळींच्या बाबतींतील या चुकीच्या धोरणाकडे, नेतृत्वांतून निर्माण होणाऱ्या हितसंबंधांकडे लक्ष देऊन, डोळेझांक करण्याची कल्पना देखील रॉय यांच्या मनांत आली नाहीं. उलट, पाताळयंत्रीपणा, गटबाजी, हुकूमशाही इत्यादि दोषांनीं पछाडल्या गेलेल्या कम्युनिस्ट राजकारणांत मतभेदाचे काय परिणाम होतात या संबंधीचा ट्रॉट्स्कीचा अनुभव प्रत्यक्ष डोळयापुढें असतांना देखील परिणामांची मुळींच पर्वा न करतां त्यांनीं त्या धोरणावर हल्ला चढविला. आणि सहा वर्षांनंतर सातव्या जागतिक कॉंग्रेसनें त्यांच्या म्हणण्यालाच पर्यायानें पूर्ण मान्यता दिली. तथापि युरोपमध्यें या सहा वर्षांच्या काळांत हिट्लरचा 'जन्म' झाल्यामुळें भावी संग्रामाची पूर्वतयारी झाली. आणि भारतीय राजकारणांत इतिहासाचा एक अत्यंत हास्यास्पद विकृत दुर्विलास प्रत्ययास आला ! 'साम्राज्यशाहीचें हस्तक' अशी पोपटपंची करूं लागलेले कम्युनिस्ट क्रांतिवीर (?) रॉय तुरुंगांतून बाहेर पडण्यापूर्वीच नेमकी तीच हस्तकगिरी करण्या-साठीं 'क्यू' मध्यें उभे राहिले होते. मात्र केलेल्या चुका मान्य करण्याइतका जिवंतपणा त्या चळवळींतून एव्हांना नाहींसा झाला होता. आणि यामुळेंच चीनमधील रॉय यांच्या कार्याविषयीचा हीन प्रचार सुरूं झाला. या संबंधीं विस्तारानें चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि चीनमधील कार्याबद्दल रॉयना दोष देणारी वा त्यांच्यावर आरोप करणारी एकहि ओळ तिसऱ्या इंटरनॅशनलच्या कोणत्याहि कागदपत्रांत कोठेंहि नाहीं हें स्पष्टपणें सांगणें जरूर आहे. अर्थात् यांत ऐतिहासिक कागदपत्रांत दुरुस्त्या करण्याचें नवें तंत्र मात्र गृहीत धरलेलें नाहीं. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीशीं संबंध तुटत असतांना, रॉय यांनीं व्यक्त केलेला अभिप्राय त्यांच्या जीवनाचें अत्यंत महत्त्वाचें सूत्र होय. स्टालिनला लिहिलेल्या शेवटच्या पत्रांत ते म्हणतात: "सज्जनपणा, मित्रप्रेम आणि प्रामाणिकपणा (decency, loyalty and honesty) यांना बोल्शेव्हिक सद्गुणांच्या यादींत स्थान असूं नये ही कल्पना मी मान्य करूं शकत नाहीं." आणि या नैतिकतेसाठींच त्यांनीं जागतिक कम्युनिस्ट आंदोलनाच्या नेतृत्वाला कायमचा रामराम ठोकला.

तथापि नेतृत्व सोडलें म्हणून स्टालिनशाजबट वा रशियन क्रांति याजविषयीचें त्यांचें निदान बदललें नाहीं. त्यांच्या कठोर वस्तुनिष्ठतेचें हें एक अत्युत्कृष्ट उदाहरण होय. भारतांत येण्यापूर्वी प्रकट झालेली त्यांची असामान्य राजकीय दूरदृष्टि येथें आल्यानंतरहि व्यक्त होणें अपरिहार्य होतें. आणि यासंबंधीचीं अनेक उदाहरणें देतां येतील. प्रथम, दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वीच्या कांहीं महत्त्वाच्या उदाहरणांचा उल्लेख करणें योग्य होईल : १९३६ सालीं ऑक्टोबर महिन्यांत डेहराडून तुरुंगांतून एलन रॉय यांना लिहिलेल्या पत्रांत 'स्पेनमध्यें फ्रँकोचा विजय होणें म्हणजे फ्रान्सच्या लोकशाहीला गळफांस लागणें होय; फ्रेंच लोकशाहीची लवकरच घटका भरल्यावांचून रहाणार नाहीं' असा स्पष्ट इशारा त्यांनीं दिला होता. युद्धांत झालेला फ्रान्सचा पाडाव हा नाझींच्या लष्करी सामर्थ्याऐवजीं अंतर्गत फंदफितुरी-मुळेंच झाला हें ध्यानांत घेतलें म्हणजे या विधानाचें मर्म ध्यानांत आल्यावांचून रहात नाहीं. युद्ध सुरूं होण्यापूर्वी फ्रान्स, ब्रिटन आणि रशिया यांच्यांत संरक्षक करारांचीं बोलणीं सुरूं होतीं; आणि तिघांनीं मिळून पोलंडच्या रक्षणाची हमी घ्यावी हा त्या वाटाघाटींचा हेतु होता. ह्या वाटाघाटी कशा प्रकारें फिसकटतील याविषयीं रॉयनीं केलेलें निदान तंतोतंत खरें ठरल्याची ग्वाही आजचे 'टाइम्स ऑफ इंडिया'चे







संपादक श्री. मोरॅस यांनीं त्या वेळीं ' इलस्ट्रेटेड वुइकली 'मध्यें लिहिलेल्या एका लेखांत अगदीं स्पष्टपणें दिली आहे. त्याचप्रमाणें युरोपमधील चिघळत चाललेल्या परिस्थितीचें विश्लेषण करून १९३९ च्या जुलै–ऑगस्टमध्यें युद्धाच्या सुरूं होण्याविषयीचेंहि त्यांनीं स्पष्टपणें भाकित केलें होतें.

दुसरें महायुद्ध सुरूं झाल्यानंतर तर त्यांचें राजकीय द्रष्टेपण विशेष प्रखरतेनें व स्पष्टपणानेंच प्रकट झालें. युद्ध सुरूं होतांच हें साम्राज्यशाही युद्ध नव्हे असा स्पष्ट इषारा त्यांनीं दिला. आणि 'फॅसिझम व कम्युनिझम यांची ही ब्रिटिश-साम्राज्यशाहीविरोधी लढाई आहे', असें ओरडत सुटलेल्या स्टालिनभक्तांना धोक्याची सूचना दिली. नाझी-सोव्हिएट करार, पोलंडवरील रशियाची चढाई आणि फिनलंडवरील आक्रमण यांचें त्यांनीं केलेलं स्पष्टीकरण हें त्यांच्या असामान्य राजकीय आकलनाचें एक अत्यंत तेजस्वी प्रकरण होय. अशा प्रकारचें स्पष्टीकरण दुसरें कोठेंहि आढळत नाहीं. 'हे सर्व नाझीविरोधी पूर्वेकडील फळी मजबूत करण्याचे रशियाचे प्रयत्न आहेत; नाझी – सोव्हिएट करार हा परस्पर साहाय्याचा करार समजणें मूर्खपणाचें आहे; आज ना उद्यां या दोन शक्तींत युद्ध होणें अपरिहार्य आहे ' हें अनुमान या स्पष्टीकरणावरून त्यांनीं काढलें. " रशियन परराष्ट्रीय धोरणाविषयीं अनेकांचा गैरसमज आहे. अनेकांनीं त्याची निर्भर्त्सनाहि केली आहे. तथापि याच धोरणामुळें अगदीं अल्प काळांतच पूर्वेकडील सवंध आघाडी मजबूत केली जाईल आणि युरोपला फॅसिझमच्या वर्चस्वापासून मुक्त करणारें आक्रमक युद्ध शक्य होईल. आज रशियन नेते अत्यंत सावधगिरीनें वागत आहेत. कारण आंतरराष्ट्रीय परिस्थितींतील निर्णायक प्रवाहांचें ज्ञान आणि कटु अनुभव यामुळें त्यांना, आपण युद्ध सुरू केल्यास, पश्चिमेकडील युद्धावर त्याचा एकदम परिणाम तर होणार नाहींना अशी त्यांना भीति आहे. जर पश्चिमेकडील युद्ध पुरेशा काळापर्यंत निश्चयानें चालूं राहिलें तर नाझींना, अखेरीस दोन्ही आघाड्यांवर लढणें भाग पडेल; आणि युरोपची फॅसिझमच्या वर्चस्वापासून मुक्ति होण्यांतच या युद्धाचा शेवट होईल " ('इंडिपेंडंट इंडिया' १ सप्टेंबर १९४०). सप्टेंबर १९४० मध्यें केलेलें हें भविष्य जून १९४१ मध्यें खरें ठरलें.

१९४० च्या ऑगस्टमध्येंच, युरोपला अखेरीस अमेरिका व रशिया यांच्यांत निवड करणें भाग पडेल असें त्यांनीं बजाविलें. फ्रान्सच्या पाडावाच्या प्रसंगीं रशिया युद्धांत न आल्यामुळें होणाऱ्या अनिष्ट परिणामांची आपणांस यथार्थ कल्पना आली नाहीं, असें त्यांनीं आपल्या रशियन क्रांतीवरील ग्रंथाच्या प्रस्तावनेंत स्पष्टपणें म्हटलें आहे. ही एकच बाब वगळल्यास वा जमेस धरल्यास त्यांचीं युद्धासंबंधींचीं आणि युद्धोत्तर काळासंबंधींचीं बहुतेक सगळीं निदानें यथार्थ ठरलीं असें म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. या विषयीं विस्तारानें चर्चा करण्याची गरज नाहीं. युद्धोत्तर काळांत रशियाचें धोरण क्रांतीच्या प्रसाराला अनुकूल राहील अशी त्यांची अपेक्षा होती. याच्या उलट शक्यता त्यांना मुळींच वाटली नाहीं, असें नव्हे. पण ती विशेष महत्त्वाची वाटली नाहीं. यामुळें त्यांनीं युद्धोत्तर काळाची चर्चा करतांना पहिल्या शक्यतेवरच भर दिला. त्या आधारावर त्यांनीं केलेल्या विवेचनाचें एकच उदाहरण ध्यानांत घेतलें तरी पुरें आहे.

" युद्धांत गट्टीराष्ट्रांचा पराभव हा आतां व्यावहारिक शक्यतेच्या कोटींत आला आहे....... यामुळें आपण गट्टीराष्ट्रांचा लष्करी पराभव झाल्यानंतर काय परिस्थिति निर्माण होईल याचा थोडासा विस्तारानें विचार करूं या....... नाझींवर विजय मिळाल्यानें रशिया जर उच्छृंखल बनला तर या युद्धांतूनच रशिया आणि अमेरिका यांच्यांतील युद्ध उद्भवेल. अमेरिका हें युद्धानंतर देखील प्रभावी लष्करी सामर्थ्यानें युक्त असें राष्ट्र राहील. ...... रशिया आणि अमेरिका यांच्या संभाव्य युद्धांत रशियाची बाजू एकंदरीनें दुबळी असेल. फ्रान्सच्या पराभवानंतर लगेच युरोपला रशिया व अमेरिका यांच्यांत निवड करणें जरूर आहे असें मी म्हटलें होतें. या निवडीची गरज याहि परिस्थितींत शिल्लक राहील. ... ... युद्धोत्तरकाळांतील तिसरा महत्त्वाचा घटक ब्रिटन हा होय. ब्रिटन या युद्धांत सर्वतोपरी दुबळें होईल. अर्थात् ब्रिटिश लोकशाहीच्या दृष्टीनें यांत कांहीं वाईट नाहीं. वास्तविक ब्रिटिश लोकशाहीचा या युद्धांत विजय होणार असल्यामुळें वांशिक, भौगोलिक वा धार्मिक भेदांचा छेद करणाऱ्या अनेक स्वतंत्र राष्ट्रांच्या राष्ट्रकुलांत ब्रिटिश साम्राज्याचें रूपांतर होईल. या युद्धाच्या तांतडीनें होणाऱ्या








निश्चित परिणामांपैकीं हा एक होय." युद्धोत्तर परिस्थितीचें हें त्यांनीं केलेलें निदान २४ डिसेंबर १९४२ रोजीं रॅडिकल पक्षाच्या मध्यवर्ती कार्यकारी मंडळाच्या सभेंत केलेल्या एका भाषणांत आढळतें. (' इंडिपेंडंट इंडिया', २४ जानेवारी १९४३ ) त्याची यथार्थता ठरविण्याचें कार्य वाचकांवरच सोंपवणें इष्ट होईल.

चीनसंबंधीं देखील त्यांच्या द्रष्टेपणाचे असेच प्रत्यक्ष दाखले देतां येतील. युद्धोत्तर काळांत भारतांत सत्ता-संक्रमण होणें अपरिहार्य होईल ही गोष्ट तर त्यांनीं युद्धांत सहकार्य करण्याच्या धोरणाचें स्पष्टीकरण करतांना अनेक वेळां प्रतिपादन केली होती. तथापि या निदानामुळें येथील स्वातंत्र्यलालसेची तीव्रता कमी होईल असें त्यांनीं कधींहि कांहींहि म्हटलें नाहीं. फॅसिझमविरोधी युद्धाचा विरोध हा मात्र त्यांच्या मतानें निश्चितपणें भारतीय स्वातंत्र्याचा मारक होता. आणि यांतूनच त्यांची राष्ट्रवादावरील अत्यंत मूलगामी आणि दूरदर्शीपणाची टीका जन्मास आली.

राजकीय विचारपद्धति व वर्तन हीं शास्त्रीय ( scientific ) असलीं पाहिजेत असा त्यांचा आग्रह असे. आणि त्यांचें राजकीय जीवन हें अशा प्रकारच्या राजकीय व्यवहाराचाच एक महान् प्रयोग होय. राजकीय जीवनाकडे पहाण्याच्या या दृष्टिकोणामुळें भावी घटनांचें स्वरूप ते यथार्थतेनें पाहूं शकत. याचा अर्थ असा नव्हे कीं त्यांनीं जें जें सांगितलें तें तें सर्वस्वीं पूर्णपणानें प्रत्ययास आलें. मानवी हेतू आणि हेतुप्रेरित कृती यांना अत्यंत महत्वाचें स्थान देणाऱ्या त्यांच्या स्वतःच्या विचारपद्धतींत देखील अशा प्रकारचें भविष्यकथन बसूं शकलें नसतें. तथापि असें असलें तरी राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय परिस्थितीचीं त्यांनीं वेळोवेळीं केलेलीं निदानें आणि त्यावरून भविष्याविषयीं बांधलेलीं अनुमानें हीं त्यांच्या सखोल आणि व्यापक आकलनाची खात्री पटविणारीं अशींच आहेत. ' माझी राजकीय विचारपद्धति गणितासारखी आहे ' असें ते अनेकदां म्हणत. पण तिच्या मर्यादांचीहि जाणीव त्यांना होती. राजकीय गणितांतील समीकरणांमध्यें स्थिर ( constants ) घटकांपेक्षां अस्थिर ( variable ) घटकच कितीतरी अधिक आढळतात. शिवाय असंख्य घटकांपैकीं कांहीं मर्यादित घटकच आपण विचारांत घेऊं शकतों. यामुळें काढलेलीं उत्तरें नेहमीं बरोबर ठरतीलच असें नाहीं. तथापि योग्य काळजी घेतल्यास त्यांच्यांतील चुकीचें प्रमाण कितीतरी कमी करतां येईल यांत संशय नाहीं.

परिस्थितीचें सम्यग्ज्ञान आणि भविष्याविषयीं बिनचूक आडाखे बांधीत असलेल्या मानवेंद्रनाथांची दृष्टि ध्येयापासून मात्र कधींहि विचलित झाली नाहीं. ज्या स्वातंत्र्यलालसेनें त्यांनीं १४ व्या वर्षीं गृहत्याग केला, त्या लालसेला जागतिक भ्रमणांत ज्ञानाची जोड मिळाली. राष्ट्रवाद, साम्यवाद इत्यादि अंगीकारलेल्या ध्येयांचा त्याग त्यांनीं केला; परंतु या त्यागांतून प्रत्येक वेळीं त्यांचें व्यक्तिमत्त्व अधिकाधिक संपन्न होत गेलें. नव्या ध्येयसृष्टीविषयीं होणाऱ्या भ्रमनिरासामुळें ते जुन्या ध्येयांकडे कधींच वळले नाहींत. साम्यवादाच्या कटु अनुभवामुळें प्रातिनिधिक लोकशाही त्यांना इष्ट वाटली नाहीं. आर्थिक नियोजनांत प्रकट होण्याऱ्या दोषांमुळें भांडवलशाहीचें समर्थन झालें नाहीं. मार्क्सवादाच्या अपुरेपणामुळें, सदोषतेमुळें ते उदारमतवादा-( liberalism ) चे समर्थक बनले नाहींत. राष्ट्रवादाची टीका करतांना आंतरराष्ट्रवादासारख्या भोंगळ कल्पनेचें त्यांनीं समर्थन केलें नाहीं. यामुळें त्यांचें जीवन ही एक आधुनिक मानवी ध्येयसृष्टीची समीक्षाच होय असें म्हणतां येईल. आणि या समीक्षेतूनच नवमानवतावादासारखें व्यापक तत्त्वज्ञान निर्माण झालें. त्यांचा व्यावहारिक वर्तनक्रम हाहि या वैचारिक गतीशीं पूर्णपणें संवादी स्वरूपाचाच होता. सत्ताधीश आहेत म्हणून आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट नेतृत्वाशीं जुळतें घेण्याची प्रवृत्ति जशी त्यांत उद्भवली नाहीं, त्याचप्रमाणें सत्तारूढ होणार आहेत म्हणून भारतीय राष्ट्रवादी नेतृत्वाशीं मिळतें घेण्याचाहि विचार त्यांना कधीं शिवला नाहीं. या प्रामाणिकपणामुळें, नैतिकतेमुळें स्वातंत्र्यप्रेरणेशीं, सत्यलालसेशीं त्यांनीं कधींहि प्रतारणा केली नाहीं. आणि जीवन ' यशस्वी' करण्याऐवजीं तें सफल केलें; सत्तेच्या आनंदाऐवजीं आत्मानंदांतच ते मग्न राहिले. आणि जीवनाशीं विन्मुख होण्याऐवजीं तत्त्वचिंतन आणि आणि प्रत्यक्ष अनुभव यांच्या अपूर्व समागमांतून, विविध क्षेत्रांतील जीवनाचे प्रश्न सोडविण्यासाठीं मार्गदर्शक होईल, अमोल साहाय्य करील असाच वैचारिक वारसा ठेऊन गेले, मरणांत अमर झाले.

श्री. ह. रा. महाजनी

# मानवेंद्रनाथ रॉय यांचें महायुद्धविषयक धोरण

**श्री. मानवेंद्रनाथ रॉय** यांच्या युद्धविषयक भूमिकेची माहिती विस्तारानें लहानशा लेखांत देतां येणार नाहीं. खुद्द रॉय यांचें लिखाणच या विषयावर इतकें विस्तृत व विपुल आहे कीं, तें सारें प्रकाशित झाल्यास त्याचे दोन तीन खंड सहज होतील. अर्थात् रॉय यांच्या तात्त्विक भूमिकेचा स्थूल मानानें परिचय करून देण्याचेंच कार्य या मर्यादित जागेंत करतां येईल आणि तेवढेंच मी करणार आहे. महायुद्धांत भारतानें कोणती भूमिका घ्यावी अथवा कोणतें धोरण आंखावें याविषयीं रॉय यांनीं जे विचार मांडले त्यासंबंधीं त्यावेळीं बरेच गैरसमज माजले होते आणि त्या गैरसमजाचें समूळ उच्चाटन झालेलें आहे असें आजहि म्हणतां यावयाचें नाहीं पण जो कोणी रॉय यांचा महायुद्धावरील मूळ प्रबंध वाचण्याचे परिश्रम घेईल त्याला त्या प्रबंधांत अंदाजलेले परिणाम आज घडून आले आहेत याची खात्री पटल्याशिवाय राहणार नाहीं. उदाहरणार्थ गेल्या महायुद्धाची कारणमीमांसा करतांना रॉय यांनीं असें सांगितलें होतें कीं इंग्लंड, फ्रान्स आदि राष्ट्रें हें फासिझमविरोधी युद्ध जर निकरानें लढतील तर या युद्धांत ब्रिटिश साम्राज्य खिळखिळें बनून भारताचें स्वातंत्र्य समीप येईल. हा अंदाज खरा ठरला, याचा अनुभव आपण घेतच आहोंत. यावरून महायुद्धाची त्यांची कारणमीमांसा व त्यावरून त्यांनीं बांधलेले निष्कर्ष वास्तवदृष्ट्या आणि ध्येयदृष्ट्या फार महत्त्वाचे होते असें निखालस सिद्ध होतें. रॉय यांची युद्धविषयक मीमांसा समजून घेण्याचें खरें कारण हेंच आहे अशी माझी श्रद्धा आहे.

## युद्धमीमांसेचा मध्यबिंदु

फासिझमविरोध हाच रॉय यांच्या युद्धमीमांसेंतील मध्यबिंदु आहे. ज्या ज्या शक्ती फासिझमला विरोध करीत असतील त्या त्या शक्तींना पाठिंबा देणें प्रत्येक स्वातंत्र्यवाद्याचें कर्तव्य आहे असें एक सूत्रच त्या मीमांसेवरून तयार करतां येईल. फासिझमच्या उदयानें या महायुद्धाचें स्वरूप पालटून गेलें असून १९१४ सालच्या महायुद्धापेक्षां या महायुद्धाचे परिणामहि वेगळे होणार आहेत असा त्यांच्या मीमांसेचा रोख होता. यासाठीं रॉय यांची युद्धमीमांसा बरोबर समजून घ्यावयाची असेल तर ज्या फासिझमला ते इतका कडाडून विरोध करीत होते, त्या फासिझमचें स्वरूप काय आहे याचें यथार्थ ज्ञान होण्याची गरज आहे. आणि हें स्वरूप रॉय यांच्या विशिष्ट दृष्टींतून समजून घेतलें पाहिजे. फासिझमच्या स्वरूपाविषयीं अनेकांचीं अनेक निदानें आहेत. हिंदुत्वनिष्ठ, आत्यंतिक राष्ट्रवादी, प्रतिगामी सनातनी या सर्वांना फासिझम ही एक तारक शक्ति वाटत होती. उलटपक्षीं कम्युनिस्टांना भांडवलशाहीची शेवटची सामाजिक अवस्था म्हणजे फासिझम असें वाटत होतें. फासिझम हा कांहीं विशिष्ट आर्थिक परिस्थितीचा परिपाक आहे; असा या निदानाचा खरा अर्थ होय. रॉय यांनीं फासिझमची केलेली मीमांसा फार वेगळ्या प्रकारची आहे आणि माझें असें स्पष्ट मत आहे कीं, रॉय यांचीच मीमांसा मूलग्राही स्वरूपाची आहे.

## फासीझमचें उगमस्थान

फासिझम ही केवळ आर्थिक घटना नाहीं. विशिष्ट आर्थिक गटाला आपलें आर्थिक आसन सावरून धरण्यासाठीं करावी लागणारी धडपड एवढेंच त्याचें संकुचित स्वरूप नाहीं. फासिझम ही एक स्वातंत्र्यविरोधी प्रवृत्ति आहे आणि अर्थबळ व शास्त्रबळ मिळाल्यावर ती एक स्वातंत्र्यविरोधी शक्तीहि होऊं शकते. भांडवलशाहीच्या उतरत्या काळांत या प्रवृत्तीचा जन्म झाला असला तरी केवळ भांडवलदार गटाचीच ही प्रवृत्ति आहे असें नाहीं. ज्या ज्या सामाजिक शक्तींना मानवी स्वातंत्र्याचें वावडें आहे अशा सर्व शक्ती फासिझममध्यें समाविष्ट झालेल्या होत्या व आहेत. आपणांस असाहि चमत्कार पहावयास सांपडतों कीं भांडवलदार वर्गापैकीं कांहीं गटाचा या फासिझमला








विरोध आहे. कारण समाजाच्या प्रत्येक स्थित्यंतरामध्यें वरिष्ठ वर्गांतील कांहीं लोकांना मानवी स्वातंत्र्याचीं व सांस्कृतिक मूल्यें मान्य असतात. उलट कनिष्ठ वर्गांतील कांहीं बुद्धिमान लोक या स्वातंत्र्यविनाशक प्रवृत्तीचा आत्यंतिक श्रद्धेनें पुरस्कार करतांना आढळून येतात. किंबहुना हेंच म्हणणें वास्तवास धरून होईल कीं वैफल्याच्या भावनेनें ग्रासलेला सुशिक्षितांचा वर्गच फासिझमचा खरा आधार ठरलेला आहे. मानवी जीवनांतील उच्चतम मूल्यांवर आत्यंतिक अश्रद्धा हेंच फासिझमचें खरें उगमस्थान. या अश्रद्धेंतून मानवी स्वातंत्र्यापेक्षां मानवाच्या रक्षणाला, मानवी संस्कृतीपेक्षां पाशवी सामार्थ्याला आणि लोकशाहीपेक्षां सर्वाधिकारशाहीला जास्त महत्त्व प्राप्त झालें. म्हणून फासिझमचा विजय म्हणजे मानवी स्वातंत्र्याचा संपूर्ण नाश असें समीकरण तयार होतें.

फासिझमचें हें निदान एकदां पक्कें केल्यानंतर गेलें महायुद्ध होण्यापूर्वी जागतिक परिस्थिति कशी होती याचें सम्यक् ज्ञान होण्यास अडचण पडणार नाहीं. फासिझमचा उदय हिट्‌लरच्या उदयाबरोबर झाला असा सर्वसामान्य समज आहे. पण ही अतिशय स्थूल दृष्टि झाली. जर्मनीच्या विशिष्ट परिस्थितीचेंच फासिझम हें फळ नाहीं. ती एक आंतरराष्ट्रीय प्रवृत्ति आहे. जगांतील सर्व सत्ताधारी वर्गांनीं आपल्या हातांनीं जर्मनींत फासिझमचें बीजारोपण केलें. कारण सत्ताधारी वर्गासमोर तसाच जीवनमरणाचा प्रश्न होता. चालू समाजव्यवस्था टिकवून धरावयाची असेल तर आपणच निर्माण केलेलीं विज्ञान, लोकशाही, व्यक्तिस्वातंत्र्य, बुद्धिप्रामाण्य हीं जीवनमूल्यें नष्ट करावयास हवींत या जाणिवेनें जगांतील सर्व सत्ताधारी वर्ग फासिझमच्या दिशेनें ओढला जात होता. १९२४ सालीं लोकार्नो करार झाला. त्याचवेळीं फासिझमची मुहूर्तमेढ रोवली गेली. लोकार्नो करार जर्मनीच्या पुनरुत्थानाचाच केवळ नव्हता. जर्मन राष्ट्रांत जर नव्या क्रांतीचें वारें संचारलें तर सर्व युरोपांत त्याचा प्रसार होण्यास वेळ लागणार नाहीं या जाणिवेनें सत्ताधारी वर्गांनीं जर्मनीच्या पुनरुत्थानासाठीं लोकार्नो करार केला.

### पुरोगामी शक्तींविरोधी आक्रमण

१९२४ ते १९३९ या पंधरा वर्षांतील राजकारण एकसारखें याच दिशेनें जात होतें. त्या राजकारणाचीं दोन मध्यवर्ती सूत्रें होतीं. एक फासिझमला बळकट करणें आणि दुसरें रशियाविरोधी आघाडी निर्माण करणें. लोकार्नो करारानंतर मुसोलिनीची अबिसीनियावर स्वारी, जपानचें चीनवर आक्रमण, ऑस्ट्रिया, झेकोस्लोव्हाकिया यांच्यावर हिट्‌लरची स्वारी, स्पेनमधील यादवी इत्यादि ज्या अनेक घटना घडल्या त्या सर्व घटनांमागें फासिझमला साहाय्य करणें हें एकच मध्यवर्ती सूत्र होतें. केव्हां फासिझमच्या आक्रमणाकडे दुर्लक्ष, तर केव्हां तडजोड अशा अनेक प्रकारांनीं ही प्रवृत्ति कार्य करीत होती. या प्रवृत्तीचें सार 'नरमाईचें धोरण' ( Policy of appeasement ) हेंच होतें. या धोरणावरून कांहीं सामान्य स्वरूपाचे निष्कर्ष बांधतां येतात. पहिला निष्कर्ष हा कीं, फासिझमचें आक्रमण एकट्या जर्मनीचें वा इटालीचें आक्रमण नसून सर्व सत्ताधारी वर्गाचें पुरोगामी शक्तीविरुद्ध तें आक्रमण होतें. या निष्कर्षाचें ठळक उदाहरण म्हणून स्पेनच्या यादवीकडे बोट दाखवितां येईल. स्पेनमधील यादवी वास्तविक अंतर्गत स्वरूपाची यादवी होती. पण फ्रँकोला ज्याप्रमाणें हिट्‌लर व मुसोलिनी प्रत्यक्ष मदत करीत होते त्याचप्रमाणें इंग्लंड व फ्रान्स तटस्थतेच्या बुरख्याआड अप्रत्यक्ष मदत करीत होते. याचें कारण असें होतें कीं स्पेनमध्यें जर लोकशाहीचा विजय झाला तर त्याचे गंभीर परिणाम जगांतील सर्व सत्ताधारी वर्गावर होतील, ही जाणीव सत्ताधाऱ्यांना झालेली होती. भांडवलदार राष्ट्रांमध्यें परस्पर आर्थिक स्पर्धा होतीच. त्यामुळें फासिस्ट व साम्राज्यवादी राष्ट्रें यांची कांहीं एकसंध फळी नव्हती. पण आपणा सर्वांना एक समान शत्रू आहे या जाणिवेनें आपापसांतील स्पर्धेला गौण स्थान देण्याकडे सर्व सत्ताधाऱ्यांचा कल होता. यापुढें कोणत्याहि राष्ट्रांतील अंतर्गत यादवी त्या राष्ट्रापुरतीच मर्यादित राहाणें शक्य नव्हतें, हा या घटनांचा खरा अर्थ आहे.

याच निष्कर्षांतून दुसरा निष्कर्ष असा निघतो कीं यापुढें महायुद्ध व्हावयाचेंच असेल तर तें १९१४ सालच्या महायुद्धाप्रमाणें साम्राज्यवादी राष्ट्रांमध्यें आपापसांत होणार नाहीं. तें युद्ध मानवी स्वातंत्र्याच्या शक्तींचा विनाश करण्यासाठींच होईल. किमान पक्षीं सत्ताधारी वर्ग जे जाणीवपूर्वक प्रयत्न करतील ते त्याच दिशेनें करतील. या शक्तींचें केन्द्रस्थान रशिया आहे








असें सत्ताधारी वर्गांना त्यावेळीं वाटत होतें. म्हणून १९१८ ते १९३९ या एकवीस वर्षांत इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका इत्यादि बलाढ्य राष्ट्रांचें धोरण आक्रमणाचा रोख रशियाच्या दिशेनें वळावा याच दिशेनें जात असल्याचें आपणांस दिसून येईल. चेंबरलेनचें नरमाईचें धोरण, फ्रान्समधील सत्ताधारी वर्गाची फासिझमला सहानुभूति, अमेरिकेची जर्मनीला मदत या सर्व घटनांचा उलगडा या सूत्राच्या प्रकाशांत होऊं शकेल. थोडक्यांत असें सांगतां येईल कीं साम्राज्यस्पर्धेसाठीं होणाऱ्या आक्रमक युद्धांचें युग संपलें होतें. मानव समाजाच्या सांस्कृतिक भवितव्याच्या दृष्टीनें एक व्यापक व मूलग्राही विरोध निर्माण झाला होता; आणि त्या विरोधानें सर्व जगाचे दोन समांतर भाग ( Horizontal division ) पडले होते.

## हें साम्राज्यवादी युद्ध नव्हतें

ज्यावेळीं जर्मनीनें पोलंडवर स्वारी केली त्यावेळीं हें महायुद्ध साम्राज्यवादी युद्ध नव्हे अशी रॉय यांनीं घोषणा केली, ती ही पार्श्वभूमि लक्षांत घेऊन केली. १९३९ सालापूर्वी जर्मनीच्या आक्रमक धोरणाकडे या राष्ट्रांची बघण्याची वृत्ति सहानुभूतीची होती. झेकोस्लोव्हाकियानंतर हिट्लरची नजर पोलंडकडे वळली तर पोलंडनंतर रशियाकडे वळणार या अंदाजानें मुत्सद्दी या आक्रमणाला पायबंद घालण्यास तितकेसे उत्सुक नव्हते. पण सत्तेचें राजकारण नेहमीं गणितागत पद्धतीनें चालत नाहीं. मानवी घटकांच्या हालचाली नेहमींच निर्जीव नियमांनीं बांधलेल्या नसतात. पोलंडवर हिट्लरची नजर वळण्यापूर्वी एक महत्त्वाची घटना घडून आली. ती घटना म्हणजे जर्मनी व रशिया यांमधील अनाक्रमणाचा करार. सत्ताधारी वर्गाला ही एक अनपेक्षित घटना होती. चेंडू उलटविणारा हा डाव होता आणि पोलंडवरील स्वारीनें हा डाव उलटविला गेला हा इतिहास अगदीं ताजा आहे. सारांश जर्मनी विरुद्ध फ्रान्स आणि इंग्लंड यांमधील युद्ध दोघांच्याहि अनिच्छेनें निर्माण झालेलें होतें. या दोन बाजूंमध्यें आर्थिक स्पर्धा बिलकूल नव्हती आणि इंग्लंड व फ्रान्स हीं राष्ट्रें हें युद्ध मागच्या युद्धाप्रमाणें प्राणपणानें खेळतील तर त्यामध्यें हिटलरच्या अंताबरोबर त्यांच्या सत्तेचाहि अंत होणार होता. ही सर्व कारणपरंपरा लक्षांत घेऊन हें युद्ध साम्राज्यवादी युद्ध नव्हे, हें आकस्मिक व दोन्ही बाजूला नको असलेलें असें युद्ध आहे असें रॉय यांनीं या युद्धाचें निदान केलेलें होतें.

रॉय यांनीं या युद्धाची केलेली मीमांसा आपण लक्षांत घेतली तर या युद्धाच्या स्थूलमानानें तीन अवस्था दिसून येतात. फ्रान्सचा पाडाव व डंकर्कचा पराभव ही पहिली अवस्था. लंडनवर विमानयुद्ध व रशियावर, ही दुसरी अवस्था आणि हिट्लरचा पराभव व बर्लिनचा पाडाव ही तिसरी अवस्था. पोलंडच्या पराभवापासून पॅरिसच्या पाडावापर्यंत सत्ताधारी वर्ग जर्मनीशीं नेटानें युद्ध खेळतच नव्हते. ही कांहीं कल्पित कथा नाहीं. हें एक दारुण ऐतिहासिक सत्य आहे. हिट्लरच्या विरुद्ध बाजूला उभे टाकलेले पेटां, वेगां, लाव्हल यांनीं जनताद्रोह करून जर्मन लष्कराच्या विजयाला वाट करून दिली हें युद्धोत्तर काळांत या लोकांच्या न्यायालयीन चौकशीनें पुरेपूर सिद्ध झालेलें आहे. १९१४ सालच्या महायुद्धांत फ्रान्सची अपरिमित मनुष्यहानि झाली. या युद्धांत अवघे सहा हजार सैनिक जायबंदी वा मृत्युमुखीं पडले यावरून किती कृत्रिम स्वरूपाचा प्रतिकार होत होता याची कल्पना येऊं शकेल. डंकर्कच्या पराभवापर्यंत युद्धाची हीच अवस्था कायम होती. डंकर्क येथील पराभवानें मात्र युद्धाचा नूर पालटला आणि इंग्लंडमध्यें एक अदृश्य पण निश्चित राजकीय क्रांति घडून आली.

## इंग्लंडमधील क्रांति

डंकर्कच्या पराभवानें चेंबरलेन पदभ्रष्ट होऊन चर्चिलच्या हातांत सूत्रें गेलीं. पण सत्तेचा खांदेपालट इतक्या जुजबी स्वरूपाचा झाला नाहीं. पार्लमेंट, मंत्रिमंडळ इत्यादि राजकीय संस्थांच्या स्वरूपांत तसा कोणताहि बदल घडून आला नाहीं. फासिस्टांना धार्जिण्या अशा गटाचें समूळ उच्चाटन झालें हा खरा व मूलग्राही बदल झाला. इंग्लंडमधील लोकशाही पार्लमेंटच्या बाहेर आली आणि लोकांच्या कलानें आपलं धोरण ठरवूं लागली हा खरा महत्त्वाचा बदल होय. हा बदल मानवी स्वातंत्र्याच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा बदल आहे. जर इंग्लंडमध्यें चेंबरलेन गटाचेंच वर्चस्व कायम राहिलें असतें आणि पॅरिसप्रमाणेंच लंडनचाहि हां हां म्हणतां पाडाव झाला असता तर मानवी स्वातंत्र्याच्या दृष्टीनें ती महान् आपत्ति ठरली असती. कल्पना करा कीं, सबंध युरोपखंड व सर्व ब्रिटिश



अनुक्रमणिका






साम्राज्य हिट्‌लरच्या कबजांत आलें असतें तर रशियाला वेढा पडून त्या हिट्‌लरचा पराभव करणें कोणालाहि शक्य झालें नसतें. हिट्‌लर अजिंक्य ठरला असता आणि मानवी स्वातंत्र्याचा संपूर्ण विनाश होऊन नव्या तमोयुगाला प्रारंभ झाला असता. म्हणून डंकर्कनंतर लंडनच्या जनतेनें भिंतीला पाठ लावून जो विलक्षण व कणखर प्रतिकार केला तो प्रतिकार मानव समाजाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा प्रतिकार आहे. तेथपासून या युद्धाचें स्वरूप पालटून तें खरेखुरें फासिझमविरोधी युद्ध झालें आणि या युद्धांत स्वातंत्र्यप्रेमी जनतेनें फासिझमविरोधी शक्तींना मदत करणें हें त्या जनतेचें एक कर्तव्य होऊन बसलें.

इंग्लंडनें प्रतिकाराला कंबर कसल्यानंतर युद्धाला नवीन कलाटणी मिळणें क्रमप्राप्त होतें. मिळालेल्या प्रदेशावर फासिझम थांबू शकत नव्हता. त्याला कोंडी फोडणें भागच होतें. ही कोंडी फोडण्याचे हिट्‌लरसमोर दोन मार्ग होते. इंग्लंड जिंकतां आलें नाहीं तर त्यांच्या ताब्यांतील आशिया व आफ्रिका जिंकून त्या साम्राज्याचे हातपाय तोडून टाकावेत आणि इंग्लंडला वठणीवर आणावें हा एक मार्ग होता. पण या मार्गानें गेल्यास रशियाला वेढा आपोआप पडत होता आणि या परिस्थितींत रशिया स्वस्थचित्तानें ही घटना पाहाणें शक्य नव्हतें. तेव्हां रशियावरच स्वारी करून रशिया पादाक्रांत करावा आणि आपला मार्ग निष्कंटक करावा हा दुसरा मार्ग होता. हिट्‌लरनें दुसरा मार्ग स्वीकारला. आणि अशा रीतीनें युद्ध दोन्ही आघाडीवर चालू झालें. एका बाजूला जर्मनी व दुसऱ्या बाजूला जपान अशा दोन्ही बाजूंनीं आक्रमण करून आपण रशिया हां हां म्हणतां पादाक्रांत करूं अशी दुसरा मार्ग स्वीकारतांना हिट्‌लरची अटकळ होती. पण जपाननें युद्धांत उडी घेतल्याकारणानें अमेरिका युद्धांत ओढली गेली आणि खऱ्याखुऱ्या अर्थानें हें जागतिक युद्ध बनलें. यानंतर हिट्‌लरचा पाडाव हा जवळजवळ ठरल्यासारखाच होता.

## मानवी स्वातंत्र्याचा भाग भारतीय स्वातंत्र्य

युद्धाचें, हें समालोचन रॉय यांच्या भूमिकेवर प्रकाश पडावा या हेतूनें केलेलें आहे. या युद्धांत पहिल्या अवस्थेमध्यें भारतानें तटस्थ राहावें अशी रॉय यांची भूमिका होती. कारण या युद्धाचें स्वरूप निश्चित व्हावयाचें होतें. तथापि या तटस्थतेमध्येंहि फॅसिझमला विरोध करणाऱ्या बाजूकडे आपला कल असावा असा त्यांचा आग्रह होता. युद्धाच्या दुसऱ्या अवस्थेमध्यें मात्र या युद्धांत फासिझमविरोधी बाजूला आपण सहकार्य केलें पाहिजे अशी त्यांनीं निश्चित भूमिका घेतली. हीच ती युद्धसहकार्याची भूमिका. याच भूमिकेचा शेवटपर्यंत विपर्यास होत गेला. युद्धसहकार्याची भूमिका घेतली कीं आपल्या राज्यकर्त्यांशीं सहकार्य करावें हें ओघानेंच आलें. पण हें सहकार्य देतांना या सहकार्यामधून आपले गुलामगिरीचे पाश बळकट होणार नसून ढिले होणार आहेत अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. हें सहकार्य फासिझमविरोधाला द्यावयाचें आहे; साम्राज्यवादाला नाहीं आणि या सहकार्यामधून साम्राज्यवादाचा अंत होणार आहे असा त्यांचा विश्वास होता. त्यावेळीं साम्राज्यवादाचे हस्तक म्हणून जरी त्यांना बाजूला फेंकण्यांत आलें तरी इतिहासानें त्यांच्या भूमिकेचें पुरेपूर समर्थन केलेलें आहे. चर्चिल अथवा हुजूरपक्ष हीं भावी इतिहासाचीं साधनें आहेत आणि जर वस्तुस्थिति भारतीय स्वातंत्र्याला उपकारक होत असेल तर व्यक्तीविषयीं असलेले पूर्वग्रह बाजूस सारून आपण आपलें धोरण आंखलें पाहिजे अशी त्यांची तात्त्विक भूमिका होती. एका बाजूनें हिट्‌लर व दुसऱ्या बाजूनें जपान असें दुहेरी आक्रमण भारतावर झाल्यास भारतांतील ब्रिटिश साम्राज्याचा अंत होईल पण त्याजबरोबर भारतीय स्वातंत्र्याचाहि कायमचा अंत होईल हें लक्षांत घेऊन स्वातंत्र्यावरील निष्ठेनें आपणांस फासिझमविरोधास उभें टाकलें पाहिजे असें ते आवेशानें सांगत असत.

म्हणजे मानवी स्वातंत्र्यावरील निष्ठा हा त्यांच्या तात्त्विक भूमिकेचा मध्यबिंदु होता. फासिझम अखिल मानवसमाजाच्या स्वातंत्र्यावरील संकट असल्यानें फासिझमला विरोध करणें आणि विरोध करणाऱ्या शक्तींशीं सहकार्य करणें भारतीय स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांचें आद्य कर्तव्य ठरतें. कारण भारतीय स्वातंत्र्य हा मानवी स्वातंत्र्याचा एक घटक भाग आहे. सबंध जग गुलाम झाल्यावर एकटा भारत स्वतंत्र राहील ही कल्पनादेखील अशक्य आहे. परिणामाच्या दृष्टीनें देखील फासिझमच्या विनाशांत साम्राज्यवादाचा नाश









ठेवल्यासारखा असल्यानें या युद्धांत सहकार्य करतांना आपण आपलें स्वातंत्र्य जवळ आणण्यालाच मदत करीत आहोंत. श्री. रॉय यांची ही भूमिका आत्यंतिक राष्ट्रवादाला पटण्यासारखी नव्हती. कारण ती समजण्यासारखी नव्हती. राष्ट्रवादाची भूमिका जितकी सोपी होती, तितकीच ती चुकीची होती. परकीय सत्तेला विरोध करण्याचें बाळकडू राष्ट्रवादाला मिळालेलें होतें. हा विरोध पोकळ होता. म्हणजे ब्रिटिश राज्यकर्ते येथून जावेत एवढीच त्या राष्ट्रवादाची आकांक्षा होती. पण येथें कसली राजवट यावी याची त्यांना स्पष्ट कल्पना नव्हती. राष्ट्रवादाची स्वातंत्र्यनिष्ठा अशा प्रकारें पोकळ असल्याकारणानें महायुद्धानें भारतीय स्वातंत्र्य किती जवळ येत चाललें आहे याचीदेखील त्यांना कल्पना येऊं शकली नाहीं. रॉय यांनीं युद्धाचें भारतावर झालेल्या परिणामांचेंदेखील मार्मिक विवेचन केलें आहे. विवेचनाचा सारांश थोडक्यांत असा सांगतां येईल कीं, ज्याला साम्राज्य असें आपण म्हणतों तें साम्राज्य या युद्धांत संपुष्टांत येऊं लागलें आहे. ब्रिटिश साम्राज्य म्हणजे ब्रिटिश भांडवल. युद्धांत ब्रिटिशांचें भांडवल संपुष्टांत तर आलेंच, उलट, इंग्लंडला भारताचे पंधराशें कोटी रुपये देणें होऊन बसलें. या देशांतील बाजारपेठ ब्रिटिश कारखानदारांच्या ताब्यांतून जवळ जवळ निसटलेली होती. या परिस्थितींत येथें राज्य चालविणें हा निव्वळ तोट्याचा धंदा होता. फासिझमविरुद्ध निकरानें झुंज खेळण्यापायीं इंग्लंडला आपलें सारें शिलकी भांडवल खर्च करावें लागलें आणि आपल्या साम्राज्यावर तिलांजलि द्यावी लागली ही घटना युद्धांतच घडूं लागली होती.

### स्वराज्याचा विधायक विचार

पण ब्रिटिश साम्राज्य वितळूं लागल्यानंतर भारताला आपल्या स्वराज्याचा विधायक दृष्टीनें विचार केला पाहिजे असा रॉय यांनीं सावधगिरीचा इषारा त्याचवेळीं दिलेला होता. परकीय राज्य गेलें कीं जनतेचें राज्य आपोआप येऊं शकत नाहीं. ब्रिटिशांनीं सत्ता सोडण्याची तयारी चालविली असतांना या देशांतील धनिकांचा अल्पसंख्य वर्ग आपल्या हातांत सत्ता घेण्याची तयारी करीत होता. कारण या देशांतील आर्थिक सत्ता त्या वर्गाच्या हातांत अगोदरच येऊन बसली होती. कारखानदारी, व्यापार, बाजारपेठ सारें कांहीं या लोकांच्या ताब्यांत आल्यासारखें झालें होतें. पण याच लोकांच्या हातांत राजकीय सत्ता आली असती तर जगांत फासिझमचा नाश झाला तरी भारतांत त्याचा उदय झाला असता. हा रॉय यांचा इषारा लक्षांत ठेवण्यासारखा होता. कारण या देशांतील धनिक वर्गाला लोकशाहीमूल्यें टिकवून सत्तेचा वापर करतां येणेंच शक्य नव्हतें. देशांत सामान्य जनतेला मानवी मूल्यांची तीव्र जाणीव झाली होती, असेंहि नव्हतें. उलट हुकुमशाहीला पोषक अशीच वैचारिक परंपरा या देशांत होती आणि आहे. या परिस्थितींत केवळ ब्रिटिशांची सत्ता संपुष्टांत आली याच आनंदांत मशगुल न होतां कोणाची व कसली सत्ता येणार याचाहि विचार आतांपासूनच करावयास हवा असें रॉय यांनीं बजावलें होतें.

### रशिया व अमेरिका यांच्या विरोधाचा भविष्यवाद

भारतीय परिस्थितीचें इतकें सूक्ष्म विवेचन श्री. रॉय यांनीं केलें याचें कारण हेंच कीं फासिझम ही एक स्वातंत्र्यविरोधी सामाजिक प्रवृत्ति आहे अशी त्यांची दृष्टि होती. हिट्लर, त्याचे प्रभावी लष्कर हीं फासिझमची बाह्य लक्षणें आहेत. या लष्कराचा नाश झाला कीं फासिझमचा संपूर्ण नायनाट झाला असें आत्मसमाधान मानतां येणार नाहीं. फॅसिझमच्या प्रवृत्ती प्रत्येक समाजांत आहेत. मानवी स्वातंत्र्याला विरोध करणाऱ्या शक्ती प्रत्येक समाजांत वावरत आहेत आणि हिट्लरचा पराभव झाला तरी त्या आपोआप नष्ट होतील असें नाहीं. अनुकूल परिस्थितीच्या अभावीं त्या प्रभावी ठरणार नाहींत, पण दबा धरून बसतील हें खास. यासाठीं हिट्लरच्या पराभवानें लोकशाही स्वातंत्र्याला अनुकूल परिस्थिति निर्माण झाली असली तरी स्वातंत्र्यविनाशक प्रवृत्तींचा संपूर्ण बीमोड करण्याचें कार्य संपलेलें नाहीं. ज्या प्रमाणांत लोकशाही प्रवृत्ति आपण बळकट करूं त्या प्रमाणांत ही विनाशक प्रवृत्ति हतबल होत जाणार आहे. युद्ध संपल्यानंतर या नव्या दृष्टीनें जगाकडे पाहिल्यास रशिया व अमेरिका यांचा विरोध अपरिहार्य आहे, असा त्यांचा कयास होता. तो कयास आज खरा ठरला आहे. पण रशिया मानवी स्वातंत्र्याला पोषक अशी शक्ति आहे ही त्यांची कल्पना नंतरच्या अनुभवावरून चुकीची ठरली. फासिझम गेला तरी कम्यूनिझम ही देखील

## मानवेंद्रनाथ रॉय यांचें महायुद्धविषयक धोरण

मानवी स्वातंत्र्याला तितकीच मारक शक्ति ठरूं लागली आहे हें त्यांनीं प्रांजल मनानें व नेहमीच्या धडाडीनें सांगितलें आहे. रशियावर त्यांची आशा होती. ती आशा भंग पावली. जगांतील रशिया व अमेरिका यांचा संघर्ष हा देखील सत्तेचाच संघर्ष आहे असें त्यांना आढळून आल्यानंतर आपण जीं मूल्यें आजवर गृहीत धरलीं होतीं त्यांचीं फेरतपासणी करण्याची त्यांना गरज भासली. या फेरतपासणींतून त्यांनीं मानवतावादाचें तत्त्वज्ञान निर्माण केलें. आजच्या साऱ्या सामाजिक वादांत व्यक्तीला समुदायाच्या दावणीशीं बांधलें जात असल्याकारणानें कोणताहि 'वाद' सत्ताधारी बनला तरी मानवी स्वातंत्र्याला ग्रहण लागल्याशिवाय राहणार नाहीं. या साक्षात्कारामधून त्यांनीं मानवतावादाचा पुरस्कार केला. **मानवतावाद हें मुक्तात्म्याचें तत्त्वज्ञान होय.**

## 'गुन्हेगारां'च्या जगांत !

सुमारें दोन हजार कैद्यांच्यामध्यें मी सहा वर्षें राहिलों आहे. भारतीय समाजांतील अत्यंत वरचा थर सोडला तर बाकीच्या सर्व थरांतून हे कैदी आलेले होते. ज्या गुन्ह्यांकरितां त्यांना कैदेची शिक्षा झाली होती ते गुन्हे त्यांच्या प्रतिकूल सामाजिक परिस्थितीमुळें त्यांच्या हातून झाले होतें. सबंध भारतीय समाजच अशा प्रतिकूल सामाजिक परिस्थितींत काळ कंठीत आहे. पण अशा प्रतिकूल सामाजिक परिस्थितीला बळी पडलेल्या या कैद्यांमध्यें "आम्ही आमच्या नशीबामुळें असे तुरुंगांत येऊन पडलों" असे म्हणणारेच बहुतेक होते ! ...

मला एकदां एक मांजराचें पिल्लू सांपडलें. तें मी पाळलें. माझ्या आजूबाजूचे कैदी त्या माझ्या मांजराशीं जें निरनिराळ्या रीतीनें वागत, तें पाहून मला मोठी मौज वाटे. जे 'अट्टल गुन्हेगार' म्हणून म्हटले जात, ते माझ्या या मनीशीं अगदीं दयाळूपणानें वागत. माझा तर असा अनुभव आहे कीं, हे 'सरावलेले गुन्हेगार' वरून दिसायला जरी कितीहि उग्र दिसले तरी आंतून साधे व मनाचे मोठे उमदे असतात ! त्यांच्या उलट, परमात्म्याचें नांव घेणारे, आपण धार्मिक आहों असें दाखविणारे हे मनाचे क्षुद्र आणि निर्दय असतात ! जर त्यांना मांजर उंदराला पकडतांना आढळून आलें किंवा तें जरा जरी त्यांच्या खाण्या–पिण्याजवळ आलें कीं हे 'रामराम' असें ओरडून त्याला मारायला धावायचे !......

खुनापेक्षांहि चोरी हा महाभयंकर गुन्हा समजला जातो. खून म्हणजे व्यक्तीची हिंसा. त्या उलट चोरी म्हणजे समाजाच्या मुळावरच, खाजगी मालमत्तेवरच घाला आहे. परंतु चोरी हीहि नैतिक होऊं शकते असें मी मानणारा आहे. जी अनैतिक समाजरचना खऱ्या निरपराधी माणसाला गुन्हा करायला लावते तिलाच चोर आव्हान देत असतो ! ...

तुरुंगामध्यें 'सरावलेल्या' बालगुन्हेगारांशीं माझी विशेष मैत्री झाली होती. मानसशास्त्रीय अभ्यासाचें मानवी साहित्य म्हणून हे बाल-गुन्हेगार म्हणजे अत्यंत उद्बोधक विषय होत. त्यांच्या जीवनाचें तत्त्वज्ञान पाहून मला खूपच मौज वाटत असे. जीवनाची मजा ते खरी अनुभवतात ! जीवन म्हणजे एक मोठी मस्करी ( joke ) आहे असेंच ते मानीत असतात ! जीवनाचीं सांकेतिक मूल्यें त्यांनीं झुगारून दिलेलीं असतात ! उदाहरणार्थ, अट्टल खिसेकापूला खिसा कापून त्यांत काय मिळतें, याची पर्वा नसते ! 'कसा सफाईनें खिसा कापला' याचाच त्याला अभिमान वाटत असतो. 'काय बेटे हे चावळट !' असेंच तो बालगुन्हेगार लोकांना हिणवीत असतो ! तो चोरी करीत नाहीं ! ज्या समाजानें त्याला उकिरड्यावर फेंकून पोलिसाच्या हवालीं केलें आहे, त्या समाजाच्या अशा तंगड्या ओढीत असतो !... कैदखान्याच्या या जगांत ही आनंदी बालगुन्हेगार-मंडळी मात्र कांहीं वेगळीच उमटून दिसतात. 'आमचें नशीब' किंवा 'कर्म' अशी सर्वसाधारण कैद्यांमध्यें आढळून येणारी खरीखोटी भाषा या बालगुन्हेगारांना अवगत नसते. "अरे बाळ, एकदां सुटून गेल्यावर पुन्हां पुन्हां तुरुंगांत तूं कां येतोस ?" असें मी एकाला विचारलें असतां त्यानें मला उत्तर दिलें कीं, "साहेब, मोकळें राहून पोट भरत नाहीं. येथें दोनदां जेवण, निजायला कोरडी जागा, थंडीमध्यें पांघरायला ब्लँकेट तरी मिळतें !" तें ऐकून मी निरुत्तर झालों !

— मानवेन्द्रनाथ रॉय, 'Crime and Karma' मधून








श्री. पु. मा. मुजुमदार

# एक नाट्यपूर्ण प्रसंग

आठवण कॉ. रॉयविषयीं व्यक्तिशः नाहीं तर त्यांच्या अचूक राजकीय निदानाविषयीं आलेल्या विलक्षण प्रत्ययासंबंधीं आहे. पण ती इतकी नाट्यपूर्ण आहे कीं सांगितल्याशिवाय रहावत नाहीं.

गेलें महायुद्ध सुरू झालें तेव्हां मी पुण्याला फर्ग्युसनला होतों. त्या वेळीं आम्हां रॉयिस्ट विद्यार्थ्यांचा एक कंपू तेथें होता. श्री. गोवर्धन पारीख ह्यांना रुईयामध्यें नोकरी लागल्यावर आमच्या ह्या कंपूचें नेतृत्व तेव्हां एम्. ए. ला असलेले ( आतां मुंबईला कॉमर्स कॉलेजचे प्रिन्सिपॉल) श्री. जी. आर्. दळवी यांच्याकडे गेलें होतें.

त्याच सुमारास फर्ग्युसनला श्री. शेळके नांवाचे एक विद्यार्थी होते. हे गृहस्थ कट्टर कॉंग्रेसवादी. ते वेरार क्लबचे व मीहि त्याच क्लबचा. माझ्यामुळें आमच्या कंपूच्या इतर विद्यार्थ्यांशींहि त्यांची जानपछान झाली होती. आमचे त्यांचे नेहमींच कडाक्याचे वादविवाद व्हावयाचे. पण त्या वयांत असलेली वादाची खुमखुमी जिरवावी या पलीकडे त्या वादांना आमच्या अथवा त्यांच्या दृष्टीनें कांहींहि किंमत नव्हती. कुणी कुणाचें मतान्तर घडवून आणील ही कल्पना कुणालाहि चाटून सुद्धां गेली नव्हती. ते गृहस्थ इतके कडवे होते कीं आमच्या दृष्टीनें ती अगदीं "होपलेस केस" होती!

एक दिवस संध्याकाळीं आमचा कंपू लॉ कॉलेजच्या बाजूनें फिरायला गेला होता. श्री. शेळकेहि आमच्या बरोबर होते. साहजिकच चालतांचालतां नेहमींप्रमाणें तावातावानें वादहि चालला होता. विषय होता कॉ. रॉय यांची युद्धविषयक भूमिका. श्री. दळवी ती भूमिका आपल्या नेहमींच्या पद्धतीनें आवर्जून मांडीत होते.

श्री. शेळके ह्यांचा मुख्य मुद्दा एकच आणि तो ते अगदीं तावातावानें पुन्हा पुन्हां आमच्यावर आदळीत होते. त्यांचें म्हणणें कीं "हें युद्ध जर तत्त्वांचें युद्ध, लोकयुद्ध असें तुम्ही म्हणतां तर रुसो-जर्मन तहाचें समर्थन तुम्ही कसें कराल? एक तर रशिया चूक नाहींतर तुमचें निदान चूक!".

श्री. दळवींनाहि जरा आवेश आला. ते म्हणाले कीं "रशिया–जर्मनी तह हा केवळ सोयीचा तह आहे. वस्तुतः प्रस्तुत युद्धांत एकमेकांचे खरे शत्रू तेच आहेत. व आज ना उद्या त्यांना एकमेकांविरुद्ध रणांगणांत उतरल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. कुणी सांगावें या घटकेला, या क्षणालाहि त्यांचें युद्ध जुंपलेलें असेल!"

श्री. दळवींचे हें वाक्य संपतें न संपतें तोंच बॅ. तारकुंडे अगदीं उत्तेजित मनःस्थितींत असल्यासारखे आपल्या नादांत समोरून झपाझप पावलें टाकीत येतांना आम्हाला दिसले. आमच्याकडे त्यांचें लक्ष जातांच "कुणीतरी सांगायला भेटलें" अशा आविर्भावांत अगदीं उतावीळपणें उत्तेजित स्वरांत हात उंच करून ते जवळ जवळ ओरडलेच : "Comrades! Have you heard the news? ( कॉम्रेड्स्, बातमी ऐकलीत कां तुम्ही. )"

बॅ. तारकुंड्यांचें तें वागणें त्यांच्या नेहमींच्या स्वभावाला इतकें सोडून होतें कीं कांहींहि न सुचून आम्ही केवळ प्रश्नार्थक चेहरे करून त्यांच्याकडे पाहूं लागलों!

आमच्या चेहऱ्यांना उत्तर म्हणून बॅ. तारकुंडेच मग पुढें म्हणाले: "Germany has declared war on Russia" (जर्मनीनें रशिया विरुद्ध युद्ध पुकारलें आहे)!"

बातमी खरोखरच मोठी होती. आमच्या माना अभावितपणें श्री. शेळकेंकडे वळल्या. त्यांच्या चेहऱ्यावरचा भाव पहाण्यासारखा होता. आमच्या मनावर बातमीचा काय परिणाम झाला असेल तो असो. पण श्री. शेळके यांच्यावर तो इतका झाला कीं, त्या क्षणापासून त्या दिवसांपासून शेळके जितके कडवे कॉंग्रेसवादी होते तितकेच किंबहुना त्यापेक्षांहि कांकणभर जास्तच कडवे ते रॉयवादी झाले!

आज श्री. शेळके कुठें आहेत, काय करतात, त्यांचा राजकीय रंग सध्या काय आहे – याची मला कांहींच कल्पना नाहीं. पण कॉलेजांत असे तों ते अतिशय कडवे रॉयवादी होते आणि तेहि त्या काळांत कीं जेव्हां रॉयिस्टांच्या वांट्याला हेटाळणी व तिरस्कार ह्याशिवाय कांहींहि येत नसे!

आमच्या अनेक दिवसांच्या वादविवादानें जें साधलें नाही तें एका क्षणांत कॉ. रॉय यांच्या अचूक गणिती निदानाच्या ह्या विलक्षण प्रत्ययानें साधलें, एवढें खरें!










प्रा. ग. रा. दळवी

# रॉय यांचा 'निर्वसाहतीकरणाचा सिद्धान्त'

रशियांत बोल्शेव्हिक पक्षाच्या नेतृत्वाखालीं झालेल्या राज्यक्रांतीनंतर दोन वर्षांच्या अवधींत, म्हणजे १९१९ मध्यें तिसरी कम्युनिस्ट इंटरनॅशनल या संस्थेची स्थापना करण्यांत आली. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांच्या मध्यंतरींच्या काळांत या संघटनेनें सर्वत्र कम्युनिस्ट चळवळींना प्रोत्साहन देऊन कम्युनिस्ट विचारसरणीचा प्रचार केला व जागतिक कामगार व कम्युनिस्ट चळवळींची शक्ति वाढविली. गेल्या पस्तीस वर्षांच्या काळांत ज्या ऐतिहासिक घडामोडी झाल्या त्यांचें विश्लेषण करतांना तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या कार्याची नीट माहिती करून घेणें आवश्यक आहे. कारण या कार्यामुळें इतिहासाला निराळें वळण लागलें आहे हें उघड आहे.

## लेनिनची प्रच्छन्न मान्यता

तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलची संस्थापना करण्यांत ज्या मार्क्सवादी बुद्धिवंतांनीं आणि कामगार-पुढाऱ्यांनीं भाग घेतला त्यांत श्री. मानवेंद्रनाथ रॉय यांची प्रामुख्यानें गणना करण्यांत येते. या संस्थेचे जे इतिहास उपलब्ध आहेत व ज्या तत्संबद्ध व्यक्तींनी ज्या आठवणी लिहिल्या आहेत त्यांत मानवेंद्रनाथ रॉय या 'उंच, उमद्या, सांवळ्या, भारतीय तरुणा'च्या कार्याचा, बुद्धिमत्तेचा आणि व्यक्तिमत्त्वाचा आदरपूर्वक उल्लेख केलेला सांपडतो. एम्. एन्. रॉय यांचें त्या संस्थेतील कर्तृत्व ऐतिहासिक स्वरूपाचें आणि विशेष उल्लेखनीय आहे, हें त्यांच्याशीं तात्त्विक मतभेद असलेल्या व्यक्तींनींहि मान्य केलें आहे. जागतिक व विशेषतः वसाहतींमधील मार्क्सवादी प्रेरणेनें निर्माण झालेल्या बौद्धिक, राजकीय, सामाजिक आणि आर्थिक चळवळींचा इतिहास लिहावयाचा झाल्यास रॉय यांच्या मौलिक कार्याचा सांगोपांग विचार करावा लागेल. भांडवलशाहीविरोधी क्रांतिकारक लढ्यांत वसाहतींमधील दलित समाजाचा हा अलौकिक प्रतिनिधि जागतिक क्रांतीच्या मान्यवर पुढाऱ्यांचा अग्रगण्य आणि विश्वसनीय सल्लागार होता; रशियेतर देशांत प्रथम स्थापन झालेल्या मेक्सिकन कम्युनिस्ट पक्षाचा संस्थापक व चिटणीस होता; कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या पौर्वात्य शाखेचा प्रमुख होता; मागासलेल्या देशांतील दलित समाजाच्या प्रश्नांची माहिती असलेला तज्ज्ञ होता; आशियामध्यें मार्क्सवादी विचारसरणीचीं व आधुनिक वैज्ञानिक, बुद्धिवादी तत्त्वज्ञानाचीं बीजें पेरणारा व त्याचें संगोपन करून बौद्धिक व सामाजिक नवजीवनाच्या चळवळीचीं ( Renaissance Movement ) रोपटीं निर्माण करणारा प्रखर बुद्धिवादी तत्त्वचिंतक होता. वयाची तिशीहि उलटली नाहीं अशा या तरुणानें आपल्या मूलगामी बुद्धिमत्तेच्या, अनन्यसाधारण अनुभवाच्या आणि मानवी स्वातंत्र्यावरच्या अढळ निष्ठेच्या आधारावर मार्क्सवादी प्रेरणेनें निर्माण झालेल्या बौद्धिक व सामाजिक आंदोलनांत जें मानाचें स्थान मिळविलें आणि जें लोकविलक्षण कार्य केलें त्याचें महत्त्वमापन केल्यास प्रचलित परिस्थितींत या आंदोलनांना कशा स्वरूपाचें दिग्दर्शन केलें पाहिजे याची कल्पना येऊं शकेल. विशेषतः सांस्कृतिक, राजकीय, सामाजिक व आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या देशांमध्यें नवचैतन्य निर्माण करावयाचें असलें व त्या त्या देशाच्या इतिहासाचें सार्थ आकलन करून सामाजिक व आर्थिक क्रांतीचा स्वातंत्र्यनिष्ठ आणि व्यवहार्य कार्यक्रम आंखावयाचा असला तर एम्. एन्. रॉय यांच्या प्रभावी बुद्धिवादी विचारांचें, वैज्ञानिक दृष्टिकोणाचें आणि शास्त्रीय तत्त्वज्ञानाचें परिशीलन करणें आवश्यक आहे. मार्क्सवादी वैचारिक आणि सामाजिक चळवळींत प्रवेश केल्यानंतर त्यांनीं जो पहिला महत्त्वाचा सिद्धांत मांडला व ज्यामुळें ते कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्यें विशेष प्रसिद्धि पावले त्या सिद्धांताची सिंहावलोकनात्मक मीमांसा केली तर वर निर्दिष्ट केलेल्या परिशीलनाकरतां अनुकूल प्रवृत्ती उत्स्फूर्त होतील असें वाटतें.

१९२० मध्यें भरलेल्या तिसऱ्या कम्युनिस्ट इंटर-








नॅशनलच्या दुसऱ्या परिषदेंत वसाहतींच्या प्रश्नाची चर्चा करण्यांत आली. त्या चर्चेकरतां दोन प्रबंध सादर करण्यांत आले. ' वसाहती व राष्ट्रवादी चळवळी ' ('National and colonial Question'). हा या दोन्ही प्रबंधांचा विषय होता. लेनिन व रॉय यांनीं हे निरनिराळे प्रबंध तयार केले व त्यांमध्यें राष्ट्रवादी चळवळीच्या ऐतिहासिक व सामाजिक स्वरूपाबद्दल दोघांच्या विचारांत भेद आहेत असें स्पष्ट झालें. विशेषतः राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या संग्रामांत वरिष्ठ आणि भांडवलदार वर्ग यांचें स्थान कोणतें असेल या बाबतींत हे मतभेद तीव्र आहेत असें दिसून आलें. भांडवलदारवर्ग या क्रांतिकारक चळवळींत भाग घेईल असें मत लेनिनच्या प्रबंधांत व्यक्त केलेलें होतें; या-उलट हा वर्ग प्रतिगामी आहे व तो पुरोगामी क्रांतिवादी शक्तींना विरोध करील व साम्राज्यशाहीशीं सख्य करून सत्तेमध्यें भागीदारी करील असें मत रॉय यांनीं मांडलें. हा मतभेद तीव्र असूनसुद्धां लेनिननें रॉय यांच्या मताचा अप्रत्यक्षपणें स्वीकार केला. हे दोन्ही प्रबंध परिषदेनें मान्य करावे असें स्वतः लेनिननेंच सुचविलें आणि हे दोन्ही परस्परविरोधी मतें प्रतिपादणारे प्रबंध मान्य करण्यांत आले. रॉय यांच्या दृष्टिकोणाला आणि सिद्धांताला लेनिननें प्रच्छन्न मान्यता दिली. तरीसुद्धां या द्व्यर्थी मान्यतेमुळें कम्युनिस्टांच्या वसाहतविषयक धोरणांत नेहमींच एक चमत्कारिक संदिग्धता राहिली व त्यामुळें वैचारिक व कार्यक्रमात्मक गोंधळ होऊन वसाहतींमधील पुरोगामी चळवळींची कायमची कुचंबणा झाली. रॉय यांचाच प्रबंध मान्य करण्यांत आला असता तर या चळवळींना दिशा मिळाली असती असें याबद्दल नंतरच्या घटनांवरून व इतिहासानें घेतलेल्या वळणावरून म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. रॉय यांच्या या प्राथमिक स्वरूपाच्या सिद्धांताला तत्कालीन आर्थिक व राजकीय घडामोडींमुळें अधिक सबळ पुरावा मिळूं लागला व त्या सिद्धांताला परिणत स्वरूप प्राप्त झालें. या परिणत स्वरूपांत मांडलेल्या सिद्धांताला "रॉय यांचा 'निर्वसाहतीकरणा'चा सिद्धांत" ('Roy's Decolonisation Thesis') असें नामाभिधान देण्यांत आलें. त्यानंतरच्या घटनांनीं हा सिद्धांत बरोबर होता याचा निर्वाळा दिला आहे. यामुळें ऐतिहासिक घटनांचें शास्त्रीय विश्लेषण केल्यास भावी घटनांचा वेध घेऊन त्याप्रमाणें मानवी प्रयत्नांना योग्य दिशा लावतां येते हें सत्य आकलन होतें. त्याचप्रमाणें मागासलेल्या देशांतील स्वातंत्र्यवादी चळवळींना योग्य मार्गदर्शन करावयाचें असल्यास रॉय यांनीं मांडलेल्या या सिद्धांताच्या अनुषंगानें अद्यापहि राष्ट्रवाद व स्वातंत्र्यवाद यांमधील अंतर समजावून घेण्याची शक्यता आहे हें स्पष्ट होतें.

## अप्रसिद्ध राहिलेलें प्रतिवृत्त

पहिल्या महायुद्धाच्या आणि तदनंतरच्या काळांत हिंदुस्थानांतील आर्थिक परिस्थितीला निराळें वळण मिळूं लागलें. ब्रिटिश साम्राज्याच्या मुख्य वसाहतींमध्यें औद्योगीकरणाला चालना मिळाली. कारखानदारी उद्योगधंदे निर्माण होऊं लागले. आणि हिंदी भांडवल व भांडवलदार यांच्या विकासाला नवीन संधि प्राप्त होऊं लागली. या घटनांचा अर्थ शोधून काढण्यास ठोकळेबाज मार्क्सवाद असमर्थ ठरूं लागला. या अनपेक्षित प्रवृत्तींचा अर्थ शोधून काढण्याकरतां कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या वरिष्ठ पुढाऱ्यांत चर्चा सुरू झाली आणि संशोधन व्यवस्थित व्हावें याकरतां एक मंडळ नेमण्यांत आलें. ही घटना १९२७–२८ मधील असावी. बुखारिन या प्रमुख बोल्शेव्हिक पुढाऱ्यानें सुचविल्यावरून या मंडळानें ' निर्वसाहतीकरण ' ही प्रवृत्ति काय आहे याबद्दल अहवाल सादर करावा असें ठरलें. ' निर्वसाहतीकरण ' ( De-colonisation ) हा शब्द प्रयोग प्रथम बुखारिन यानें केला.

१९२७ च्या सुमारास हिंदुस्थानांतील आर्थिक परिस्थितीबद्दल जे वृत्तांत कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या पुढाऱ्यांना मिळाले त्यावरून एका महत्त्वाच्या वसाहतीमध्यें औद्योगीकरणाची प्रवृत्ति रूढ होत चालली होती असें दिसून आलें. अशा तऱ्हेची प्रवृत्ति निर्माण होण्याची शक्यता आहे असें रॉय यांनीं इंटरनॅशनलच्या दुसऱ्या परिषदेला सादर केलेल्या प्रबंधांत व तदनंतर त्यांनीं हिंदुस्थानविषयक लिहिलेल्या ' संक्रमणावस्थेंतील हिंदुस्थान ' (' India in Transition' ) या पुस्तकांत साधार प्रतिपादन केलें होतें. या प्रवृत्तीमुळें राष्ट्रीय चळवळींतील वर्गविग्रह अधिक तीव्र होईल त्याचप्रमाणें राष्ट्रीय भांडवलदार व साम्राज्यशाही यांमध्यें सलोख्याचे संबंध निर्माण होऊन त्यांची तडजोड होईल







असा निष्कर्ष रॉय यांनीं १९२० ते १९२७ च्या काळांत मांडलेला होता. १९२७ सालीं मिळालेल्या वृत्तांतावरून त्यांच्या सिद्धांताला अधिकच पुष्टि मिळाली. त्यानंतर बुखारिनच्या सूचनेवरून जें मंडळ नेमण्यांत आलें होतें त्यानें केलेल्या प्राथमिक संशोधनावरून एक प्रतिवृत्त तयार करण्याचें काम रॉय यांच्याकडे सोंपविण्यांत आलें. ठरावाच्या स्वरूपाचें हें प्रतिवृत्त रॉय यांनीं चीनहून परत आल्यावर तयार केलें. परंतु तें कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या दस्तैवजांमध्येंच राहिलें. पुढें रॉय यांनीं तें प्रतिवृत्त कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें प्रसिद्ध करावें असें आव्हानहि दिलें. परंतु तें प्रतिवृत्त अप्रसिद्धच राहिलें. नंतरच्या कालांत रॉय यांनीं त्या प्रतिवृत्तांतील महत्त्वाचे मुद्दे व आधारभूत पुरावे कम्युनिस्ट इंटरनॅशनलला १९२७ नंतर लिहिलेल्या दोन अनावृत पत्रांमध्यें सविस्तर उद्धृत केले. रॉय यांचा '**निर्वसाहतीकरणा**'चा **सिद्धांत** आजतरी त्याच स्वरुपांत उपलब्ध आहे. मूळचें प्रतिवृत्त उपलब्ध झाल्यास त्या सिद्धांताची सर्वांगीण व अधिक माहिती कोणाहि चिकित्सकाला मिळूं शकेल.

## ब्रिटिश भांडवलशाहीला उतरती कळा !

पहिल्या महायुद्धानें आणि तदनंतर प्राप्त झालेल्या परिस्थितीमध्यें साम्राज्यशाहीच्या अंतर्गत आर्थिक व्यवहारजीवनांत कांहीं महत्त्वाचे फरक झाले व त्यामुळें साम्राज्यशाहीच्या वसाहतींमधील आर्थिक व राजकीय धोरणावर त्यांचे दूरगामी परिणाम झाले. या गोष्टीची जाणीव रॉय यांच्या सिद्धांताच्या मुळाशीं आहे. वसाहतींमधील क्रांतीचा कार्यक्रम आणि मार्ग आंखतांना, मार्क्सवादी प्रेरणेमुळें, साम्राज्यशाही व वसाहती यांमधील आर्थिक व सामाजिक हितसंबंधांचें विश्लेषण करणें जरूर होतें. आपल्या अनुभवाच्या आणि चिकित्सक प्रवृत्तीच्या आधारानें रॉय यांनीं हें विश्लेषण केलें व तें अचूक ठरलें. त्यांनीं मांडलेल्या सिद्धांताइतकेंच त्यांनीं स्वीकारलेल्या शास्त्रीय, चिकित्सक व परिस्थितीच्या सम्यक् ज्ञानावर आधारलेल्या दृष्टिकोणालाहि महत्त्व आहे. किंबहुना अशा तऱ्हेचा दृष्टिकोण पुरोगामी विचारवंतांनीं स्वीकारावा असा रॉय यांचा अप्रतिहत आग्रह होता.

लेनिननें साम्राज्यशाहीसंबंधीं जे सिद्धांत मांडले होते ते रॉय यांनीं मान्य केले व आपल्या वसाहतविषयक सिद्धांताच्या रूपानें, साम्राज्यशाहीचें दुसरें म्हणजे पिळल्या जाणाऱ्या दलित समाजाच्या परिस्थितीचें आणि सामाजिक व आर्थिक आकांक्षांचें अंग काय याची शास्त्रीय चिकित्सा करून, मार्क्सवादी विचारसरणींत त्यांनी मौलिक भर घातली.

रॉय यांच्या सिद्धांताची ठोकळ रूपरेषा पाहिल्यास या विधानाची सत्यता कळून येईल. साम्राज्यशाही ही स्थिर, न बदलणारी व्यवस्था आहे असें समजणें चूक आहे. उलट, ती गतिमान्, बदलणारी आणि आर्थिक, सामाजिक व राजकीय बदल घडवून आणणारी एक व्यवस्था आहे. ब्रिटिश साम्राज्यशाहीमध्यें महायुद्धकालांत व नंतर महत्त्वाचे बदल घडून आले व त्यांचा वसाहतींवर पण परिणाम झाला. त्या प्रमाणांत वसाहतींच्या पिळवणुकीच्या पद्धतींत बदल व त्यांमधील वर्गांमध्यें विग्रह होऊं लागला. या घडामोडींच्या मुळाशीं असलेला मूलभूत मुद्दा युद्धपूर्व व युद्धोत्तर कालांत ब्रिटिश भांडवलशाहीचें स्वरूप काय हा होय. आधुनिक साम्राज्यशाही निर्यात होणाऱ्या धनसंचयी भांडवला-( finance capital )वर अवलंबून असते. ब्रिटिशसाम्राज्यशाहीच्या बदलत्या स्वरुपाची जाणीव करून घेण्याकरितां ब्रिटिश उद्योगधंद्यांची परिस्थिति कशी आहे व त्यांमधून निर्यात होण्याजोगें अतिरिक्त धनसंचयी भांडवल किती निर्माण होतें यांची वास्तववादी व शास्त्रीय जाणीव पाहिजे. महायुद्धकाळीं व नंतर ब्रिटनच्या या भांडवलाच्या संचयाला व निर्यातीला उतरती कळा लागली व त्यामुळें साम्राज्यशाहीला आपल्या वसाहतींमधील धोरणांत महत्त्वाचे फेरबदल करावे लागले. या काळांत ब्रिटनच्या उत्पादनशक्तीच्या मानानें उत्पादन कमी होत चाललें. याचें कारण ब्रिटिश मालाला ज्या जागतिक बाजारपेठा होत्या त्या युद्धामुळें व स्थानिक उद्योगधंदे वाढल्यामुळें आकुंचन पावूं लागल्या व ब्रिटिश मालाची मागणी कमी होऊं लागली. ब्रिटिश मालाची निर्यात युद्धोत्तर कालांत २० टक्क्यांनीं घटली. या उलट १८८० ते १९१३ च्या काळांत निर्यातीची व ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या भरभराटीची कमान चढती होती. भरभराटीच्या काळांतील धोरण बदलून अवकळेच्या काळांत नवीन धोरण स्वीकारणें जरूर होतें. वसाहतींची पिळवणूक अधिक करून साम्राज्यशाहीचीं जीं घरच्या भांडवलशाहीची मुळें





अनुक्रमणिका

ती नीट पोसली जातील अशी व्यवस्था करणें अवश्य होतें. नाहींतर साम्राज्यशाहीचा वृक्ष कोलमडून पडण्याचा संभव निर्माण होणार होता. असें करतांना, वसाहतींमधील भांडवल व भांडवलदार यांचें साहाय्य घेणें साम्राज्यशाहीला अपरिहार्य होतें. ब्रिटिश भांडवलशाही आर्थिक अरिष्टांत सांपडत चालली होती याला भरपूर पुरावा होता. निर्यातीमध्यें घट फार होत चालली होती आणि विशेषतः औद्योगिक व्यवस्थेचा पाया समजल्या जाणाऱ्या उद्योगधंद्यांत निर्माण झालेल्या मालाला परदेशीय बाजारपेठांमध्यें उठाव मिळेनासा झाला होता. त्याचप्रमाणें परदेशांत गुंतविल्या जाणाऱ्या भांडवलाच्या एकंदर किंमतींतहि घट होऊं लागली. युद्धापूर्वीच्या पांच वर्षांच्या काळांत ८६३० लक्ष पौंड किंमतीचें भांडवल परदेशांत गुंतविलें गेलें होतें, तर युद्धोत्तर काळांतील पांच वर्षांत फक्त ४६६० लक्ष पौंड किंमतीचें भांडवल बाहेर गेलें. परदेशीं गुंतविण्याकरतां दिलेल्या कर्जामध्येंपण घट होत चालली. १९१२ सालीं एकंदर कर्जाच्या ८८ टक्के रक्कम परदेशीं गुंतविण्यांत आली तर ती १९२४ मध्यें ६२ व १९२७ मध्यें ३१ टक्यांवर घसरली !

## हिंदी भांडवलदारांना भागीदारी

याचा अर्थ असा कीं १९१४ नंतर ब्रिटिश भांडवलशाही अर्थव्यवस्थेमध्यें भांडवलाच्या संचयाचा वेग हळूं हळूं कमी होत गेला. १९२४ मध्यें हा संचय अंदाजें ३० टक्यांनीं तरी घटला असावा. यामुळें हिंदुस्थानांत आयात होणाऱ्या ब्रिटिश भांडवलाला १९२३ पासून निश्चित मर्यादा पडल्या व त्यामुळें हिंदुस्थानांतील एतद्देशीय भांडवलाची व भांडवलदारांची मदत घेणें साम्राज्यशाहीला अपरिहार्य झालें. ही मदत घेणें अर्थातच एका अर्थी साम्राज्यशाहीला परिणामीं पोषक ठरणारें नव्हतें. कारण त्यामुळें एतद्देशीय भांडवलशाहीवर्गाशीं तडजोड करून त्यांच्या विकासाला मार्ग करून देण्यासारखें होतें व आपल्या सत्तेंत नवीन भागीदार घेण्यासारखें होतें. परंतु साम्राज्यशाहीच्या आणि वरिष्ठ भांडवलशाहीच्या अंतर्गत विरोधांमुळें आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या अडचणींमुळें तें अपरिहार्यच होतें. त्यांत साम्राज्यशाहीला निवड करण्याजोगी परिस्थिति अथवा स्वतंत्रता नव्हती. या प्रवृत्तीमुळें आणि धोरणामुळें हिंदुस्थानांतील वरिष्ठ वर्गाची मुक्तता होऊन त्यांना पूर्वी प्राप्त झालेला वसाहतीमधील त्यांचा जुना दर्जा जाऊन नवीन दर्जा मिळण्याची व दलित समाजाला अधिक दडपून विकास करण्याची संधि मिळण्याची शक्यता निर्माण झाली होती. त्यामुळें त्या वर्गाचें एका अर्थी वसाहतींमधील कार्य बदलणार होतें.

याच कारणांमुळें वसाहतींमधून साम्राज्यशाहीला मिळणाऱ्या नफ्यांत वा उत्पन्नांत पण घट सुरू झाली. परदेशी व्यापारांतील तूट १९१३ मध्यें १५८० लक्ष पौंड होती ती १९२६ मध्यें ४७५० लक्ष पौंडांपर्यंत वाढली. परदेशांत गुंतविण्याकरतां जो भांडवली अतिरिक्त संचय होत असे, तो १९१३ मध्यें १८१० लक्ष पौंड होता; १९२६ मध्यें तो ७ लक्ष पौंडावर घसरला. याचा अर्थ असा कीं साम्राज्यशाहीचा जो मुख्य आधार तोच कोसळूं लागला होता. त्याला भक्कम करण्याकरतां एतद्देशीय भांडवलाची जोड घेणें जरूर होतें.

याचा परिणाम हिंदुस्थानांतील आर्थिक व राजकीय धोरणांवर व परिस्थितीवर पण होऊं लागला होता याबद्दल संशयास जागा नव्हती. त्याचा पहिला दृश्य परिणाम म्हणजे हिंदुस्थानांत सुरू झालेली औद्योगिक वाढ होय. यांतून साम्राज्यशाहीला दुहेरी फायदा मिळण्यासारखा होता. एक तर, एतद्देशीय भांडवलदारांना वाव दिल्यामुळें साम्राज्यशाहीच्या मूळ गाभ्याला धक्का न बसतां तिचें आसन स्थिर करतां येण्यासारखें होतें; आणि दुसरें म्हणजे हिंदुस्थानांतील आर्थिक परिस्थितींत संक्रमण घडवून आणून येथील उत्पादनांत वाढ करून त्यापासून नफ्याचें प्रमाण वाढविणें शक्य होणार होतें. या दुहेरी फायद्याचा ब्रिटिश भांडवलशाहीला, अंतर्गत विरोधांमुळें निर्माण होणाऱ्या अरिष्टांपासून स्वतःला टिकविण्याकरतां, उपयोग करणें जरूर होतें. पहिल्या महायुद्धांत ब्रिटनला जें कर्ज झालें तें फेडण्याकरतां हिंदुस्थानांतून मिळणारा फायदा वाढविणें आवश्यक होतें. परंतु तो उद्देश साध्य करण्याकरतां एतद्देशीय आर्थिक व्यवस्थेचें आधुनिकीकरण करणें आवश्यक होतें.

१९१५ मध्यें लॉर्ड हार्डिंज यानें दूरदर्शीपणा दाखवून हिंदुस्थानांत औद्योगीकरण सुरू करणें इष्ट आहे असें प्रतिपादन केलें. १९१६ मध्यें नेमलेल्या इंडस्ट्रिअल कमिशननें त्याच धोरणाची शिफारस करून तें सरकारनें










लक्ष घालून पार पाडावें असें सुचविलें. १९१९ च्या घटनात्मक सुधारणा करून एतद्देशीय भांडवलाला उत्तेजन मिळण्याजोगी राजकीय परिस्थिति निर्माण करण्यांत आली. "युद्धानंतर औद्योगिक वाढ करण्याची जरूर अधिक भासेल" असें मॉंटफोर्ड रिपोर्टांत सुचविण्यांत आलें. १९२२ मध्यें हिंदी उद्योगधंद्यांना संरक्षण देण्याच्या प्रश्नाचा विचार करण्याकरतां **फिस्कल कमिशन** नेमण्यांत आलें आणि त्याचा अध्यक्ष म्हणून एका हिंदी उद्योगपतीला नेमण्यांत आलें. खुल्या व्यापाराचें ब्रिटिशांचें आवडतें धोरण टाकून संरक्षित व्यापाराचें व उद्योगधंद्याचें धोरण बनविण्यांत येऊं लागलें. आयातीवरील जकात वाढविण्यांत आली. लोखंड व पोलाद उत्पादन करणाऱ्या कारखान्यांना सरकारी मदत देण्यांत आली आणि याप्रमाणें एतद्देशीय औद्योगीकरणाचा पाया घालण्यास स्वतः साम्राज्यशाही-नेंच सुरवात केली. या सर्व धोरणांचा उद्देश एकच होता. ब्रिटिश साम्राज्यशाहीला प्राप्त होत असलेल्या अवकळेपासून तिचें संरक्षण करणें व तिचा जोम वाढविणें हा तो उद्देश होय. याचाच अर्थ असा कीं हिंदुस्थानच्या वासाहतिक पिळवणुकीला एक प्रकारचें नवीन संघटित स्वरुप देण्यांत येत होतें. तें साम्राज्य-शाहीला पोषक असेंच होतें. " So industrialisation of India, in this period of Capitalist decay in Britain, rationalisation of colonial exploitation, so to say, is not incompatible with the basic principles of Imperialism " असें रॉय यांनीं या सर्व घटनांचें वर्णन केलें. हिंदुस्थानची उत्पादनशक्ति वाढविल्याशिवाय क्रयशक्ति वाढणें अशक्य होतें. क्रयशक्ति वाढली नसती तर ब्रिटन व हिंदुस्थान यांचा व्यापार कमी होत जाऊन साम्राज्यशाहीचें जीवन खंगत जाणार होतें. हिंदुस्थानांत आयात होणाऱ्या मालांत १९१३ मध्यें ६३ टक्के माल ब्रिटिश होता तर १९२६ मध्यें तो ५० टक्क्यांवर घसरला. हिंदी मालाची ब्रिटनला झालेली निर्यात १९१३ मध्यें ३१ टक्के होती ती १९२५ मध्यें २१ टक्क्यांवर घसरली. हिंदुस्थानची बाजारपेठ ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या हातांतून निसटूं लागली. १९२८ मध्यें 'Economist' या वजनदार पत्रानें प्रांजलपणें असें लिहिलें कीं " ब्रिटनच्या हिंदुस्थान-वरील सत्तेची उपयुक्तता आतां संपत आली. " याचा अर्थ असा कीं जुन्या तऱ्हेचें वसाहतीचें धोरण आतां निरुपयोगी झालें असून परिस्थितीला अनुरूप असें नवीन धोरण आंखण्याची जरूर आहे. हिंदी भांडवलाला जर हात दिला नाहीं तर साम्राज्यशाहीचा मक्तेदारीचा अंत जवळ येणार होता. तसें अरिष्ट टाळावयाचें असेल तर एकच मार्ग उपलब्ध होता. तो म्हणजे हिंदुस्थानांतील वासाहतिक अर्थव्यवस्थेचें साम्राज्यशाहीला पोषक असें संक्रमण घडवून आणणें. याकरितां एतद्देशीय भांडवलाला व भांडवलशाहीला वाव देणें भाग होतें म्हणजेच त्या प्रमाणांत वसाहतीचें ' निर्वसाहतीकरण ' करणें अवश्य होतें. या दुसऱ्या मार्गांत परिणामीं धोका नव्हता असें नाहीं. परंतु तो पत्करणें अपरिहार्य होतें.

### औद्योगीकरण अपरिहार्य

हिंदी भांडवल उभारण्याकरतां जरूर त्या योजना आंखण्यांत येऊं लागल्या. १९१९ मध्यें हिंदुस्थानांतील सरकारी रोखे १३२७ लक्ष पौंड किंमतीचे होते ते १९२४ मध्यें ३४१० लक्ष पौंड किंमतीपर्यंत वाढले. ब्रिटिश भांडवलाला जो एतद्देशीय फायदा होत होता तो परत भांडवली स्वरुपानें येथेंच गुंतविण्यांत येऊं लागला. या दोन्ही मार्गांनीं परकीय व एतद्देशीय भांडवलदारांची संयुक्त आघाडी निर्माण होऊन एतद्देशीय भांडवलदारांना धाकटी भागीदारी देण्यांत येऊं लागली. हिंदुस्थानची अर्थ-व्यवस्था शेतीप्रधानच राहिली परंतु तिच्या चौकटींत औद्योगीकरणाचें नवें धोरण अंमलांत येऊं लागलें. त्या प्रीत्यर्थ शेतीसंबंधीं धोरणाला नवें वळण देण्यांत येऊं लागलें. त्याचप्रमाणें औद्योगीकरणाचें सबंध अर्थ-व्यवस्थेवर नवे परिणाम होऊं लागले. या सर्वांचा उद्देश मात्र एकच होता. हिंदुस्थानची वासाहतिक पिळणूक चालू ठेवून फायदा काढणें व त्याकरितां जरूर त्या तऱ्हेचे आर्थिक व राजकीय संबंध तयार करणें हा होय.

साम्राज्यशाहीनें वसाहतींचा औद्योगिक मागासले-पणा कायम ठेवणें हें कांहीं तिचें कार्य नव्हे. वसाहतीं-ची पिळणूक करून नफा काढणें हें तिचें कार्य आहे. त्याकरितां जोपर्यंत मागासलेपणा उपयोगांत येईल तो-










पर्यंत ठीक आहे. पण ऐतिहासिक परिस्थितीनें औद्योगीकरण करणें अपरिहार्य आहे.

साम्राज्यशाहीनें वसाहतींची पिळणूक करण्याचा नवीन मार्ग या आर्थिक धोरणाच्या स्वरूपानें शोधून काढला. त्या धोरणाचे राजकीय परिणाम त्यास अनुरूप असेच होणार होते यांत संशय नाहीं. रॉय यांनीं हे परिणाम होत आहेत याचें पण संशोधन केलें व परिस्थिति आणि घटना यांनीं तें बरोबर होतें याचा निर्वाळा दिला: हिंदी भांडवलदार-वर्ग राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या व सामाजिक क्रांतीच्या संग्रामांत पुरोगामी कार्य करणार नाहीं. तो वर्ग साम्राज्यशाहीचा दुय्यम भागीदार झाला असल्यामुळें राजकीय सत्तेचें संक्रमण होऊन त्या वर्गाला अधिक राजकीय व घटनात्मक हक्क व सत्ता मिळत जाईल. हिंदुस्थानचा दर्जा अंकित राष्ट्र ( Dependency ) असा न रहातां ब्रिटिश राष्ट्रकुलांतर्गत मर्यादित सार्वभौम देश ( Dominion ) असा राहील, यामुळें वसाहतीमधील दलित वर्गाच्या क्रांतिवादी स्वातंत्र्यसंग्रामाला केवळ साम्राज्यशाहीकडूनच विरोध होईल असें नव्हें तर वरिष्ठ वर्ग आणि भांडवलदार यांजकडूनहि त्याची गळचेपी होईल. औद्योगीकरणाच्या आणि नव्या वासाहतिक धोरणाच्या आर्थिक व राजकीय परिणामांचा दलित समाजाला तादृश फायदा कांहीं न होतां उलट त्यांच्या मुक्तिसंग्रामांत एक नवीन अडथळा निर्माण होईल. वसाहतींतील पिळणुकीचा राजकीय व आर्थिक भार वरिष्ठ व भांडवलदार वर्ग यांच्यावर पडणार नाहीं, परंतु दलित समाजावर पडलेला भार मात्र वाढत जाईल. परकीय व एतद्देशीय असे दोन मालक निर्माण होऊन दोघांच्याहि फायद्यासाठीं दलित वर्गाची पिळणूक भक्कम करण्यांत येईल. सरकारी कारभारांत, विधिमंडळांत व अधिकारांच्या जागांत वरिष्ठ व भांडवलदारी वर्गांना अधिक सत्ता मिळत जाईल. यामुळें हा वर्ग क्रांतिविरोधी झाल्याशिवाय रहाणार नाहीं. या वर्गाची एकप्रकारें साम्राज्यशाहीनेंच वासाहतिक परिस्थितींतून सोडवणूक केली आहे. या वर्गाचें व त्या अनुरोधानें अर्थव्यवस्थेचें ' निर्वसाहतीकरण ' होत चाललें आहे.

### इतिहासानें खरे ठरलेले निष्कर्ष

तात्पर्य, साम्राज्यशाहीनें हिंदुस्थानांतील वासाहतिक धोरणांत बदल केलेला आहे, तो युद्धकालीन व युद्धोत्तर निर्माण झालेल्या ब्रिटिश भांडवलशाहींतील पेंचप्रसंगामुळें घडवून आणणें भाग पडलें. यामुळें देशी भांडवल व भांडवलदार यांची दुय्यम भागीदारी स्वीकारून देशाचें औद्योगीकरण करण्याचें धोरण अवलंबावें लागलें. ही ' निर्वसाहतीकरणा'ची प्रवृत्ति आहे. त्यांत दलित समाजाचा उद्धार नाहीं परंतु वरिष्ठांचा त्यांत उघड फायदा आहे. हिंदुस्थानला यामुळें ' ब्रिटिश राष्ट्रकुलाचा एक सभासद ' हा दर्जा प्राप्त होईल. राष्ट्रीय अर्थव्यवस्थेचा गाभा व पाया बदलेल. जुने वर्गसंबंध बदलून नवे निर्माण होतील. देशाच्या आर्थिक व्यवहारांवर देशी भांडवलदारांची सत्ता वाढत जाईल. शेती या मुख्य धंद्यांत क्रांतिकारक बदल करण्यासारखी परिस्थिति निर्माण होईल. वरिष्ठवर्गाची राजकीय सत्ता वृद्धिंगत होईल. – हा सर्व राष्ट्रीय चळवळीचा अगर भांडवलदारांच्या लढ्याचा परिणाम नसून तो साम्राज्यशाहीच्या युद्धोत्तर पेंचप्रसंगाचा परिणाम आहे. हे हक्क देणग्या म्हणून देण्यांत येत आहेत. निर्वसाहतीकरणाची प्रवृत्ति म्हणजेच भांडवलदार वर्गाच्या क्रांतिपथावरील पदच्युतीची प्रवृत्ति होय.

ही रॉय यांच्या सिद्धांताची ठोकळ रूपरेषा आहे. या सिद्धांताच्या आधाराकरितां त्यांनीं मांडलेल्या पुराव्याच्या तपशिलांत शिरण्याची प्रस्तुत जरूर नाहीं. त्यांच्या सिद्धांताच्या सत्यतेची ग्वाही स्वयंसिद्ध आहे. रॉय यांनीं काढलेले निष्कर्ष इतिहासानें संपूर्णपणें खरे ठरविले आहेत. दुसऱ्या महायुद्धाच्या स्वरूपाचें जें अचूक विश्लेषण रॉय यांनीं केलें व त्यामध्यें, ब्रिटिश साम्राज्यशाही पूर्णपणें मोडकळीस येऊन दोस्तराष्ट्रें जिंकल्यास राजकीय स्वातंत्र्य हिंदुस्थानच्या पदरांत पडेल हें जें त्यांनीं भविष्य वर्तविलें त्याची पार्श्वभूमि त्यांच्या ' De-colonisation Thesis ' मध्यें स्पष्टपणें सांपडते.

या विवेचनावरून कांहीं उपयुक्त निष्कर्ष काढतां येतील. वैज्ञानिक शास्त्रशुद्ध दृष्टिकोण ठेवून आर्थिक, सामाजिक, राजकीय घडामोडींचें विश्लेषण केल्यास प्राप्त परिस्थितीचें सत्य आकलन करतां येतें आणि त्या अनुषंगानें सामाजिक, आर्थिक व राजकीय प्रगति कशी करतां येईल याबद्दल योग्य तो कार्यक्रम व शास्त्रशुद्ध धोरण आंखतां








येतें. वसाहतींमध्यें आजहि जे संग्राम व आंदोलनें चालू आहेत त्यांना पुरोगामी दिशा दाखवावयाची असल्यास लोकशाही क्रांतीचा कार्यक्रम कशा स्वरूपाचा असावा हें उघड होऊं शकतें. वर्गविरोधाच्या तत्त्वावरच हीं आंदोलनें चालली पाहिजेत असें नाहीं. परंतु समाजांतील प्रतिगामी व पुरोगामी शक्तींचें वर्गनिरपेक्ष विश्लेषण करतांना सामाजिक क्रांतीचा कार्यक्रम मान्य होण्यास कोणत्या अडचणी असू शकतात याची जाणीव होऊं शकते. राष्ट्रवादाचा फोलपणा स्पष्ट होऊं शकतो. आणि आपल्या देशांत आज जे आर्थिक व राजकीय बदल घडत आहेत त्याची, गेल्या चाळीस वर्षांच्या इतिहासाच्या आधारानें, चिकित्सा केल्यास त्यांचें साफ स्वरूप आकलन करतां येतें. अर्थात् हे निष्कर्ष विचारांत घेतांना, दुसऱ्या महायुद्धाच्या आणि त्यानंतरच्या कालांत जागतिक परिस्थितींत व वैचारिक भूमिकांमध्यें जे क्रांतिकारक मूलगामी बदल झाले आहेत त्यांचा सम्यक् विचार करावा लागेल व मगच सामाजिक क्रांतीचा, आर्थिक विकासाचा, लोकशाहीप्रधान राजकीय प्रगतीचा स्वातंत्र्यनिष्ठ, व्यवहार्य कार्यक्रम आंखावा लागेल. त्याकरतां शास्त्रीय, वैज्ञानिक विचारसरणीची व त्यावर आधारलेल्या नवीन सामाजिक तत्त्वज्ञानाची आवश्यकता आहे. ही विचारसरणी कशा स्वरूपाची आहे व हें तत्त्वज्ञान प्रचलित क्रांतिवादी समजल्या जाणाऱ्या तत्त्वप्रणालींपेक्षां कसें श्रेष्ठ आहे, हें रॉय यांचे विविध मौलिक विचार व विशेषतः त्यांचा **नव-मानवतावाद** ( Radical Humanism ) यांचा अभ्यास केल्यास चिकित्सक बुद्धिप्रामाण्यवादी अभ्यासकाला समजू शकेल.

---














प्रा. गोवर्धन पारीख

# तिसरी इंटरनॅशनल, चीन आणि रॉय

दुसऱ्या जागतिक कम्युनिस्ट कॉंग्रेसपासून आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीच्या धुरीणांमध्यें रॉय यांची गणना होऊं लागली हें सर्वांच्या परिचयाचें आहे. मेक्सिको व हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून रॉय या कॉंग्रेसला हजर राहिले; वसाहतींतील क्रांतीसंबंधीचा लेनिनशीं मतभेद व्यक्त करणारा त्यांचा दृष्टिकोण तद्विषयक ठरावांत अंतर्भूत करण्यांत आला; रॉय यांची तिसऱ्या इंटरनॅशनलच्या अध्यक्षमंडळावर व कार्यकारी समितीवर निवड झाली. 'वसाहतींतील क्रांतीचें मूर्तिमंत प्रतीक' या शब्दांत स्वतः लेनिननें त्यांचा गौरव केला. या कॉंग्रेसला आशियांतील दहाबारा प्रतिनिधी हजर होते; तथापि आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेनें, व्यापक दृष्टिकोणामुळें आणि परिस्थितीच्या सखोल ज्ञानामुळें रॉय त्या सर्वांत उठून दिसले. त्यांची जाज्वल्य क्रांतिनिष्ठा त्यापूर्वीच सिद्ध झाली होती. 'रशियन सोनें' प्रचाराच्या निमित्तानें मिळणार या समजुतीनें त्यांच्या कांहीं देशबांधवांनीं त्यांच्या कार्यांत अडचणी निर्माण करण्याचा घाट घातला. प्रचारासाठीं दहालक्ष डॉलर द्यावेत आणि रॉय यांच्या प्रतिनिधित्वाची चौकशी करावी अशा दोन सूचना त्यांनीं लेनिनला केल्या. परंतु लेनिननें हा डाव ओळखला होता. सोनें पुरविणें आवश्यक असलें तरी तूर्त आम्हालाच त्याची गरज आहे; आणि रॉयचें प्रतिनिधित्व त्यांच्या प्रत्यक्ष कार्यानेंच सिद्ध केलें असल्यामुळें तो प्रश्नच उद्भवत नाहीं असें स्पष्ट उत्तर लेनिननें दिलें. यानंतर सुमारें आठ वर्षें म्हणजे सहाव्या कॉंग्रेसपर्यंत रॉय यांचा तिसऱ्या इंटरनॅशनलशीं संबंध होता. या काळांत चार जागतिक कॉंग्रेसच्या अधिवेशनांत त्यांनीं मार्गदर्शन केलें; आजारीपणामुळें सहाव्या कॉंग्रेसला ते हजर राहूं शकले नाहींत. आणि तेव्हांपासूनच हा संबंध तुटला. या आठ वर्षांत त्यांनीं केलेल्या कार्याचें स्वरूप पूर्णपणें स्पष्ट करण्याइतकी माहिती उपलब्ध नाहीं. ती कधींकाळीं उपलब्ध होईल कीं नाहीं हाहि एक प्रश्नच आहे. तथापि त्यांच्या कार्याचें महत्त्व स्पष्ट करणारीं कांहीं अप्रत्यक्ष गमकें मात्र आढळतात. आणि त्यांतील सर्वांत महत्त्वाचें गमक म्हणजे तिसऱ्या इंटरनॅशनलचे एकमेव प्रतिनिधि म्हणून १९२७ सालीं चीनमधील क्रांतीचें मार्गदर्शन करण्यासाठीं त्यांना पाठविण्यांत आलें होतें हें होय.

चीनमधील कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वानें आणि त्यांच्या सल्लागारांनीं केलेल्या ढोबळ चुकांमुळें तेथील परिस्थितीकडे इंटरनॅशनलचें लक्ष गेलें. आणि चिनी क्रांतीचें मार्गदर्शन करणारा ठराव इंटरनॅशनलच्या कार्यकारी समितीनें नोव्हेंबर १९२६ मध्यें पास केला. हा ठराव रॉय यांनींच तयार केला होता; आणि त्यामुळें चीनमधील तत्कालीन परिस्थितीला लेनिनवाद यथार्थतेनें लागूं करणारे व त्या आधारें तिचें योग्य विश्लेषण करणारे पहिले मार्क्सवादी म्हणून रॉय यांचा उल्लेख केला जातो. या ठरावामुळें कोमिंटांगमधून तावडतोब बाहेर पडून सोव्हिएट्स स्थापन करावयात असे म्हणणारे ट्रॉट्स्कीचे अनुयायी व चिनी कम्युनिस्ट पक्षाचें संधिसाधु नेतृत्व या दोहोंचे दृष्टिकोण त्याज्य ठरले आणि शेतकीक्रांतीचें कार्य पार पाडण्यासाठीं कम्युनिस्ट पक्षानें पुढें पाऊल टाकावें; वुहानच्या डाव्या राष्ट्रीय सरकारमध्यें सामील व्हावें असा आदेश देण्यांत आला. तथापि प्रत्यक्ष कोणीतरी गेल्यावांचून हा आदेश अंमलांत येईल कीं नाहीं याबद्दल शंका होती. म्हणून रॉय यांनीं या कार्यासाठीं जातीनें चीनमध्यें जावें, लेनिनच्या सिद्धान्ताचा तेथें होत असलेला विपर्यस्त अर्थ आणि त्यांतून काढण्यांत येणारे संधिसाधु राष्ट्रीय ऐक्याचें धोरण यांना आळा घालावा आणि क्रांतीची पिछेहाट थांबवावी असा आग्रह स्वतः स्टालिननें धरला. त्यामुळें १९२७ सालीं परिस्थिति आटोक्याबाहेर जाण्याच्या बेतांत असतांना रॉय चीनला गेले.

चीनमधील तत्कालीन परिस्थितीचें या ठिकाणीं








दिग्दर्शन करणें कठिण आहे. रॉय यांच्या तीनचार ग्रंथांत व विशेषतः 'रिव्होल्यूशन अँड काऊंटर-रिव्होल्यूशन इन् चायना' या ग्रंथांत या संबंधीं विस्तृत विवेचन आहे. त्याच्या वस्तुनिष्ठतेची साक्ष देणारे इतरहि अनेक पुरावे आढळतात. रॉय यांना आपल्या नियोजित कार्यांत यश आलें नाहीं; १९२७ सालीं चीनमध्यें अपक्रांति यशस्वी झाली आणि पुढें १९२८ सालीं रॉय यांचा तिसऱ्या इंटरनॅशनलशीं संबंध तुटला. यावरून १९२८ सालची घटना ही त्यांच्या चीनमधील प्रमादांचाच परिणाम होय अशा प्रकारचा खुळचट प्रचार रॉय भारतांत परत आल्यानंतर सुरू झाला. अजूनहि त्याचे पडसाद अधूनमधून उमटत असतात. या प्रचारांतील अर्थशून्यता स्पष्ट करणें आणि पर्यायानें रॉय यांच्या चीनमधील कार्याचें स्वरूप स्पष्ट करणें इतकेंच या ठिकाणीं शक्य आहे.

चीनहून परत आल्यानंतर सुमारें वर्षभर रॉय मॉस्कोमध्यें होते. चीनमध्यें ते असतांनाच अपक्रांतीनें आक्रमक धोरण स्वीकारलें होतें. आणि मॉस्कोंत परत येई तों अपक्रांति यशस्वी झाली होती. अशा परिस्थितींत त्यांच्या कामाबद्दल त्यांना यत्किंचितहि दोष देण्यांत न येतां त्यांनीं दिलेला अहवाल इंटरनॅशनलनें मंजूर केला. आणि क्रांति बचावण्याचे त्यांनीं शक्य ते सर्व प्रयत्न केल्याबद्दल समाधान व्यक्त केलें. हजारों शेतकरी-कामगार यांच्या कत्तलीस जबाबदार ठरणारें वर्तन रॉय यांच्याकडून झालें असा अप्रत्यक्ष वा दूरान्वयानें देखील कोणास संशय आला असतां तर रॉय यांना शीर सलामत राखून मॉस्कोंतून बाहेर पडणें अशक्य होतें. रॉय यांचें चीनमधील कार्य योग्य व समाधानकारक मानलें गेलें याचाच आणखी एक पुरावा म्हणजे तेथून परत आल्यानंतर इंटरनॅशनलमधील जबाबदारीचीं कामें पुनः त्यांच्याकडे सोंपविण्यांत आलीं हा होय. उलट, "तिसऱ्या इंटरनॅशनलच्या सर्व कागदपत्रांत चीनमधील माझ्या कार्यावर टीका करणारी एक तरी ओळ काढून दाखवा" असें स्पष्ट आव्हान रॉयनीं पंधरा वर्षांपूर्वीच तुरुंगांतून बाहेर पडल्यानंतर दिलें होतें. या विधानाचें समर्थन करतां येईल असें इतरहि अनेक पुरावे देतां येतील. उदा० एडगर स्नो यांच्या 'रेडस्टार ओव्हर चायना' या ग्रंथांत रॉय यांचें परिस्थितीचें आकलन व मार्गदर्शन योग्य होतें असा माओ त्से तुंगचा अभिप्राय नमूद करण्यांत आला आहे. या काळांत ॲना लुइस्ट्रॉंग या स्वतः चीनमध्यें होत्या. त्यांनीं आपल्या 'चायनाज् मिलियन्स' या ग्रंथांत रॉय यांच्या हँको येथील चीनी कामगार परिषदेंतील कार्याचा गौरव केला असून त्यावेळच्या परिस्थितींत केवळ रॉय यांनींच योग्य मार्गदर्शन केलें असा निर्वाळा दिला आहे. वांग चिन वै यांना दाखविलेल्या मॉस्कोच्या तारेसंबंधीचा बऱ्याच वेळां 'तारेंत' आरोप करणाऱ्यांना त्यांनीं स्पष्ट उत्तर दिलें आहे. त्या म्हणतात: "क्रांतीला गुळमुळीत पाठिंबा देणाऱ्या एका स्नेह्याचें सहकार्य मिळवण्याचा तो प्रयत्न होता. ज्यांच्या साहाय्यानें तो सत्तारूढ झाला त्या त्याच्या शेतकरी–कामकरी अनुयायांना सशस्त्र बनविण्याच्या उपक्रमाचें तो स्वागत करील अशी अपेक्षा होती. वांग चिन वै हा नेहमीं साम्राज्यशाहीविरुद्ध लढणारा क्रांतिकारक नव्हता काय? त्यानें कामगारांना त्यांची पिळणूक करणारांविरुद्ध लढण्यास उत्तेजन दिलें नव्हतें काय?" तो फितूर होईल अशी शंका त्याचा भूतकाळ माहीत असणाऱ्याच्या स्वप्नींहि आली नसती. कम्युनिस्ट पक्षाविरुद्ध तो करीत असलेल्या तक्रारी रास्तच होत्या. हारवर्ड विद्यापीठाचे प्रा. आर्थर हॉलकोम् यांनीं आपल्या 'दि चायनीज रिव्होल्यूशन' या ग्रंथांतहि अशाच प्रकारचा रॉय यांच्या कार्याविषयीं गौरवपूर्ण अभिप्राय व्यक्त केला आहे. रॉय यांना परिस्थितीचें यथार्थ आकलन झालें होतें आणि ते योग्य मार्गदर्शन करीत होतें असें असूनहि त्यांना यश कां येऊं नये? माओनें त्यांनीं योग्य मार्गदर्शन करण्यापेक्षां अधिक कांहींहि केलें नाहीं असा दोष त्यांना दिला आहे. तथापि तो रास्त नाहीं. कारण यापेक्षां त्यांना अधिक कांहीं प्रत्यक्ष करतां येणें शक्य नव्हतें. ती सत्ता त्यांच्याजवळ नव्हती. बोरोडिन आणि चिनी कम्युनिस्ट नेते यांनीं कोमिंटांगबाबतच्या आपल्या संधिसाधू समझोत्याच्या धोरणामुळें रॉय यांनीं दाखवलेल्या मार्गानें जाण्याचें टाळलें, कित्येकदां निर्णय मान्य करूनहि त्यांची अंमलबजावणी करण्याबाबत चालढकल केली. रॉय यांनीं या हलगर्जीपणाला आळा घालण्याचे शिकस्तीचे प्रयत्न केले. आणि शेवटीं कांहींहि करणें शक्य नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाल्यामुळें







मंगोलियांतून मास्कोकडे ते परत फिरले. आणि सुमारें वर्षभर मॉस्कोंत राहिल्यानंतर आजारीपणांतच औषधोपचारासाठीं त्यांना बर्लिन येथें नेण्यात आलें.

१९२० नंतरच्या काळांत ताशकेंत येथील लष्करी विद्यालयांत, मॉस्कोच्या प्राच्य विद्यापीठांत आणि बर्लिन येथून 'व्हॅन्गार्ड' व 'मासेस' या पत्रांच्या द्वारा आणि अन्य मार्गांनीं अनेक तरुणांना शिक्षण देऊन वसाहतींतील क्रांतीचें नेतृत्व निर्माण करण्याचाहि त्यांनीं प्रयत्न केला. या काळांत त्यांच्या परिचयांत आलेलीं कांहीं माणसं अजूनहि आहेत. हे प्रयत्न केवळ हिंदुस्थानपुरतेच मर्यादित होते असें नव्हे. उदाहरणार्थ इंडोचायनामधील आजच्या कम्युनिस्ट बंडाचा प्रमुख होचिन्मिन् हा या काळांतील रॉय यांचाच शिष्य होय.

सहाव्या जागतिक कॉंग्रेसनें स्वीकारलेलें युरोप आणि भारतासंबंधीचें धोरण रॉय यांच्या मतानें फाजील डावेपणाचें द्योतक होतें. फॅसिझमचा युरोपांत उदय होण्याचीं चिन्हें दिसूं लागल्यामुळें या अपक्रांतीवादी शक्तीशीं लढण्यासाठीं सर्व प्रगमनशील शक्तींची संयुक्त फळी उभारणें आवश्यक होतें असें त्यांचें स्पष्ट मत होतें. त्याचप्रमाणें भारतीय राष्ट्रीय चळवळींमध्यें प्रवेश करून तिचें स्वरूप बदलण्याची व तिला जहाल बनवण्याची गरज होती. साम्राज्यशाहीच्या पडत्या काळांत शोषणाचे मार्ग बदलणें अपरिहार्य असल्यामुळें क्रांतीच्या मार्गांतहि आवश्यक तो फेरफार करणें जरूर आहे अशी भूमिका मांडणारा एक ठराव त्यांनीं चीनमधून परत आल्यानंतर तयार केला होता. परंतु आजारीपणामुळें ते सहाव्या जागतिक कॉंग्रेसला हजर राहूं शकले नाहींत. तिसऱ्या इंटरनॅशनलकडील रशियन पक्षाचे लक्ष, अंतर्गत महत्वाचे प्रश्न उद्भवल्यामुळें, कमी झाले आणि या संघटनेंत कारस्थानें व गटबाजी यांना सुरवात झाली. रॉय यांच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन ते भांडवलशाहीशीं ऐक्य करण्याचा सल्ला देत आहेत असा आरोप कुसेनिन आदि कार्यकर्त्यांनीं त्यांच्यावर केला. आणि युरोपीय परिस्थितीच्या त्यांच्या निदानावर आणि त्याबाबतच्या मार्गदर्शनावरहि अशाच प्रकारची टीका केली. मात्र त्यांनीं तयार केलेले प्रबंध प्रतिनिधींपुढें ठेवण्यांत आले नाहींत. हें कागदपत्र भारतांतील मीरत कटाच्या खटल्यांत दाखल करण्यांत आलें होतें. या सर्व कारस्थानांचा परिणाम म्हणजे रॉय यांची तिसऱ्या इंटरनॅशनलच्या कार्यकारी समितीवर पुनः निवड झाली नाहीं. तथापि भारतीय धोरणाबाबतच्या मतभेदामुळें रॉय यांचा तिसऱ्या इंटरनॅशनलशीं संबंध तुटला नाहीं. चीनचा तर त्याच्याशीं सुतराम् संबंध नव्हता. हा संबंध तुटण्याचें तात्कालिक कारण म्हणजे जर्मन पक्षाच्या फाजील डाव्या धोरणावर, त्यांनीं ब्रॅंडलर आदि विरोधकांच्या पत्रांतून केलेली टीका हें घडलें. रॉय यांनीं पुरस्कारलेल्या धोरणाला सहा वर्षांनंतर म्हणजे १९३४ सालीं सातव्या जागतिक कॉंग्रेसनें पूर्णपणें मान्यता दिली. परंतु मध्यंतरीच्या काळांत व्हायचा तो अनर्थ होऊन चुकला होता. १९२८ ते ३४ हाच हिट्लरच्या उदयाचा काळ होय. आणि या काळांत नाझींशीं सर्व शक्ती एकत्र करून लढण्याऐवजीं कम्युनिस्ट सोशल डेमोक्रेटिक पक्षावरच हल्ला करण्यांत दंग होते. अशा प्रकारें १९३४ सालीं सुचलेलें शहाणपण हें बऱ्याच उशीरा सुचलेलें शहाणपण ठरलें. आणि रॉय यांच्या भूमिकेच्या योग्यपणाचा हाच पुरावा होय. भारतीय राजकारणांत तर याहूनहि विलक्षण परिस्थिति निर्माण झाली. १९३६ मध्यें रॉय तुरुंगांतून सुटून आले त्या वेळीं सातव्या कॉंग्रेसच्या आदेशानुसार कम्युनिस्ट-धोरणांत बदल झाला होता. परंतु नव्यानें स्वीकारलेल्या धोरणाच्या पित्याचें पितृत्व मान्य करण्याची तयारी मात्र या पक्षाची नव्हती. यांतूनच चीनबद्दलचा अपप्रचार जन्मास आला. या काळांतील कम्युनिस्टपक्ष हा अशा प्रकारें रॉय यांच्या विरुद्ध अपप्रचार करणाऱ्या 'रॉयिस्टांचा' पक्ष होता असें म्हणावयास हरकत नाहीं.

रशियन क्रांतीशीं संबंध तुटला असला तरी त्यामुळें रॉय यांना त्या क्रांतीविषयीं वाटणारा जिव्हाळा कमी झाला नाहीं हें प्रसिद्ध आहे. ते क्रांतीचे भाट नव्हते, समीक्षक होते. यामुळें यानंतरहि सुमारें १७–१८ वर्षे त्यांनीं या क्रांतीकडे आशेनेंच पाहिलें. आणि ती आशा अनाठायी आहे अशी जेव्हां सतत एकामागून एक घडत असलेल्या घटनांमुळें त्यांची खात्री पटूं लागली तेव्हां क्रांतिविषयक त्यांचें पुनश्चिंतन सुरूं झालें. दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत त्यांना आशादायक वाटणाऱ्या ज्या कांहीं थोड्याबहुत घटना घडल्या त्यांच्यांतील एक महत्त्वाची घटना म्हणजे तिसऱ्या इंटरनॅशनलचें विसर्जन ही होय. बदललेल्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीमुळें हें विसर्जन आव-








श्यक झालें; असें स्पष्टीकरण विसर्जनाच्या घोषणेंतच करण्यांत आलें होतें. आणि हा बदल फॅसिझमच्या उदयामुळें घडून आला आहे असें रॉय यांनीं त्याचें स्पष्टीकरण केलें. फॅसिझमच्या उदयामुळें कामगार-वर्गाचा लढा हा समाजांतील सर्व प्रगमनशील शक्तींचा लढा बनला; प्रस्थापित समाजव्यवस्था फॅसिस्ट स्वरूपां-तच कायम राहू शकते; यामुळें त्यांतील मानवी संस्कृ-तीच्या विनाशाची शक्यता टाळणें म्हणजेच प्रस्थापित व्यवस्था बदलणें हें सर्वांचेंच कर्तव्य ठरलें. हें कार्य कामगारवर्गाची संघटना करूं शकणार नाहीं. ती त्यासाठीं अपुरी आहे. यामुळें तिचें विसर्जन होणें अपरिहार्य होतें असा अभिप्राय रॉय यांनीं व्यक्त केला.

या प्रसंगाच्या निमित्तानें रॉय यांनीं या संघटनेचें आरंभापासून ऐतिहासिक विश्लेषण आणि मूल्यमापन केलें. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या मुळाशीं आरंभापासून-च एक अत्यंत महत्त्वाचा अन्तर्विरोध होता. क्रांति यशस्वी झालेला रशिया आणि क्रांति व्हावयाची आहे असें अन्य जग या दोहोंचे दोन ऐतिहासिक दृष्ट्या भिन्न असलेल्या काळांतील प्रश्न सोडवण्याचे प्रयत्न करणारी ती संघटना होती, हा तो विरोध होय. तांत्रिक दृष्ट्या इंटरनॅशनल ही रशियन राजवटीचा भाग नव्हती; परंतु प्रत्यक्षांत दोहोंचा अविच्छेद्य संबंध होता. १९२४–२५ सालींच एका देशांत समाजवाद प्रस्थापित करण्याचें धोरण रशियानें स्वीकारल्यानंतर या संघटनेच्या अस्तित्वाला अर्थ उरला नाहीं. या संघटनेला जागतिक क्रांतिकारी सेनेचे अधिकारी-दल म्हणून संबोधण्यांत येई. रशियन कम्युनिस्टपक्ष या संघटनेंत होता. यामुळें तिचे सर्व निर्णय व कृती या त्याच्यावर बंधनकारक होत्या. उलट, सोव्हिएट राजवटी-चें परराष्ट्रीय धोरण हाच पक्ष निर्णीत करीत होता. प्रत्येक पक्षाच्या धोरणाबद्दल सर्व संघटना जबाबदार असल्यामुळें सोव्हिएट राजवटीच्या बदलत्या धोरणाला पर्यायानें इंटरनॅशनलच जबाबदार होय असें म्हणणें आवश्यक होतें. अशा तऱ्हेची परिस्थिति फार काळ टिकणें अशक्य होतें. रशियन पक्ष सत्तारूढ असल्या-मुळें त्याचेंच वर्चस्व या संघटनेंत राहिलें. इतर पक्षांची पातळी उंचावली नाहीं. त्यामुळें रशियांतील विभूति-पूजनवृत्तीचे पडसाद याहि संघटनेंत उमटले. मूळ संस्थापकांचे म्हणजे लेनिनच्या सहकाऱ्यांचे हळुहळु प्रथम नेतृत्वपदावरून व नंतर संघटनेंतून उच्चाटन करण्यांत आलें. आणि त्यांच्या ऐवजीं उत्साही अर्धक-च्च्या तरुणांचा वा लाळघोट्यांचाच तिच्यांत भरणा झाला. यामुळें या संघटनेला नैतिक व संघटनात्मक दौर्बल्य आलें.

या दौर्बल्याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे १९२५ नंतर-च्या काळांत कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें केलेल्या एका-मागून एक ढोबळ चुका हा होय. या ठळक चुकांचा निर्देश रॉय यांनीं अत्यंत मार्मिकपणें केला आहे. पहिली महत्त्वाची चूक म्हणजे १९२३ च्या जर्मन क्रांतीच्या पराभवाचा योग्य अर्थ या संघटनेला आकलन झाला नाहीं. जर्मनीला मिळालेल्या अमेरिकेच्या आर्थिक साहाय्याचे परिणाम नीटपणें तपासून पहाण्याचे ऐवजीं त्या योगें निर्माण झालेलें आर्थिक स्थैर्य हें तात्पुरतें असून आज ना उद्यां पुनः अरिष्ट येईल अशी आशा कम्युनिस्टांनीं बाळगली. आणि हें मत अमान्य करणाऱ्या सोशल डेमोक्रॅटिक पक्षावरच टीकेची झोड उठवली. या धोरणामुळें १९२३ ते २५ या अवघ्या दोन वर्षांच्या काळांत जर्मन कम्युनिस्ट-पक्षाला कितीतरी दौर्बल्य आलें. फॅसिझममुळें निर्माण झालेल्या धोक्याचें गंभीर स्वरुप या संघटनेनें फारच अवमूल्यित स्वरूपांत ध्यानांत घेतलें हा तिचा दुसरा भयंकर प्रमाद होय. यांतून ‘ सोशल डेमॉक्रसी ’ हा फॅसिझमपेक्षांहि अधिक मोठा धोका होय हा खुळचटपणाचा सिद्धान्त जन्मास आला. अशाच प्रका-रचे चीनमधील ‘ कँटन् कम्यून ’ कडे नेणारें धोरण, भारतीय राष्ट्रीय चळवळीचें मूल्यमापन इत्यादि इतरहि महत्त्वाचे प्रमाद त्यांनीं स्पष्ट केले आहेत. या सर्वांवर रूसो–जर्मन कराराच्या वेळीं तर कळसच चढविला गेला असें म्हणावयास हरकत नाहीं. युद्धांत पडलेल्या शक्तींची वस्तुनिष्ठ दृष्टिकोणांतून तपासणी करून निर्णय काढण्याऐवजीं बर्लिनमधून परत आल्यानंतर मालो-टॉव्हनें केलेल्या एका भाषणांतील परिच्छेदावरून “हें युद्ध साम्राज्यशाहीविरोधी युद्ध आहे व तें यशस्वीपणें लढण्यासाठीं फॅसिझम व कम्युनिझम एकत्र आले आहेत; असा निष्कर्ष इंटरनॅशनलनें काढला. आणि त्यामुळें इंटरनॅशनलच्या अंगभूत पक्षांची फॅसिझमच्या प्रचारापर्यंत मजल गेली. अशा रीतीनें बदलत अस-लेल्या परिस्थितीशीं पूर्णपणें विसंगत बनलेली आणि निरुपयोगी ठरत असलेली ही संघटना नष्ट होणें आवश्यक झालें होतें. आणि यामुळें तिच्या विसर्जनाचा निर्णय हा स्वागतार्ह बनला. आणि मानवेंद्रनाथांच्या जीवनांतील १९२८ सालीं बंद झालेलें हें प्रकरण क्रांतीच्या विकासक्रमांतूनहि नाहींसें झालें.

---








# श्रद्धांजलि

## 'बुद्धि, अद्‌भुतरम्यता आणि क्रान्ति'

[ लंडन येथें १७ फेब्रुवारी १९५४ ला भरलेल्या रॉय यांच्याबद्दलच्या दुखवट्याच्या सभेंत 'ह्युमॅनिस्ट इंटरनॅशनल'चे सरचिटणीस एच्. जे. ब्लॅकहॅम यांनीं मुख्य भाषण केलें त्यांतील महत्त्वाचा भाग येथें घेतला आहे. ]

माझा व रॉय यांचा साक्षात् परिचय नाहीं. परंतु त्यांच्या अकालीं निधनानें माझा निकटचा संबंधी गेला, असें वाटून मला दुःख झालें. माझा त्यांचा पत्रव्यवहार होता. मी त्यांचीं पुस्तकें वाचलीं आहेत व त्या पुस्तकांचीं समीक्षणेंहि लिहिलीं आहेत. मला त्यांच्या निकटच्या मित्रांचा चांगला परिचय आहे. त्यांना मी फार महत्त्व देतों. रॉय यांची व माझी गांठ पडावी, अशा प्रतीक्षेंत मी होतों. आंतरराष्ट्रीय मानवतावादी चळवळीचें त्यांच्या निधनानें नुकसान झालें, याबद्दल मला फार वाईट वाटतें. या चळवळीला चांगला आकार देण्याकरितां त्यांचा फार उपयोग झाला असता. त्यांच्या तरल गतिमत्तेचा प्रवाहहि मला प्रभावी वाटला. भावना, कल्पनाशक्ति, विचार आणि कृति यांचा संगम त्या प्रवाहांत होता.

आपण या ठिकाणीं त्यांना श्रद्धांजलि अर्पण करण्यास जमलों, याचें कारण त्यांची महती आपणांस पटली आहे. प्रत्यक्ष व्यवहारांत सामान्यपणें समजतात, तसें कांहीं महत्त्वाचें यश त्यांनीं संपादन केलें असा आपला दावा नाहीं. त्यांचें लेखनकार्य अफाट आहे. परंतु रशियन क्रांतीवरील त्यांचा ग्रंथ हाच त्यांचें कायमचें स्मारक म्हणून बहुधा राहील. राजकीय चळवळ त्यांनीं सतत केली आहे. परंतु इतिहासांत त्यांतील फार थोडें नमूद केलें जाईल. तरी ते श्रेष्ठपुरुष होते असें म्हणतां येतें. त्यांचें जीवन असफल झालें नाहीं. त्याचें साफल्य ज्या प्रकारचें होतें तो प्रकार दुर्लभ आहे. हीच त्यांची श्रेष्ठता होय. जिवंत अंतर्मुखता त्यांच्यांत टिकून राहिली व विकास पावत गेली. शेले या महाकवीनें वर्णिलेला अंतराग्नीच तो होता. जगांतील हळुहळु पसरणारें कल्मष मानवी व्यक्तींच्या आत्म्यांतील जीवनकेंद्राला विषारी करीत आहे, गुदमरून टाकीत आहे. त्याचा प्रतिकार रॉय सतत करीत होते. ते अद्‌भुतरम्यतावादी होते हें उघडच आहे. तशी त्यांची कबूली आहे. त्यांच्या अद्‌भुतरम्यतावादानेंच राजकीय क्रांतीच्या कर्मयोगाचें रूप धारण केलें होतें. बुद्धिवाद त्यांचें नियंत्रण करीत होता. या विलक्षण प्रकारच्या संगमांतूनच हा माणूस निर्माण झाला. या संगमाचे हे घटक त्यांनीं लिहिलेल्या एका ग्रंथाच्या नामाभिधानांत प्रत्यक्ष ग्रथित झालेले दिसतात. त्या ग्रंथाचें नांव **'बुद्धि, अद्‌भुतरम्यतावाद व क्रांति'** असें आहे.

त्यांच्या जीवनाची स्वामिनी असलेली भावना म्हणजे स्वातंत्र्याची प्रेरणा ही होय. रॉयनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, "माझ्या सार्वजनिक आयुष्यास आरंभ याच प्रेरणेपासून झाला. मार्क्सचे 'भांडवला'वरील तीन ग्रंथ आणि मार्क्सवाद्यांचे ३०० ग्रंथ इतकी उन्नत स्फूर्ति देऊं शकत नाहींत! या स्वातंत्र्यविषयक प्रेरणेनेंच मानवी जग निर्माण केलें. सरंजामशाही व भांडवलशाही समाजरचना त्या प्रेरणेनेंच तयार केली. ज्या अधिक उदात्त विश्वाचें स्वप्न आपण निर्माण करीत आहोंत, तें सत्यसृष्टींत आणण्याचें कार्य हीच प्रेरणा करील" मानवी स्वातंत्र्य हें रॉय यांनीं अंतिम मूल्य मानलें होतें. हेंच मूल्य त्यांच्या मतें सर्व मूल्यांचा निकष होय.



यह भी नहीं, कोई देवता भगवान मर गया । नेता शाहंशाह न सुलेमान मर गया ।
हिंदू कोई मरा न मुसलमान मर गया । इतनीसी बात है एक इन्सान मरगया ।

अनुक्रमणिका

मानवी विचार व ध्येयें हीच मानवाची अगाध आत्मशक्ति होय. या तत्त्वावर रॉय यांची नितांत श्रद्धा होती. हें तत्त्व मनुष्यजातीच्या ऐतिहासिक अनुभवांवर त्यांनीं तपासून घेतलें होतें. हें तत्त्व त्यांच्या रक्तांतच होतें. म्हणून व्यापक विश्वमानवाची स्थापना करण्याची विलक्षण उत्कंठा त्यांना लागलेली होती. म्हणून धार्मिक संस्था, प्रादेशिकतेच्या संकुचित वासना, मार्क्सवादावरील अंधश्रद्धा, वंशवाद आणि राष्ट्रवाद यांचीं बंधनें तटातट तोडून ते मोकळे झाले. याच अद्‌भुतरम्यताशाली विचारांच्या पंखावर आरूढ होऊन मनुष्यजातीच्या इतिहासाचीं कर्तृत्वशालीं युगें त्यांनीं न्याहाळून टाकलीं. या तत्त्वांत त्यांना इतिहासाची गतिमत्ता आणि प्रगतिशीलता यांचें मर्म सांपडलें.

त्यांच्या अद्‌भुतरम्यतावादाला बुद्धिवादाची शिस्त होती. त्यामुळ वस्तुवादाचें महत्त्व ते कधींहि विसरले नाहींत. अशक्य अशा वाटणाऱ्या ध्येयांना प्रत्यक्ष सृष्टींत आणण्याकरितां साहसी शौर्याची जोड दिली पाहिजे, नितांत निष्ठा पाहिजे, हें ते कधीं विसरले नाहींत. मनुष्य स्वतःच्या आत्म्याकरितां संस्था निर्माण करतो. संस्था व संघटना ही त्याचीच कृति असते; परंतु त्यानें त्या कृतीचा दास होता कामा नये, या मुद्द्यावर त्यांचा कटाक्ष होता. ते म्हणत : “माणसानें सगळें जग जिंकावें व आत्म्यास गमवावें, असें होतां कामा नये!” अशा अत्यंत निरोगी विचारांत ते निमग्न होते. एखादा संप्रदायवादी किंवा मानमान्यता पावलेला राजकीय पक्षाचा नेता यांना हा विचार मानवत नाहीं. रॉय हे तशा प्रसिद्ध अर्थानें राजकारणी नव्हतेच. त्यांच्या स्वभावांतच तसलें राजकारण वसत नव्हतें. किंवा प्रसिद्ध अर्थानें ते बडे पंडितहि नव्हते. परंतु आधुनिक जगाला अत्यंत गंभीर आणि सद्यःस्थितींत आवश्यक असा राजकीय संदेश ते देऊन गेले आहेत.

तात्पर्य, रॉय हे अग्निदिव्यांत उभे असलेले भौतिकवादी होते. जेव्हां भौतिकवाद असा ज्वालाग्राही बनतो तेव्हां तें निर्भेळ चैतन्यशाली सारभूत मानव्यच होय, अशी साक्ष पटते.

— एच्. जे. ब्लॅकहॅम (लंडन)

---

## विश्वमानव मानवेंद्रनाथ रॉय

मानवेंद्रनाथ रॉयना जितक्या जवळून पहाण्याची संधि मला मिळाली तितक्या जवळून मी फारच थोड्या लोकांना पहिलें आहे. परंतु आज जेव्हां त्यांच्या तुफान क्रांतिकारक जीवनाचें स्मरण होतें तेव्हां त्यांना जितकें जाणण्याची आवश्यकता होती त्याच्या सहस्रांशदेखील मी जाणूं शकलों नाहीं असें वाटतें. ते थोर नेते होते कीं थोर चिन्तक, मोठे क्रांतिकारी होते कीं मोठे दार्शनिक, थोर तत्त्वज्ञ होते कीं श्रेष्ठ मानव याचा निर्णय करणें त्यांच्याशीं निकट परिचय येऊन देखील मला अत्यंत कठिण वाटतें. देशाला येन केन प्रकारेण स्वतंत्र करण्याचें ‘ वेड ’ असलेला एक तरुण पैसा आणि शस्त्रास्त्रें मिळविण्यासाठीं अनोळखी मुलुखांत जाण्यास निघतो, पांचसात देशांतील क्रांत्यांचा निष्क्रिय प्रेक्षक नव्हे तर सक्रिय संचालक बनतो आणि अखेरीस मार्क्सवादी आदर्श, तत्त्वें आणि राजनीति यांच्या पलीकडे जाऊन मानवाच्या मूलभूत उन्नतीचीं आणि विकासाचीं तत्त्वें– निष्कर्ष– काढतो ! मानवतावादाचें त्यांचें तत्त्वज्ञान हे मार्क्स वा गांधीच काय, परंतु जगांतील सर्व वादांच्या पुढें व त्यांहून श्रेष्ठ आहे. केवळ आपल्या देशांतीलच नव्हे तर सर्व जगांतील शोषित, पीडित, वंचित जनतेच्या मुक्तीसाठी आणि कल्याणासाठीं, देश, काल, धर्म, जाति, वर्ण इत्यादि सर्व भेदांनें अतिक्रमण करून सर्वस्वत्यागाला सिद्ध झालेले भारताचे पहिले सुपुत्र म्हणजे रॉय होत. ते कोणत्याहि विशिष्ट देशाचे नेते किंवा नागरिक नव्हते. खऱ्याखुऱ्या अर्थानें विश्वमानव होते.

त्यांचा बौद्धिक प्रामाणिकपणा, सत्यान्वेषणाची अदम्य आकांक्षा, स्वातंत्र्य आणि लोकशाहीची त्यांनीं केलेली









त्याख्या, विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांचा त्यांनीं केलेला समन्वय आणि भौतिक मूल्यें आणि आध्यात्मिक आदर्श यांच्यांत त्यांनीं निर्माण केलेलें विवेकपूर्ण सामंजस्य यांना तुलना नाहीं. तसें म्हटलें तर गॅलिलियोनेंहि वैचारिक जगांत फार मोठी क्रांति केली होती. परंतु ब्रूनोप्रमाणें आपल्या विचारांसाठीं आपल्या प्राणांची आहुति देण्यास तो सिद्ध झाला नाहीं. रॉय यांनीं हीं दोन्हींहि कार्यें केलीं. वैज्ञानिक दृष्टिकोण आणि विवेकपूर्ण चिंतन यांची त्यांच्या ठिकाणीं आढळणारी परिपक्वता, मार्क्सनंतर इतरत्र क्वचितच आढळेल. कपिल आणि नारदाचा नास्तिकवाद, सायण आणि सांख्यांचा न्यायवाद, चार्वाक आणि बुद्धाचा मानववाद, इतकेंच नव्हे तर प्लेटोपासून मार्क्सपर्यंतचे मानवी स्वातंत्र्याचे आदर्श सिद्धांत यांचा योग्य समन्वय त्यांच्या विचारांत झाला. मार्क्सच्या मर्यादांबद्दल व दोषांबद्दल इषारा देणारे आणि राजकारणांतील समुदायवादी दुर्नीतीचे परिणाम स्पष्ट करून मूलभूत मानवी हक्क आणि लोकशाही यांना त्यापासून निर्माण होणारा धोका दाखविणारे ते पहिलेच गृहस्थ होत. कोणत्याहि प्रचलित विचाराला तर्क, विवेक आणि उपयोगिता या तिन्ही कसोट्यांवर तपासल्यावाचून त्यांनीं कधींहि मान्यता दिली नाहीं. विश्वमानवता आणि मूलगामी मानवी स्वातंत्र्य याचेच ते एक खरेखुरे प्रेषित होते. मानवी संस्कृतीचे ते एक श्रेष्ठ प्रतीकच होत.

—मोहनसिंग सेंगर, संपादक – ' नयासमाज. '–

----

## नवमानवतेचा दार्शनिक

भारताची परंपरा अध्यात्मवादी तत्त्वज्ञान्यांची व दार्शनिकांची आहे. त्या तेजस्वी परंपरेंत श्री मानवेंद्रनाथ रॉय यांची नव्या मानवतावादाचें दर्शन देणारे द्रष्टे म्हणून गणना केली पाहिजे.

' केसरी – मराठा 'संस्थेच्या अभ्यागतगृहांत त्यांची व माझी भेट झाली त्यावेळीं त्यांनीं, 'आपण शस्त्राचारी दहशतवाद व राष्ट्रवाद कां सोडला ' याची केलेली मीमांसा अनुभवावर उभारलेली, वैचारिक संपत्तीनें लकाकणारी व कठोर तर्कवादानें भूषविलेली होती. विनोदानें " तुमच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या ' मराठा ' पत्रांत लिहिणारा मानवेंद्र पार बदलला आहे. " असेंहि ते म्हणाले.

त्यांच्या तत्त्वज्ञानाच्या विकासाकडे पक्षातीत दृष्टीनें पाहिलें म्हणजे त्यांनीं भारताला आपल्या ग्रंथ-संपत्तीच्या द्वारें नव्या विचारांचा एक मोठा ठेवा दिला. भारताचें तें एक भाग्य आहे. यामुळें भारताला त्यांचा अभिमानच वाटेल.

दा. वि. गोखले ( पुणें )

----

## रॉय यांचें वैशिष्ट्य

सहा वर्षें कारावास भोगून सुटका झाल्यानंतर १९३७ सालीं रॉय प्रथम पुण्याला आले. त्या वेळीं माझ्या घरींच त्यांचा मुक्काम होता. त्या चारसहा दिवसांच्या मुक्कामांत त्यांचा मला अधिक जवळून परिचय झाला. मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञान म्हणजे केवळ वर्गयुद्ध आहे, आणि संप, निदर्शनें इत्यादि गोष्टींतून होणारा त्याचा आविष्कार हेंच त्या तत्त्वज्ञानाचें मूलभूत स्वरूप आहे, असा समज पसरावा अशा रीतीनेंच तें या देशांत प्रकट होत होतें. परंतु रॉय यांच्या सान्निध्यांत कांहीं काळ घालविल्यावर त्या तत्त्वज्ञानांतील कांहीं वेगळ्याच, विशाल, अशा समाज विकासाच्या बाजूची ओळख होत असे. तसेंच, त्यामागें कांहीं नैतिक ध्येयवाद आहे हें रॉय यांच्याशीं अनेक विषयांवर चर्चा करीत असतांना कळून येत असे. त्यायोगें त्यांच्या सान्निध्यांत आलेल्या प्रत्येक व्यक्तीला मार्क्सपंथीय विचारांकडे एका वेगळ्या दृष्टीनें पाहण्यास त्यांनीं शिकविलें असें म्हणणें अवास्तव होणार नाहीं.

हिंदी राजकारणांत त्यांनीं उघडपणें प्रवेश केला, तेव्हां त्यांचा चांगलाच प्रभाव पडेल असें कित्येकांना वाटत होतें. पण हिंदी राजकारणाला गांधीयुगांत जें एक विशिष्ट वळण लागलेलें होतें त्यामध्यें रॉय यांच्या कर्तृत्वाला अवसर मिळणें दुरापास्त आहे हें लवकरच कळून आलें. या राजकारणामागील प्रेरक शक्ती कोणत्या आहेत याचा नीट आवांका रॉय यांना आला असता आणि परिस्थितीशीं जुळतें घेण्याचा








व्यवहारी मुत्सद्दीपणा त्यांच्या ठिकाणीं असता तर राष्ट्रीय चळवळीच्या प्रभावळींत त्यांना प्रवेश करून घेणें अगदीं अशक्यच झालें असतें असें नाहीं. परंतु रॉय यांची 'प्रकृति'च वेगळी होती. त्यांचा हिंदी राजकारणांत प्रभाव कां पडला नाहीं असा प्रश्न कांहीं लोक विचारतात. 'राम-अहिल्या'न्यायानें विचार केला तर त्या प्रश्नाचें उत्तर सहज लक्षांत येईल. रामानें अहिल्येचा उद्धार केल्याची गोष्ट प्रसिद्ध आहे. राम रानावनांत भटकत असतांना अनेक दगडांना त्याचा पादस्पर्श झाला असेल. पण त्या प्रत्येकांमधून अहिल्या अवतरल्या नाहींत. कारण सुप्त रूपानें अहिल्या एका विशिष्ट दगडांतच होती. तसेंच ज्या शिलेला रामाच्या पायाचा स्पर्श झाल्यावर तीमधून अहिल्या अवतरली, त्या शिलेवर पूर्वी अनेकांचे पाय पडले असतील. पण त्यां पायांमध्यें "राम" नव्हता. म्हणून अहिल्या अवतरली नाहीं. तेव्हां उद्धाराचें सामर्थ्य असलेला पाय आणि गुप्त स्थितींत अहिल्या वसत असलेला दगड या दोघांच्या संयोगांतूनच अहिल्योद्धार संभवतो! हिंदी परिस्थिति आणि रॉय यांच्या ठिकाणीं असलेलें कर्तृत्व यांचा संयोग होऊं शकला नाहीं आणि त्यामुळेंच हिंदी राजकारणांत रॉय यांचा प्रभाव पडला नाहीं.

रॉय यांची उपेक्षा झाली, अशा कल्पनेच्या आहारीं जाऊन कांहीं रॉयपंथीयांनीं त्याबद्दल जळफळाट व्यक्त करावा याचें आश्चर्य वाटतें. मात्र रॉय यांच्या ठिकाणीं, आपली उपेक्षा झाली या कल्पनेच्या आहारीं जाऊन कडवटपणा किंवा वैफल्य आलेलें दिसत नाहीं, हें विशेष होय. नाहींतर त्यांच्या लिखाणांतून व्यक्त होणारा दुर्दम्य आशावाद व मानवी कर्तृत्वावर अचल श्रद्धा हीं प्रतीत झालीं नसतीं. केवळ सत्तेच्या मापानें माणसाचें मोठेपण जोखण्याची वृत्ति हिंदुस्थानांत बळावली आहे रॉय यांच्या कांहीं मान्यवर शिष्यांच्या बुद्धीला वरील मनोविकृतीची बाधा जडावी हें दुर्दैव होय.

मार्क्सवादी तत्त्वज्ञानाच्या विकासाची पुढील दिशा कोणती याच्या चिंतनांत अखेरचीं कांहीं वर्षें रॉय यांनीं घालविलीं. अमेरिकेंत वैभवाच्या शिखरावर चढलेली भांडवलदार संस्कृति आणि रशियामध्यें विशिष्ट प्रकारानें वाढीला लागलेली समाजवादी संस्कृति यांपैकीं नैतिक दृष्ट्या निःशंकपणें कोणत्या संस्कृतीचा आपण पुरस्कार करावा यांबद्दल एके काळीं समाजाच्या उद्धाराचा एकच एक मार्ग म्हणून ज्यांनीं मार्क्सच्या सिद्धान्ताची पूजा बांधली असे अनेक विचारवंत आज संभ्रमित मनःस्थितींत आहेत. जगाकडे पाठ फिरवून व 'ऊर्ध्वबाहू' होऊन आपल्या बुद्धीला पटेल तें सांगत राहावें असा मार्ग कांहींनीं पत्करलेला दिसतो; तर कांहींना आपण जें मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञान डोक्यावर घेतलें त्या तत्त्वज्ञानानेंच अखेर दगा दिला अशा समजुतीनें त्याचा प्रथम उच्छेद कसा केला जाईल या एकाच विचारानें पछाडलेलें दिसतें. रॉय हे या समस्येंतून बाहेर पडण्यासाठीं समाजविकास साधण्याचा नवा मार्ग शोधण्यांत गढून गेलेले होते. या त्यांच्या संशोधनांतूनच नवमानवतावादाचें तत्त्वज्ञान त्यांनीं जगापुढें ठेवलें असावें अशी माझी समजूत आहे.

र. के. खाडिलकर ( पुणें )

---

## श्रद्धाशील बुद्धिवाद

३०।१।'५४ रोजी मुंबई येथें रॉय यांच्यानिमित्त भरलेल्या शोकसभेंत **त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी** यांनीं जें भाषण केलें त्याचा बोर्डीच्या शारदाश्रमांतील श्री. ग. मळेकर यांनीं पाठविलेला हा सारांश आहे.— का. सं.

**मानवेंद्रनाथ रॉय** हे केवळ बुद्धिवादी नव्हते तर ते श्रद्धाशील बुद्धिवादी होते. बुद्धिवादी आपले विचार मांडतो आणि त्या विचारप्रतिपादनानें संकट निर्माण होतांच तो दूर पळतो! परंतु श्रद्धाशील मनुष्य हा विचारांशीं एकरूप झालेला असतो, तो संकटाला भीत नाहीं. प्रसंगीं, तो विचारप्रसारासाठीं आपली आहुतीहि देतो. हीच श्रद्धा होय. ही श्रद्धा प्रचलित धर्मांना मागें टाकते व नवीन धर्म निर्माण करते. जीवनांतील प्रत्येक स्पंदन, हृदयांतील प्रत्येक ठोका आणि रक्ताचा प्रत्येक थेंब ज्या जीवनशक्तीचा पुरवठा करीत असतो, ती जीवनशक्ति विचारवंत

या ध्येयासाठीं अर्पण करतो. रॉय याच अर्थानें श्रद्धाशील होते.

' Quest of Freedom ', ' स्वातंत्र्याचा शोध ' हा त्यांच्या जीवनाचा संदेश आहे. मार्क्सवादाच्या पलीकडेहि ते गेले. कां ? मार्क्सवादानें मानवाचा एक अंतिम जीवनहेतु निश्चित केला. जणूं मानवाचा प्रवास संपला ! जणूं मानवी जीवनाची कृतार्थता झाली ! – त्यामुळेंच या विचारांतून सुटका करून घेणें आवश्यक झालें. विचारांचा शोध अनंत आहे. पण त्यासाठीं जिज्ञासायुक्त मन पाहिजे आणि जुने विचार टाकून देण्याचें धैर्य पाहिजे. रॉय यांनीं आपलें जीवन व राजकारण यांच्याविषयींचें सिद्धान्त धैर्यानें मांडले. आपल्या देशांतील लोक श्रद्धा व परंपरागत विचारांच्या बंधनांत आहेत हें त्यांनीं ओळखलें. आपला विचार हा पुन्हां पुन्हां तपासून त्याच्या सत्यस्वरूपाचा सतत शोध केला पाहिजे. रॉय यांचा('Renaissance')'नवजीवना'-वर तर विश्वास होता. " माणसा , कायमचा जागृत रहा. तुला विश्रांति घेतां येणार नाहीं. सारखा शोध घेत रहा. "

जीवनपुष्पाच्या नुकत्याच पाकळया उमलूं लागण्याच्या कालांत, ऐन १४ व्या वर्षी त्यांनीं श्रद्धेचा तेजस्वी उन्मेष दाखविला. स्वातंत्र्यसूर्याकडे त्यांनीं झेप घेतली. परंतु जन्मभर ते त्याच ध्येयाला कवटाळून बसले नाहींत. याचें कारण ते अंधश्रद्ध नव्हते. पुढें त्यांनीं मार्क्सवादाचा स्वीकार केला. मार्क्सवादाच्या थोर थोर पुढाऱ्यांशीं त्यांचा संबंध आला. जगप्रसिद्ध विचारवंतांशीं त्यांनीं याविषयीं वादविवाद केला. कोणताहि विचार घेतांना हा विचार परदेशी कीं स्वदेशी आहे याचा कधींच ते विचार करीत नसत ! वैचारिक भूमि ही विश्वव्यापी आहे.

तथापि ते मार्क्सवादाला शरण गेले नाहींत. इ. स. १९३७ मध्यें त्यांची व व माझी भेट झाली होती. त्यावेळीं मी त्यांना एक प्रश्न केला : तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानंतर असें आढळून येतें कीं मनुष्य ज्ञान मिळविण्याचीं जशीं साधनें निर्माण करतो तसाच तो अडचणीहि निर्माण करतो ! मग हें तत्त्वज्ञान कोणत्याहि क्षेत्रांतील असो. मी रॉयना विचारलें : " मार्क्सवाद हें अंतिम तत्त्वज्ञान आहे का ? त्यांत कांहीं मूलभूत दोष नाहींत कां ? " रॉयनीं उत्तर दिलें : "I am a non-conformist Marxist ! "

ते सांप्रदायिक मार्क्सवादी नव्हते. म्हणूनच त्यांच्या विचारांत क्रांति होत गेली. हा गुण फारच थोड्या लोकांच्या अंगीं आढळतो. मग तो रोमन कॅथॉलिक, ख्रिस्ती, हिंदू , मुसलमान अगर कोणत्याहि धर्माचा असो ! माणसानें निर्माण केलेलें तत्त्वज्ञान अपूर्णच असणार, ही कबुली द्यायला कित्येकांना लाज व भीति वाटते. स्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानाचा शोध घेणाऱ्या मार्क्सवादाच्या विचारवंतांनींहि आपल्या भोंवतीं शेवटीं तुरुंग निर्माण केला !

सुरवातीला रॉय मार्क्सवादी होते. नंतर ते 'रॅडिकल डेमोक्रॅट' झाले. आणि शेवटीं ते पक्षातीत होऊन मानवतावादी बनले. " सर्व जगांतील मनुष्यमात्र एकच आहे. आणि त्याची स्वातंत्र्याची आकांक्षा हें एकच ध्येय आहे " असें ते मानीत.

त्यांची लोकांनीं उपेक्षा केली असें मी मानीत नाहीं. कारण रात्रीं आकाशांत स्वयंतेजानें प्रकाशणारे तारे झोंपीं गेलेल्या माणसाच्या दृष्टीनें उपेक्षितच असतात. तथापि ते स्वतःच स्वयंसिद्ध तेजस्वी असतात. त्या उपेक्षितपणाची कोणीच तक्रार करीत नाहीं. रॉय ह्यांचें तेजहि असेंच आहे. मानवेंद्रनाथ रॉय यांची जीवनदृष्टि अजरामर आहे व राहील.

— लक्ष्मणशास्त्री जोशी








# मानवेंद्रनाथ रॉय

## यांची

# ग्रंथसंपत्ति

| | | | |
|---|---|---|---|
| An Open Letter to President Wilson – 'The Way to Durable Peace' ( Spanish ) – New York | | | |
| British Rule in India ( Spanish ) – El Pueblo, Mexico | | | |
| India in Transition – Geneva | | | |
| One Year of Non-Cooperation – Moscow | | | |
| Future of Indian Politics – Moscow | | | |
| Aftermath of Non-Cooperation – Moscow | | | |
| Letter to a Nationalist – Berlin | | | |
| Revolution and Counter-Revolution in China ( German ) – Berlin | | | |
| My Crime | | | |
| My Defence ( I accuse ) – India | | | |
| China in Revolt – (S. K. Vidyarthi) – India | | | |
| Our Task in India – (Anonymous) – India | | | |
| Letters to C. S. P. – | Renaissance | Publishers, | Calcutta |
| Man and Nature ( Edited ) | ,, | ,, | ,, |
| Historical Role of Islam | ,, | ,, | ,, |
| Science and Superstition | ,, | ,, | ,, |
| Heresies of the 20th Century | ,, | ,, | ,, |
| Our Problems | ,, | ,, | ,, |
| Philosophy of Fascism | ,, | ,, | ,, |
| From Savagery to Civilisation | ,, | ,, | ,, |
| Scientific Politics | ,, | ,, | ,, |
| Nationalism, Democracy and Freedom | | ,, | ,, |
| Fragments of a Prisoner's Diary : | | | |
| Vol. I. Memoirs of a Cat | ,, | ,, | ,, |
| Vol. II. Ideal of Indian Womanhood | | ,, | ,, |
| Vol. III. Letters from Jail | ,, | ,, | ,, |
| Our Differences | ,, | ,, | ,, |
| India and War | ,, | ,, | ,, |
| War and Revolution | ,, | ,, | ,, |
| The Communist International | ,, | ,, | ,, |
| Whither Europe ? | ,, | ,, | ,, |
| My Experiences in China | ,, | ,, | ,, |
| Poverty or Plenty ? | ,, | ,, | ,, |

| | |
|---|---|
| Indian Labour and Post-war Re-construction | Renaissance Publishers, Calcutta |
| Planning a New India | ” ” ” |
| Alphabet of Fascist Economics | ” ” ” |
| National Government or People's Government? Alternative | ” |
| Nationalism : An Antiquated Cult | ” ” |
| Jawaharlal Nehru | ” ” |
| Problems of Freedom | ” ” ” |
| I. N. A. and the August Revolution | ” ” ” |
| Constitution of Free India : A Draft | ” ” |
| Materialism | ” ” |
| Science and Philosophy | ” ” ” |
| New Orientation | ” ” ” |
| The Russian Revolution | ” ” ” |
| Beyond Communism | ” ” ” |
| Revolution and Counter-Revolution in China (English) | ” ” ” |
| New Humanism | ” |
| Radical Humanism | ” ” ” |
| Reason, Romanticism and Revolution | Eastern Economist, Delhi |
| Vol. I. | |
| Vol. II (in Press) | Renaissance Publishers, Calcutta |
| Library of a Revolutionary | ” ” ” |

And writings in 'Radical Humanist' (Formerly 'Independent India'), 'The Humanist Way' (Formerly 'The Marxian Way'), and 'Vanguard' and 'Masses' Berlin





अनुक्रमणिका






